आजच्या महाराष्ट्रीय कुटुंबात पुरुषानीं आणलेली उत्तरेकडील आर्यपरंपरा व बायकानीं आणलेली दक्षिणेकडील द्रविडपरंपरा अशा दोन परंपराचा गंगा-जमनी संगम झालेला आहे.[1]

बायकाच्या सौभाग्यालंकाराचा प्रकार हा विशेष लक्षात घेण्यासारखा आहे. महाराष्ट्रातील मुख्य सौभाग्य-अलंकार मंगळसूत्र हा आहे. हातांतील बागड्या, कपाळावरील कुंकू वगैरेंचाहि सौभाग्य-अलंकारांत समावेश करतात. पण हे अलंकार कुमारीहि वापरतात. खालच्या वर्गाच्या बायका नेहमीं कुंकू लावतातच असें नाहीं. तेव्हा सौभाग्याचें असामान्य चिन्ह म्हणजे मगळसूत्र हेंच उरतें. ही चाल द्रविडाची आहे. उत्तर हिंदुस्थानांत मुख्य सौभाग्य-अलंकार हातातील चुडा अथवा बागड्या हा होय. मंगलसूत्राला जें महत्त्व महाराष्ट्रात आहे तेंच महत्त्व उत्तरेकडे चुडयाला आहे. बगालमध्यें चुडा लोखंडाचा घालतात व त्याचीं टोकें पक्कीं करून वज्रलेप करितात. पतिनिधनानंतर तो चुडा तोडूनच काढावा लागतो इतका तो वज्रचुडा असतो. आपल्यामध्यें चुडयाच्या या माहात्म्याची आठवण राहिली आहे ती फक्त भाषेमध्यें. पतीला जीवदान द्या या अर्थी मंगलसूत्रदान द्या असें न म्हणता 'चुडेदान द्या' असाच वाक्संप्रदाय रूढ आहे. पण त्या चुडयाचें महत्त्वाचें स्थान महाराष्ट्रात मंगलसूत्रानें पटकाविलें आहे. स्त्रियानीं उत्तरेकडील आर्यांतील जे रिवाज उचलले त्यात भागांत सेंदूर घासणें व डोकीवर पदर घेणें हे प्रमुख होत. हे प्रकार द्रविडांना परके असून ते उत्तरेकडून आलेले आहेत.

मराठ्याचीं जीं प्रख्यात कुलदैवतें आहेत त्यांत आर्य व द्रविड अशा दोहोंनाहि सारखेंच महत्त्व आहे. मराठ्यांचीं दोन प्रसिद्ध देवस्थानें जोतिबा व खंडोबा हीं होत. पैकीं जोतिबा आर्य असून खंडोबा द्रविड

---

१. या विषयाचें उद्बोधक विवेचन भास्करराव जाधव यांनीं विविधज्ञानविस्तारांत (१९३१) 'मराठे आणि त्यांची भाषा' या निबंधांत केलें आहे.

आहे. जोतिबा हें शिंद्याचें दैवत. तें दैवत घेऊनच शिंदे उत्तरेकडून म्हणजे सिंधमधून महाराष्ट्रात आले असें कऱ्हाड येथील शिंद्याच्या कोरीव लेखावरून दिसतें. जोतिबाच्या जयजयकारात 'चाम मला' असा घोष करतात, तर सिंधमध्ये ' चंगामला ' हें ' कसें काय, ठीक आहे ना ? ' या अर्थी दोन माणसें भेटलीं असता एकमेकाना नमस्कार करताना म्हणतात. जोतिबा म्हणजे ज्योतीचा देव. सिंधमध्यें प्राचीन मंदिरात देवाच्या स्थानीं ज्योतच असे, मूर्ति नसे. अहोरात्र ज्योत जळत असावयाची व तेंच देवाचें प्रतीक होय. सिंधमधून आलेल्या आर्यांनीं आपल्याबरोबर आणलें तें हें ज्योतीचेंच दैवत असावें. त्याचें नाव जोतिबा पडलें. ज्याचेबरोबर तें आलें ते सिंधमधून आले म्हणून त्याचें नाव शिंदे पडलें असावें असें भास्करराव जाधव यानीं प्रतिपादिले आहे पुढें जोतिबाच्या मंदिरांत मूर्ति स्थापन होऊन दिव्याचें रूपातर नंदादीपात झाले. दीपपूजेचा प्रकार आपल्यात आजहि दिव्याच्या अवसेच्या रूपानें शिल्लक आहे.

एवंच, जोतिबा हे उत्तरेकडून आले असावेत. खंडोबा दक्षिणेकडून आले असावेत. कारण खंडोबा किंवा स्कंद याचा संप्रदाय उत्तरेकडे मुळींच नाहीं आणि दक्षिणेंत जारी आहे. जेजुरीचा खंडोबा व द्रविडातील 'सुब्रह्मण्यम्' हीं दैवतें एकच असावींत. खंडोबा म्हणजे स्कंदपिता अर्थात् शंकर होय. व तो वैदिक होय असें चिंतामणराव वैद्याचें म्हणणें आहे. पण हा शब्दच्छल दिसतो. खंडोबा या शब्दातील बा याचा अर्थ पिता असाच घेतला पाहिजे असें नाहीं. चिंतोबा या शब्दातील 'बा'प्रमाणें तो नुसता सन्मानदर्शक असा घेतला म्हणजे झालें. शिवाय खंडोबाची तळी उचलतांना ज्या शब्दाचा गजर केला जातो तो शब्द 'येळकोट' आपण जसाचा तसा द्रविडापासून घेतला आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. दोन्ही दैवतांतील आणखी एक साम्य म्हणजे दोन्हींच्या परिचारिका वेश्या आहेत हें होय. सुब्रह्मण्याला ज्यांनीं द्रविडदेशातून महाराष्ट्रात आणला त्यांनीं त्याची देवदासी पद्धतीहि इकडे आणली व तिला येथें मुरळीचें रूप दिलें. कार्तिकेय हा स्त्रीजातीचा द्वेष्टा असला तरी सेनापति असल्यानें देवसेना ही त्याची पत्नी मानण्यांत आली होती. यामुळें

सुब्रह्मण्याचा उल्लेख 'वल्लीदेवसेनासमेतसुब्रह्मण्याय नमः' असा करतात.[१] येणेंप्रमाणें महाराष्ट्रात आर्यद्रविडाचा संगम झालेला आहे.

आपल्या संस्कृतीचें स्वरूप असें मिश्र असताहि आपण तिला वैदिक आर्य-संस्कृति म्हणूनच समजतों. संस्कृतीचा प्रवाह हा नदीच्या प्रवाहा-प्रमाणे होय. कडेकपारींतून उगम पावून समुद्रास जाऊन मिळेपर्यंत नदी एकरूप दिसली तरी या नदीला अंतराअंतरावर अनेक नद्या, ओढे, नाले मिळत असतात. तीच स्थिति संस्कृतिगंगेची होय. अनेक लहानमोठ्या नद्यांची मिळून एक महानदी होत असताहि फार दूर प्रदेशातून येणाऱ्या एका नदीचेंच अभिधान तिला प्राप्त होते. आपल्या किंवा कोणत्याहि संस्कृतिगंगेची अशीच स्थिति आहे. आज भारतीय संस्कृति ही वैदिक संस्कृति होय अशी आपणामध्यें भावना आहे ती याच अर्थानें. कारण पाच हजार वर्षें होऊन गेलीं तरीहि आजचे लोक, निदान ब्राह्मण, हे आपले कांहीं संस्कार पाच हजार वर्षांपूर्वी जसे करीत तसे आजहि करीत आहेत. इतकेंच नव्हे तर मुखोद्गत वेदपद्धतीमुळें त्या संस्कारप्रसंगीं म्हटले जाणारे मंत्र हेहि जवळ जवळ जसेच्या तसेच म्हटले जात आहेत.[२] आणि ब्राह्मणेतरांत जेथें संस्कार पौराणिक पद्धतीनें होतात तेथेंहि पुराणें हीं वेदाचें उपबृंहण करणारीं आहेत अशी समजूत कायम आहे. यामुळें धार्मिक संस्काराबाबत वैदिक संस्कृतीची छाप सर्व समाजावर कायम आहे. वैदिक यज्ञाचा नभोमंडलव्यापी धूमधडाका नष्ट झाला असला तरी अग्निहोत्र्याच्या वेदींत वैदिक अग्नि अजूनहि अल्प प्रमाणात धुमसत आहे. असली पाच सात हजार वर्षांची अखंड परंपरा अन्य संस्कृतींना लाभलेली नाहीं. इराकमध्यें इष्टिका-लेख सापडले पण तें वाङ्मय मुखोद्गत असणारे तर नव्हेच पण जाण-णारेहि लोक आज नामशेष आहेत. क्रीटमध्यें लेख सापडले आहेत त्यांची तर भाषाहि अद्याप नीट समजली नाहीं. ईजिप्तमध्यें पुरातन संस्कृति

---

१. Original Inhabitants of India p. 16 by G. Oppert.

२. प्राचीन काळीं वेदांच्या ज्या अनेक शाखा झाल्या त्यांत पाठांतरें निर्माण झालीं. पण पुढें जटाघन वगैरे प्रकारांनीं बांधून टाकल्यावर नवीं पाठांतरें उत्पन्न होण्याचें बंद झालें.

होती पण तिचे अविच्छिन्न परंपरेचे वारसदार आज कोणी नाहींत. पण पांच सात हजार वर्षांपूर्वीचे वेद मुखोद्गत असणारे व वैदिक संस्कार-अखंड परंपरेनें चालविणारे ब्राह्मण हिंदुस्थानात आहेत. तात्पर्य, मिश्र असूनहि अखंड अशी ही भारतीय संस्कृति आहे. हें अखंडत्व कोणत्या प्रक्रियेनें आपल्या पूर्वजांनीं साधलें हें पुढील प्रकरणीं बघूं.

प्रकरण बारावें

# एकीकरणाची प्रक्रिया : सहिष्णुता व संग्राहकता



भारतीय संस्कृतीच्या इमल्यावर वैदिक संस्कृतीचा चुन्याच्या हात बाहेरून सर्वत्र दिलेला असला व त्यामुळें ती एकजिनसी दिसत असली तरी तिचें अंतरंग पाहूं गेलें असता ती अनेक स्थलींच्या मालमसाल्यानें बनविलेली आढळून येते हें मागील प्रकरणीं आपण पाहिलें. आता हा मालमसाला कोणत्या प्रक्रियेनें एकरूप, एकसंध साधला गेला हेंहि थोडें पाहूं या; म्हणजे आपल्या संस्कृतिसंघटनाच्या प्रयोगाचें अंतरंग अधिक स्पष्ट होईल. या प्रक्रियेचें स्वरूप प्रारंभींच सूत्ररूपाने सांगावयाचें म्हणजे **सहिष्णुता व संग्राहकता** या दोन वृत्ति या ह्या प्रक्रियेच्या विणींतील ताणा आणि बाणा होत येवढें सांगितलें म्हणजे पुरे. या ताणा-बाण्याचीं सूत्रेंच आता इतिहासाच्या हस्तानें उकलून पाहूं या.

या दोन्ही प्रवृत्ति थेट सिंधु संस्कृतिकाल व वैदिक कालापासून थोड्या-फार प्रमाणात दिसून येतात. प्रथम प्रथम कटकटी थोड्या झाल्या नाहींत. वेदिक वाङ्मय हें तर आर्य व अनार्य यांच्यातील लढ्याच्या खणखणाटानें सर्वत्र दुमदुमलेलें आहे. पण कालान्तरानें वरील प्रकारच्या प्रवृत्तीच्या जोरावरच भरतखंडासारख्या अफाट देशावर एकजिनसी संस्कृतीचा ठसा आपले पूर्वज उमटवूं शकले. परकीयांचे हल्ले चालू असता, आजच्यासारखीं दळणवळणाचीं साधनें उपलब्ध नसता, देश भिन्न भिन्न बोलींनीं विभागला असता, जैन, बौद्ध, तांत्रिक, नास्तिक, शाक्त वगैरे अनेक पंथानीं धार्मिक बुद्धीला अनेक पंथ फुटले असतां, आसेतुहिमाचल एकच संस्कृतीचें छत्र उभारण्यास भारतीयाची सहिष्णुता व संग्राहकता हीच कारणीभूत झाली. आणि याच जोडगोळीच्या जोरावर

आचार-विचाराच्या भिन्न भिन्न प्रांतांत मतभेद व हितविरोध यांना पायबंद घालण्याचा त्यांनी प्रयत्न केला. हा त्यांचा प्रयत्न सर्वच क्षेत्रांत पूर्ण निर्दोषी ठरला नसला तरी खंडतुल्य भरतखंडांत कांहीं बाबतींत एकरूपत्व उत्पन्न करण्याइतकें श्रेय त्यांनी संपादन केलें येवढें सर्वमान्य होण्यासारखें आहे.

प्रथम सहिष्णुतेचा आविष्कार पाहूं या. सहिष्णुतेच्या कसोटीचें मर्मस्थान धर्म हें होय.

या धर्माच्या प्रांतांतच सहिष्णुतेला तिलांजलि देणारी तामसी प्रवृत्ति सर्वांत तीव्रतम आढळावी हा एक आश्चर्यकारक प्रकार होय. मनाच्या तामसी स्वैरवृत्तींचें दमन करण्याकरितां ज्या मानवी संस्थांनीं श्रेष्ठ कामगिरी बजावली आहे त्या संस्थांत धर्मसंस्थेचें स्थान अग्रपूजेचें आहे. पण मनाच्या वृत्ति मारूं जातां त्या मारल्या न जातां फक्त दडून बसतात हा जो मानसशास्त्राचा सिद्धान्त आहे तो या धर्माच्या प्रांतांत उत्तम प्रत्ययास येतो. तामसी वृत्ति ही एकीकडे मारून टाकण्याचा प्रयत्न करतां करतां, ती एका प्रांतांत नष्ट झालेली दिसली तरी दुसरीकडे कोठें तरी उमटतेच. आणि कांहीं वेळां अशी जोरानें उसळी मारते कीं ज्याचें नांव तें! धार्मिक वृत्तीचा कर्मठ माणूस तामसी व कोपिष्ट असावा हा अनुभव दुर्मिळ नाहीं. उपासतापास, व्रतेंवैकल्यें, देहदंडन तो अनेक सोशील पण त्या सोशींत राहतां राहतां त्याची वृत्ति अशी चिडखोर बनत असते कीं त्याच्या कर्मठपणाच्या रेखीव आयुष्यक्रमांत थोडासा कोठें व्यत्यय आला तरी त्याचें माथें भणाणल्याशिवाय रहात नाहीं. तिन्हीं त्रिकाळ आणि बारा मास दडपून ठेवलेल्या मानसिक वृत्ति अशा वेळीं जणों एकदम धडाक्यानें पेट घेतात.

हीच स्थिति समाजाचीहि दिसते. धर्मानें घालून दिलेली नीति--अनीतीची व सत्यासत्यतेची शिस्त समाज पाळतो तो स्वार्थी व सुखलोलुप भावनांना दटावून दडपून पाळीत असतो. पण ही शिस्त पाळीत असतां त्या शिस्तीविषयींच असा एक दुर्दम अभिनिवेश समाजामध्यें उत्पन्न होतो कीं त्या शिस्तीच्या पलीकडे कोणीं पाऊल टाकलें कीं त्याला शासन करण्याच्या वेळीं आपण सोसलेल्या सर्व बंधनांचा जणूं तो सूडच

उगवूं लागतो. व्यक्ति वा समाज शिस्तीचें जूं मानेवर वागवितो तो होसेनें नव्हे तर नाइलाज म्हणून. जोपर्यंत आपणाबरोबर इतरांच्याहि मानेला रग लागलेली आहे असे त्याला दिसत असतें तोपर्यंत तो फारशी कुरकुर करीत नाहीं. पण कोणा चुकारानें शिस्तीचे जूं मानेवरून जरा फेकून दिलेले त्याला दिसले कीं त्याचे माथे फिरलेच ! मग त्याच्या स्वतःच्या मानेला लागलेल्या रगीचा सर्व राग त्या बेशिस्तावर उगवून घेणें हा आपला हक्क आहे असे तो प्रतिपादन करतो. इतकेंच काय पण पाखंडाना शिक्षा करणें ही देवाची सेवा, भक्ताचें पवित्र कर्तव्य, पुण्याची जोड असेहि बरळण्यास तो कमी करीत नाहीं !

मनुष्यस्वभाव येथून तेथून सारखाच असल्याने साहिष्णुतेचें आख्यान या अध्यायात लावावयाचे असले तरीहि हे आधींच सांगून टाकतों कीं धार्मिक छळाचे प्रकार हिंदुस्थानातहि अगदींच घडले नाहींत असे नाहीं. पण इतर देशातील घोर प्रकार ध्यानीं घेतले असता हिंदुस्थानातील प्रकार काहींच नव्हत असे वाटावे असा मात्र प्रकार आहे.

## धर्मच्छलाचीं तुरळक उदाहरणें

इतिहासाला मुद्दाम खोदून खोदून विचारलेत तर हिंदुस्थानच्या इतिहासातील धर्मच्छलाचीं काहीं थोडीं उदाहरणें तो तुम्हाला सांगणार नाहीं असे नाहीं. अगदीं सत्ययुगामधील रामावताराचा काळ घेतला तरी त्या काळात तपश्चर्या करणाऱ्या शंबुकाचा रामाने कसा वध केला ही कथा आपणा सर्वांना माहीत आहे. त्या कथेंत धार्मिक जुलमाचा पुरावा आहे असें मानणे काहीं चूक होणार नाहीं. तसेंच बौद्ध, जैन आणि वैदिक ह्या धर्मांची चढाओढ सुरू झाल्यावर व त्या त्या धर्मांना उचलून धरण्याला राजे मिळाल्यावर जुलूमजबरदस्ती कोठेंच झाली नसती तर तो एक चमत्कारच ठरला असता. या जुलमाचीं काहीं उदाहरणे इतिहासांत नमूदही आहेत. पण तीं फार थोडीं हाच खरा चमत्कार ! कालिदासकृत 'मालविकाग्निमित्रम्' या नाटकातील नायक जो अग्निमित्र त्याचा बाप पुष्यमित्र हा शकपूर्व दुसऱ्या शतकातील मोठा पराक्रमी राजा होऊन गेला. याच्या राज्यांत बौद्धाचा छळ झाला असल्याचें वाङ्मयात नमूद आहे.

त्यानें यवनांचा पराभव केला आणि आपलें सार्वभौमत्व जगजाहीर करण्याकरिता अश्वमेध यज्ञ केला. अशा यज्ञामध्ये अनेक पशूंचा संहार होई. व त्यावर बौद्धजैनांचा कटाक्ष असल्यामुळें यज्ञविधीच्या ते सर्वस्वीं विरुद्ध असत. अश्वमेधासारख्या प्रसगीं या विरोधाला तीव्र स्वरूप येत असावें व उलट बाजूनें तीव्र प्रतिकारहि होत असावा. पुष्यमित्राच्या हातूनहि ह्या प्रसंगीं बौद्धांचा छळ झाला असावा असे 'मंजुश्रीमूलकल्प' व 'दिव्यावदान' ग्रंथावरून दिसतें. मंजुश्रीकार लिहितो कीं, 'नाशयिश्यति तदा मूढः विहारान्धातुवरास्तथा' ( श्लोक ५३१ ). तारानाथाच्या 'दिव्यावदान' ह्या ग्रंथाप्रमाणें वर्णन करावयाचें म्हणजे तर पुष्यमित्राने बौद्धांचा अगदीं आसुरी सूड उगविला, मगधापासून पंजाबपर्यंत मठ जाळले, आणि श्रमणांची कत्तल केली, असे वर्णन केलें पाहिजे. तारानाथाचा ग्रंथ अद्भुतरसावर उभारलेल्या भारूड कथानीं बराच भरलेला असल्यामुळे वरील वर्णनात अतिशयोक्तीबद्दल फार मोठा आकडा बाद घालावा लागेल. पण तो घातला म्हणजे विकल्याशिवाय विकत नाहीं या न्यायाने या छळाच्या हकीकतींतहि काहीं सत्याचा भाग असावा असें इतिहासकार स्मिथप्रमाणें[1] कोणीहि म्हणेल. याच तारानाथानें मारवाडच्या कोणा हर्ष राजानें केलेल्या जुलमाविषयीं लिहून ठेवलें आहे कीं, त्यानें मुलतानजवळ एक लाकडी हवेली बांधली, तीमध्यें बारा हजार विधर्मीयाना फूस लावून आणलें, व मग त्या लाकडी हवेलीला आग लावून आतील बारा हजार लोक व त्यांचे धर्मग्रंथ याना अग्नीस अर्पण केले. हा अत्याचार सहाव्या शतकात घडला असावा. पुढील शतकात बंगालचा राजा शशांक यानेंहि आसुरी वृत्ति प्रकट केल्याचें दिसतें. हा राजा शैव असून बौद्ध धर्माचा द्वेष्टा होता. यानें बुद्धगयेंतील परमपवित्र मानला गेलेला वृक्ष उपटून टाकिला, पाटलिपुत्रातील बुद्धाच्या पादुका फोडून टाकिल्या, नेपाळच्या हद्दीपर्यंत अनेक मठ उद्ध्वस्त केले, व भिक्षूंना देशोधडीस लावलें. याच शतकात दक्षिणेकडेहि छळाची वावटळ उमटलेली दिसते. पाड्यांचा राजा नेदुमारण हा जैन असून त्यानें शिवभक्त चोलराजाच्या कन्येशीं विवाह केला. पुढें राणीच्या वजनानें राजाने जैनधर्म टाकून शैवधर्म. स्वीकारला. पण

१. Early History of India by V. Smith.

धर्मांतर करणाऱ्याच्या अंगात नवधर्माविषयीं जो अतिरिक्त अभिमान उत्पन्न होतो तसा त्याचे ठिकाणीं उत्पन्न होऊन त्यानें आपल्या पूर्वधर्मीयांवर शस्त्र धरलें; आणि थोड्याथोडक्या नव्हे तर आठ हजार जैनांना सुळावर चढविलें. आणि या भीषण घटनेची स्मृति नष्ट होऊं नये म्हणूनच जणू ज्या ठिकाणीं हा अनन्वित प्रकार घडला त्या मदुरेच्या मीनाक्षी मंदिरातील हैमपद्म सरोवरावरील मंडपाच्या भिंतीवर तिरुज्ञान संबंदर याच्या प्रोत्साहनानें या प्रसंगाचीं चित्रें काढलेलीं आहेत; आणि मंदिरात होणाऱ्या वार्षिक बारा उत्सवापैकीं पाच उत्सवात या धर्मच्छळाचें नाटक करण्यात येतें.[१]

अग्निकुलोत्पन्न रजपुतानींहि बौद्धाचा छळ केला असावा असें दिसतें. भाविष्यपुराणातील प्रतिसर्गपर्वात म्हटलें आहे कीं चार लाख बौद्धांना दिव्यास्त्रानीं हाणून काढण्यात आलें. 'अशोकं स्ववशं चक्रुः सर्वे बौद्धा विनाशिताः। चतुर्लक्षाः स्मृताः दिव्यशस्त्रैः प्रहारिताः॥'

## युरोपमधील धर्मच्छळ

धर्मच्छलाचा इतिहास मुद्दाम पाहूं लागलें तर आणखी अशाच प्रकारचीं काहीं थोडकीं उदाहरणें सापडतील; पण तीं एकंदरींत तुरळकच. युरोपमधील धर्मच्छलाचा वणवा पाहिला, इन्क्विझिशन किंवा अन्वीक्षामंडळ या धार्मिक संस्थेनें घातलेला धुडगुस अवलोकिला, या संस्थेचा उत्पादक तिसरा इ॰ संट (किती सात्त्विक नाव!) याच्या एकट्याच्याच हुकुमानें सत्तावीस हजार पाखंड्यांना कंठस्नान घालण्यात आलें हें ध्यानीं घेतलें, म्हणजे हिंदुस्थानचे लोक धार्मिक बाबतींत इतके मिळते कसे घेत याचेंच परकीयांना आश्चर्य वाटे. अन्वीक्षामंडळानें तर पाखंडी हुडकून काढून त्याला ठेचून काढावयाचें कंकणच बांधलें होतें. आणि पाखंड सिद्ध कसें करावयाचें? तर कोणींही दोन उपटसुंभानीं तशी साक्ष दिली कीं झालें सिद्ध! त्या दोन माणसाचीं नांवेंसुद्धा कळवावयाचीं नाहींत. त्यानीं साक्ष गुप्तपणें द्यावयाची. इनसाफ करणाऱ्या न्याया-

१. Studies in South Indian Jainism by Ayyangar & Rao, p.79.

धिशाचीं तोंडें दिसू नयेत म्हणून तेही बुरखा घालून बसत. आरोपीला दहशत बसावी म्हणून हाल हाल करणारीं हत्यारे कोर्टात समोर माडून ठेवीत. आणि झटपटीने इनसाफ होऊन हजारो पाखडयाची यमलोकीं रवानगी होई. खुनशीपणा तर इतक्या थराला गेला होता कीं चौकशी चालू असता मृतापैकीं कोणी पाखडी होता असें आढळून आलें तर त्याचें प्रेत उकरून त्यास सुळावर चढवून दिलें जाई ! यमाला देखील या पाखड्याची सोय लावणे अवघड गेले असेल. कारण त्याची संख्या निरनिराळ्या इतिहासकाराप्रमाणे पाहिले असता पन्नास हजार ते तीन लाखपर्यंत होती. आणि हे पाखंडी कोण ? ख्रिश्चन धर्माच्या बाहेरचे ? छे ! ते सर्व येशूच्याच कळपातले येशूचेच निष्ठावंत भक्त ! म्हणजे असें कीं जो पथ सत्ताधिष्ठित असेल तो सत्पथ आणि त्याशिवाय बाकी सर्व पाखंडी ! अशा रीतीनें मानिकियन, आरियन, प्रिस्कीलियन, पालीयन, बोगोमाईल्, काथुरी, वाल्डेन्शियन, आल्बिजेन्शियन, लोलार्ड, हुस्साईट वगैरे जे अनेक पंथ ख्रिश्चन धर्मामध्येंच उदयास आले त्या सर्वांवर सत्ताधिष्ठित रोमन कॅथॉलिक पंथाने शतकानुशतकें तरवार धरली होती. त्यातही मौज अशी कीं या पाखड्यांचीं मते पाहिलीं तर त्याचा मुख्य गुन्हा कोणता म्हणाल तर त्याचीं मते सत्ताधीश पोपमहाराजापेक्षा येशूच्या शिकवणीला अधिक धरून होतीं हा होय ! पोपमहाराज हे ऐश्वर्यसंपन्न प्रासादात नृत्यागनाच्या परिवारात विलासी रीतीने आयुःक्रमण करीत तर हे भोळसट पाखंडी ब्रह्मचर्य आणि वैराग्य याची कास धरीत ![1] अन्वीक्षामंडळाची स्पेनमधील कामगिरी खुद्द सैतानाला लाजवील अशी होती. या मंडळाचा अध्यक्ष तार्कीमीदा या एकट्यानेंच आठ हजार आठशे पाखंड्याना चितेवर चढविले म्हणतात. कोणी पाखडी पळून गेलेच तर त्याच्या निदान प्रतिमा करून तरी तो जाळी. तशा प्रतिमा तार्कीमीदानें साडेसहा हजार करून जाळल्या आणि नव्वद हजाराना निरनिराळीं प्रायश्चित्ते लावून दिलीं. यानेच ज्यू लोकावर देश सोडून जाण्याचा हुकूम काढला आणि त्या हुकुमान्वयें तीन लाख ज्यूंना हद्दपार केलें. परलोकात गेलेले पाखंडीही याच्या हातून सुटले नाहींत. कारण

१. 'The Horrors of Inquisition' by Joseph McCabe.

मेलेल्या पाखंड्याचा— दोन दोन, तीन तीन पिढ्यापूर्वी मेलेल्या पाखंड्याचाही— इन्साफ होई, व त्यांचीं प्रेतें उकरून काढून त्याना जाळीत आणि बापजाद्याच्या काल्पनिक पापाबद्दल मुलानातवंडाची जिंदगी जप्त करून त्याना देशोधडीस लावीत.[1]

युरोपातील धर्मच्छलाचे हें तारागण पाहिलें म्हणजे सहिष्णुतेचेच शिफारसपत्र ग्रीक मेग्यास्थेनिस, चिनी फाहीयेन, मुसलमानी अल्बेरुणी आणि युरोपियन स्मिथ या सर्वांनीं एकमुखाने हिंदूना का दिलें आहे हें लक्षात येईल.

भरतखंडात वैदिक, बौद्ध, जैन, लिंगायत, मानभाव, शैव, वैष्णव, गाणपत्य, शाक्त वगैरे अनेक धर्मपंथ होऊन गेले. या पंथामध्यें चुरस, मत्सरही नादत नव्हता असें नाहीं; पण त्या त्या काळीं राजसत्तेचें पाठबळ असताहि या मत्सराग्नीने युरोपातील प्रचंड वणव्याचे स्वरूप धारण केले नाहीं, ह्यावरून सहिष्णुतेची वृत्ति भारतीय संस्कृतींत उत्पन्न झाली होती याशिवाय दुसरें अनुमान काय निघेल ?

नुसत्या एकाच धर्मातील अनेक देवताचे एकीकरण करून ईश्वरैक्याची कल्पना स्थापणें ही गोष्टहि किती अवघड आहे हे परकीय इतिहासाकडे पाहिले असता लक्षात येईल. इजिप्तमध्ये व पॅलेस्टाइनमध्ये हिंदुस्थानातल्याप्रमाणे एकेश्वरी कल्पना अमलात आली होती. पण तिच्याकरिता जुलमाचे अस्त्र पाजळण्यात आले होते. याविषयी डायमेन लिहितो कीं, " पॅलेस्टाइन म्हणजे ज्यू लोकाच्या देशात देवताचे एकीकरण घडवून आणलें खरें; पण तें कसें घडवून आणले ? तर आपला देव जो जेहोवा त्याशिवाय इतर देवतावर कडकडीत बहिष्कार घालून आणि इतर देवतोपासकाचा भयकर छळ करून ! परतु हिंदुस्थानात एकेश्वरत्व नसलें तरी अद्वैत हें अधिक सात्त्विक अशा तत्त्वज्ञानविचाराच्या मार्गानें म्हणजे नानात्वाच्या झिरझिरीत पडद्यातून त्यामलीकडे असणारें एकत्व पाहून वैदिक ऋषींनीं सिद्ध केलें.[2]

---

१. 'Torquemada and the Spanish Inquisition' by Clement Wood.

२. समग्र केळकर—१२-६२५.

आता हिंदुस्थानात धार्मि‍क सहिष्णुता कशी नादत होती हें छळ करण्याची सत्ता व साधनें ज्यांच्या हातीं होतीं त्या राजे लोकांनीं भिन्नधर्मीयानासुद्धा आपला उदार आश्रय कसा दिला यावरून पाहूं.

## सहिष्णुतेची जोपासना

सहिष्णुतेच्या पुरस्कर्त्यांच्या गणनाप्रसंगीं अगदीं प्रथम कोणा सम्राटाचें स्मरण होईल तर ते अशोकाचे. धार्मिक समतेचा पूर्णावतार कोठें झाला असेल तर तो अशोकामध्येच.

त्याच्या राज्यात धर्माचरणानें भेरीघोष मागें पडून धर्मघोष दुमदुमूं लागला. 'भेरीघोसो अहो धमघोसो।'[1]

अशोकानें आपलीं धर्मतत्त्वें आणि नीतितत्त्वे याचा सार्वत्रिक प्रसार करण्याकरिता देशाच्या चारी दिशाना शिलालेख खोदून ठेवले. असे लेख पश्चिमेस ठाण्याजवळील सोपारे, काठेवाडातील गिरनार, उत्तरेस सीमाप्रातात मन्सेरा व शाहबाजगढी, डेहराडून जिल्ह्यात कालसी, पूर्वेस जगन्नाथपुरी जिल्ह्यात धौली व कर्नूळ जिल्ह्यांत येरगुडी, म्हैसूरजवळ मस्की वगैरे अनेक स्थलीं सापडले आहेत. हे सर्व लेख अशोकाची सहिष्णुवृत्ति जगाला पुकारीत ऊन पाणी खात आज शेंकडो वर्षें निष्ठेने उभे आहेत. नमुन्याकरिता त्याचा बारावा शिलालेख (शहाबाजगढ प्रत) वाचा. त्यात अशोक सागतो कीं 'देवाचा लाडका प्रियदर्शी राजा हा सर्व धर्मपंथाच्या गृहस्थाचा आणि संन्याश्याचा सत्कार करितो. हा सत्कार दान व पूजा यानीं पूर्ण होतो असें तो मानीत नाहीं. तर जेणेंकरून सर्व धर्मपंथाची सारवृद्धि होईल, उत्कर्ष होईल तो खरा सत्कार असें त्याचे मत आहे. उत्कर्ष बहुविध असतो. पण त्या सगळ्याचें मूळ म्हणजे वाक्संयम हें होय. का ? तर वाक्संयमाच्या योगानें आपल्या पंथाचा गौरव व परपंथाची गर्हणा करण्यास निष्कारण कोणी सहसा प्रवृत्त होणार नाहीं. प्रसंगविशेषीं किंचिन्मात्र वाग्दोष घडेल तेवढाच. म्हणून नानाप्रकारांनीं

---

१. चवथा प्रस्तारलेख (गिरनार)–(Select Inscriptions by Sirkar, p. 21.)

परपंथीयांचा गौरव करीत जावा कारण असें केल्यानें आपल्या पंथाची वृद्धि होते. त्याच्या उलट वागण्यानें आपला पंथ क्षीण होतो आणि परपंथाला अपकार होतो. जो कोणी स्वपंथाचा गौरव व परपथाची गर्हणा करितो तो स्वपंथावरील भक्तीनेंच करितो. का कीं असें केल्यानें स्वपथाला मी तेजस्वी करीत आहें अशीच त्याची भावना असते. पण वस्तुतः ह्या वागणुकीनें तो आपल्या पंथाचा उपहास मात्र करीत असतो. तात्पर्य,संयम हाच श्रेष्ठ. एवच सर्वपंथीयांनीं परस्पराचीं धर्ममतें लक्षपूर्वक ऐकावीं व एकमेकाची सेवा करावी आणि त्यामुळें सर्व पंथाचे उपासक बहुश्रुत व उदारबुद्धि व्हावे अशी देवाना प्रिय असलेल्या या राजाची इच्छा आहे....'[1]

पुढच्या शतकातला कलिंगराज खारवेल हाही आपणास 'सवपासंड-पूजको सवदेवायतनसकारकारकः' असें म्हणून घेतो.[2] इसवी सनाच्या प्रारंभीं राज्य करणारे शातवाहन राजे हे वैदिक धर्माचे अनुयायी होते. त्याच्यातील गौतमीपुत्र हा ब्राह्मणाचा रक्षणकर्ता म्हणून प्रसिद्ध आहे. पण या राजाच्या कारकीर्दीतहि बौद्ध यतींचा योगक्षेम नीट चाले. त्याची साक्ष देण्यास आपल्या महाराष्ट्रांतीलच कालें, भाजें वगैरे ठिकाणचीं लेणीं अद्यापहि उभीं आहेत. दुसऱ्या शतकातील या राजानीं अश्वमेध व गवामयन यज्ञ केले यावरून त्याची वैदिक धर्मनिष्ठा स्पष्ट दिसून येते. पण त्यानीं बुद्धभिक्षूकरिता लेणीं बांधलीं व त्याना नव्या कफन्या दरवर्षी देण्याकरिता एका श्रेणीला कायमचा भत्ताहि दिला होता. मलबार-च्या प्राचीन राजानीं याच कालात खिस्त्यास व यहुद्यांस आपल्या धर्मा-प्रमाणें वागण्यास परवानगी दिली व तद्विषयक ताम्रपट दिले. पुढें सहाव्या शतकातील चालुक्य राजे हेहि वैदिकधर्माभिमानीच होते. या घराण्यांतील सुप्रसिद्ध पुलकेशीयानें तर अश्वमेध यज्ञ केला. पण याच घराण्यांतील दुसऱ्या विक्रमादित्यानें एका जैन मंदिराचा जीर्णोद्धार करून जैनपंडिताला देणगी दिली असेंहि इतिहास सागतो. मगधाचे गुप्त राजे वैदिक धर्माचे अभिमानी असून समुद्रगुप्तानें अश्वमेधहि केले. ते स्वतःला परमभागवत

---

१. Select Inscriptions, p. 33.

२. हाथी गुफा लेख - Select Inscriptions, p. 211.

म्हणवीत. पण दुसरा कुमारगुप्त आणि बुधगुप्त यांनीं सारनाथ येथें बुद्धाच्या मूर्ति स्थापल्या.[1] ठाणेश्वराचा हर्षवर्धन हा म्हातारपणीं तरी बौद्ध होण्याच्या बेतात आला होता. तरी या दोन राजवटींत हिंदुस्थानात येऊन गेलेल्या चिनी प्रवाश्यानीं लिहिलेल्या हकीकतीं-वरून पाहता दोन्ही रियासतींत धर्मच्छल कोणत्याच पंथाला सोसावा लागत नव्हता. फाहीयेन आणि युवानच्वंग हे चिनी प्रवासी अनु-क्रमें चद्रगुप्त व हर्षवर्धन याच्या कारकीर्दींत भरतभूमीची तीर्थयात्रा करून गेले. पण दोघानाहि वैदिक धर्म आणि बौद्धधर्म गुण्या-गोविंदाने शेजारीं शेजारीं नादत असताना आढळले. गुप्तघराणे वैदिक धर्माभिमानी असताहि या घराण्यातील नरसिंहगुप्तानें नालद येथे बौद्धमठ बाधला. हर्षवर्धनाच्या कारकीर्दींत जनतेमध्यें वैदिक आणि बौद्ध या पंथात थोडा मत्सर असे. बौद्धधर्मीय युवानच्वंगचा हर्षानें केलेला गौरव वैदि-काना आवडला नाहीं, तरीहि खुद्द राजा हर्ष यानें दोन्ही पथाविषयीं समतोल वृत्ति राखली होती. हर्षाचा चरित्रकार बाणभट्ट हा वैदिकधर्मीय असून त्यानेंहि बौद्धांविषयीं अनुदार उद्गार कोठेच काढलेले नाहींत. उलट हर्षचरितातील दिवाकरमित्राच्या आश्रमात मोठा मेळा जमला होता, त्यात भिक्षु, भागवत, केशलुंचक, कापालिक, लोकायतिक असे नानापंथी लोक होते असें त्यानें वर्णन केलें आहे. असल्या याद्या संग्राहक स्वरूपा-च्या असतात हें खरें पण त्यातहि सहिष्णुवृत्ति दिसून येतेच.

खुद्द हर्षाच्या कुटुंबात धार्मिक सहिष्णुता फार उच्च दर्जाला गेलेली आढळते. हर्षाच्या कुटुंबात कोणीं कोणत्या देवतेला भजावें किंवा कोणीं कोणत्या धर्माची दीक्षा घ्यावी याविषयीं पूर्ण स्वतंत्रता होती. हर्षाच्या पूर्वीच्या तीन पिढ्यात उपास्यदैवत आदित्य होतें तर खुद्द हर्ष आपणास परममाहेश्वर म्हणजे शिवभक्त म्हणवीत असे आणि हर्षाची बहीण राज्यश्री ही बुद्धसंघांत सामील झाली होती ! युवानच्वंगानें वर्णिलेल्या एका प्रसंगा-वरून तर हर्षाच्या राज्यातील धर्मसहिष्णुतेचें स्वरूप ठळक रीतीनें नजरेस येतें. सम्राट् हर्ष हा आपल्या अलोट संपत्तीचा दर पांच वर्षांनीं दानधर्म करी. याचा उल्लेख मागें आलाच आहे. (पृ. १२०). या विश्वजित् यज्ञ-

१. History of the Guptas by Dr. R. N. Dandekar, p. 190.

प्रसगीं संपत्ति वाटण्यात येई ती धार्मिक पंथापथामध्यें कोणताहि भेदभाव न करता वाटण्यात येई. चिनी यात्रेकरू हजर होता तो हर्षाच्या कारकीर्दीतील सहावा प्रसंग होता (इ. स. ६४३). त्याने लिहून ठेवलेलें या उत्सवाचें वर्णन हें साक्षात् सहिष्णुतादेवीच्या उत्सवाचेच वर्णन होय ! या महोत्सवाकरिता प्रयाग येथे विस्तीर्ण मंडप घातला होता. एकंदर कार्यक्रम ७५ दिवस चालू होता. सुमारे चार पाच लाखाचा मेळा जमला होता. त्यात सर्व धर्मांचे, सर्व पंथाचे लोक उपस्थित होते. उत्सवातील कार्यक्रमहि सर्वधर्मसग्राहक असाच होता. पहिल्या दिवशीं मंडपात अग्रमार्गी बुद्धाची प्रतिमा स्थापण्यात आली, दुसऱ्या दिवशीं अग्रभागीं सूर्याची प्रतिमा ठेवण्यात आली, आणि तिसऱ्या दिवशीं मुख्य मान देण्यात आला ती प्रतिमा शिवाची होती ! चौथा दिवस बुद्धभिक्षूच्या दानसंतर्पणाकरिता राखून ठेवला असून पुढें वीस दिवस ब्राह्मणाची संभावना करण्यात आली. यानंतर निरानिराळ्या बारीकसारीक पंथाच्या भक्तांना मुक्तद्वार ठेवण्यात आले, आणि शेवटीं अनाथ, अपंग अशाचाहि योग्य परामर्श घेण्यात आला.[१] धार्मिक सहिष्णुतेचा हा एकंदर प्रकार अपूर्व नाहीं असें कोण म्हणेल ?

राष्ट्रकूटानीं हीच परंपरा चालविली. पहिला अमोघवर्ष हा जैन धर्मानुयायी असताही राज्यात पसरलेली रोगाची साथ घालविण्याकरितां महालक्ष्मी देवीला आपली करंगळी त्यानें कापून अर्पण केली. सौदत्तीच्या रट्ट घराण्यात हीच सहिष्णु वृत्ति दिसून येते. महासामत पृथ्वीराम याने ८१५ मध्यें जैन मंदिर बाधले. त्याचा नातू जैन; पण नातवाचा नातू वैदिक धर्माभिमानी होता. १०२२ मधील बेलूर येथील लेखात लिहिले आहे कीं, अक्कादेवी नावाच्या स्त्रीनें एक त्रिपुरुषाचें देऊळ बाधलें व ती जैन, बौद्ध व वैदिक अशा तिन्ही धर्मांतील व्रतवैकल्यें करीत असे. कनोजच्या गढवाल घराण्यातील गोविंदचंद्र हा स्वतः शैव होता पण बौद्धधर्मी कुमारदेवीशीं त्यानें विवाह केला, आणि बौद्धभिक्षूंच्या चरितार्थाकरितां सहा गावें लावून दिलीं. उलट बंगालचा महानंदपाल हा स्वतः बौद्ध असूनही त्यानें

१. Life of Hieun Tsang by Beal, p. 83.

राणी चित्रमतिकेला पुराण सागणाऱ्या ब्राह्मणाला गाव बक्षिस दिला.[१]

अलीकडच्या कालातील विजयनगरच्या राज्याकडे वळलें तरी तेथेंहि सिंहासनाधिष्ठित राजानीं सहिष्णुवृत्तिच जागविलेली आढळते. इ. स. १३६८ मध्यें राज्यात वैष्णव व जैन याच्यामध्यें पंचमहावाद्याचा व कलशाचा उपयोग करण्याचा हक्क जैनाना आहे कीं नाहीं यावरून तंटा उपस्थित झाला तेव्हा राजानें जाहीर केलें कीं, 'वैष्णव पंथ आणि जैन पंथ यात काहींच फरक नाहीं. एकाचें जे नुकसान तेंच दुसऱ्याचें; म्हणून सर्वत्र वैष्णवानीं असें शासन सुरू करावे, कारण यावचंद्रदिवाकरौ वैष्णव-पंथ जैनाचें संरक्षण करील.'[२]

सहिष्णुतेची ही परंपरा शिवाजी व पेशवे याच्यापर्यंत अखंड चालू होती. कुराण, मशीद व स्त्रिया याचा मान राखण्याविषयीं शिवाजीनें सक्त नियमच केला होता असें आपल्या बखरकारानींच नव्हे तर काफीखान या इस्लामी इतिहासकारानेंही लिहून ठेवलें आहे.[३] या नियमाचें मर्म त्याच काळीं औरंगजेबानें जो धुडगूस माजविला होता त्यावरून विशेषच उठून दिसतें. औरंगजेबाचा परधर्मद्वेष इतिहासात प्रसिद्ध आहे. ओरिसाच्या सुभेदाराला मंदिरें उद्ध्वस्त करण्याविषयीं त्याने हुकूम पाठविला त्याअन्वयें त्या सुभेदारानें खालील अंमलदाराना फर्मान काढलें कीं फर्मान हातीं पडताच तिलक्कुट्टी येथील मंदिर तावडतोब जमीनदोस्त करावें, तसेंच विलंब न करितां गेल्या बारा वर्षांत जीं जीं मंदिरें बाधलीं असतील तीं तीं सर्व उद्ध्वस्त करावीं, आणि तसें केल्याबद्दलचे अहवाल काझीच्या सहीशिक्क्यां-निशीं व थोर शेखाच्या साक्षीसह दरबारकडे पाठवून द्यावे. शिवाय जुन्या मंदिरांच्या जीर्णोद्धारासही मनाई करावी. १६७० मध्यें तर सर्वच प्रांतांच्या सुभेदाराना काफिराचीं मंदिरें आणि पाठशाळा उद्ध्वस्त करण्या-बद्दल हुकूम धाडण्यांत आले असें हुगळी येथील द ग्राफ या फ्रेंचानें लिहून ठेवलें आहे. असला हुकूम हातांत पडताच प्रांतोप्रांतींच्या सुभेदारांना भलतें

१. Rashtrakutas p. 374, by Dr. Altekar.

२. त्रिशतसांवत्सरिक ग्रंथ पृ. ५२९.

३ Elliot and Dowson VII, p. 260.

अवसान चढलें आणि मंदिरें उद्ध्वस्त केल्याच्या पुण्यकृत्याचे अहवाल दरबारकडे झपाट्यानें रवाना होऊं लागले. या उद्ध्वंसनाच्या होमकुंडांत काशीचें विश्वेश्वरमंदिर, मथुरेतील लाखो रुपये खर्च करून उभारलेलें केशवरायमंदिर, गोवर्धन येथील वल्लभाचार्यांचें मठमंदिर, हरद्वार, अयोध्या, सोमनाथ येथील मंदिरें, गुजरात येथील अनेक मंदिरे यांची आहुति देण्यात आली. जयपुरात त्रेसष्ट मंदिराचा बळी देण्यात आला व एकट्या उदेपूर संस्थानात तरें २६३ मंदिरें जमीनदोस्त करण्यात आलीं. यावरून या विध्वंसक प्रकाराच्या भीषणतेची कल्पना येईल. जोधपुरांत खान इ जहान याला या कामगिरीवर खास पाठविण्यात आलें होतें. त्यानें तेथील अनेक मंदिरें पाडून टाकलीं व आपली पुण्याई मिरविण्याकरितां फोडलेल्या तोडलेल्या मूर्तींचे गाडिच्या गाडे भरून दिल्लीस आणले ![1]

उलट शिवाजीनें असल्या प्रकारांबाबत औरंगजेबास लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे त्यात तो लिहितो, "वाईट अथवा चागला असो हे दोन्ही ईश्वराचे निर्मित आहेत. त्यास कोणाचे धर्मास विरोध करणे हें आपले धर्मापासून सुटणें व ईश्वराचे लिहिले रद्द करून त्यावर दोष ठेवणें होय."[2] माधवराव पेशवे हे असेच उदार होते. त्यानीं फिरंग्यास देवळें बांधण्यास परवानगी दिल्याचीं चार पत्रें इतिहाससंग्रहातील ऐतिहासिक टिपणात छापलीं आहेत.

## सहिष्णुतेची अमर पताका

सहिष्णुतेचे, सक्रिय सहिष्णुतेचे, असले आणखी पुष्कळ मासले इतिहासाचीं दप्तरें धुंडाळाल तर सांपडतील. पण केवळ इतिहासाच्या बाडात गाडले गेलेले हे दाखले नष्ट होण्याचाहि संभव फार. खुद्द हर्षराजाचें वरील वर्णन हेंहि चिनी प्रवाश्यानें लिहून ठेवलें म्हणून आज आपणांस अवगत होत आहे. आणि तेंहि चिनी जाणणाऱ्या

१. 'Religious Policy of the Mughal Emperors' by Sri Ram Sharma.

२. ऐतिहासिक पत्रबोध पृ. १५. गो. स. सरदेसाई.

पंडितांनीं आमच्या भाषेंत आणलें तेव्हा ! पण साध्या मुशाफराच्या नजरे-लाहि सहज दिसण्यासारखें हिंदु सहिष्णुतेचें चित्र आजहि तुम्हांस अवलोकण्यास हवें काय ? हवें असलें तर तुम्हास लांब जावयास नको. आपल्या या महाराष्ट्रातच तें तुम्हांस आढळेल; आणि तेंहि चिरकाल टिकेल अशा स्वरूपात. तें म्हणजे वेरूळचीं लेणीं हीं होत ! हीं लेणीं म्हणजे भारतीय सहिष्णुतेची अमर पताकाच होय. हीं लेणीं पुष्कळ असून त्यानीं एक अर्धवर्तुळाकार अशी सबंध टेकडी व्यापली आहे. या टेकडीकडे म्हणजे लेण्याकडे तोंड करून उभे राहिलात व उजव्या हातास प्रारंभ करून डावीकडे लेणीं पाहत जाऊं लागलात तर पहिल्या काहीं लेण्यांत तुम्हास बुद्धाच्या प्रतिमा आढळतील. तीं संपलीं कीं पुढचीं काहीं लेणीं वैदिक-धर्मीयांचीं आढळतील. यातील सर्वांत मोठ्या लेण्यालाच कैलास हें नाव आहे. आणि तेथून पुढें पाहत गेलात म्हणजे उरलेल्या लेण्यातून जैनाच्या तीर्थंकरांचें दर्शन घडेल. व्यापक हिंदु धर्माच्या या तिन्ही शाखा एकत्र गुण्यगोविंदानें कशा नादत होत्या ह्याचें हें चिरकालिक स्मारकच होय. या बाबतींत मंदिरें उद्ध्वस्त करून मशिदी उभारणाऱ्या मुसलमानांची वृत्ति ध्यानांत आणा म्हणजे हीं तिन्ही लेणीं एकाच डोंगरात शेजारीं शेजारीं नांदविणाऱ्या उदार सहिष्णुतेचें मर्म लक्ष्यांत येईल. मुसलमानाची मशीद उठावयाची म्हणजे ती हिन्दूंचें देऊळ पाडून त्याच्या उरावर पाय देऊन उठावयाची. समूळ जमीनदोस्त करण्यास सवडच सापडली नाहीं तरी निदान छिन्नविच्छिन्न विद्रूप तरी करून सोडावयाचें ही रीत. पण वेरूळचीं लेणीं खोदविणाऱ्या वैदिक, बौद्ध व जैन राजांना ह्या विघातक वृत्तीचा स्पर्शहि झालेला दिसून येत नाहीं; म्हणूनच इतिहासाचे कागदपत्रं नष्ट झाले तरी वेरूळची काळ्या कपारीची अभेद्य टेकडी जोंवर धरणीवर उभी आहे तोंवर ती आपल्या अनेक लेण्यांच्या मुखांनीं सर्व जगाला ओरडून सांगेल कीं, सहिष्णुता हा हिंदुधर्माचा प्राण होय !

भारतीयाच्या सहिष्णुतेबद्दलची ख्याति जगभर पसरलेली होती, ती जाणूनच चौथ्या शतकांत इराणांत सस्सानिद राजांनीं ख्रिस्त्यांना जेव्हा धारेवर धरलें तेव्हां त्यांनीं तेथून पळ काढून कोठला किनारा गांठला असेल तर तो हिंदुस्थानचा किनारा ! आणि पुढें आठव्या शतकांत इराणांत मुसलमानी

अंमलात पारशांना वाईट दिवस आले तेव्हा तेहि कोणत्या देशाकडे वळले असतील तर हिंदुस्थानाकडेच !

सहिष्णुतेचा खून सर्वांत कोठें पडत असेल तर तो धार्मिक क्षेत्रांत. म्हणून त्याचें थोडें विस्ताराने दिग्दर्शन केलें. सामाजिक क्षेत्रातील भारतीयांच्या सहिष्णुवृत्तीला अस्पृश्याविषयीं हीन भावना हा मोठाच कालिमा होय. पण तो सोडला असता पाश्चात्यांशीं तुलना केली असता भारतीयांच्या सहिष्णुतेचा प्रत्यय आणून देण्यास भरतखंडातील गुलामगिरीच्या संस्थेच्या अतिसौम्य स्वरूपाकडे अंगुलिनिर्देश केला म्हणजे पुरे. माणसें विकणें–विकत घेणें, दान करणें, नजराणा देणें या स्वरूपांत गुलामगिरी हिंदुस्थानात अपरिचित नाहीं. ती वैदिक कालापासून पेशवाई अखेरपर्यंत रूढ होती. दास-दासींचे नजराणे दिल्याचे उल्लेख वेद, रामायण वगैरे प्राचीन ग्रंथापासून पेशवेदप्तरापर्यंत सर्वत्र आढळून येतात. त्रदस्यूनें पुरोहिताला पन्नास तरुण दासी दिल्या. (ऋ.८.१९.३६). वैन्यानें अत्रीस एक हजार दासी नजर केल्या (वनपर्व १८५.३४). असले अनेक उल्लेख आढळतात. पण या दासाची पाश्चात्यांच्या प्राचीन रोममधील गुलामाशीं किंवा अर्वाचीन अमेरिकेंतील निग्रोंशीं किंवा रबराच्या मळयातील मुदतबंद मजुराशींही कोणतीच तुलना नाहीं. हिंदुस्थानातील दास-दासींची जीवयात्रा व दर्जा सामान्य पगारी नोकराच्या तोलाचाच असे. दासाना गुरांप्रमाणें साखळीनें बांधून ठेवणें, पाठीवर चाबूक ओढणें, खुणेकरता तापलेल्या लोखंडानें डागणें असले पाश्चात्य प्रकार येथें आढळत नाहींत. येथें असले प्रकार दिसले नाहींत म्हणूनच प्राचीन कालीं मेग्यास्थेनिसनें लिहिलें कीं हिंदुस्थानांत गुलामगिरी माहीत नाहीं. उत्तरकालीं ठग, पेंढारी वगैरे धंदेवाईक दरोडेखोर मुलांमाणसांना पकडून विकीत व मुसलमान आणि अरब व्यापारी भडोचच्या बंदरातून गुलामांची आवकजावक करीत. ब्रिटिशानीं गुलामगिरी कायद्यानें बंद केली ती ह्या प्रकाराची. हिंदूंच्यापुरतें पाहिलें तर त्यांच्यांत दाससंस्था फारच सौम्य प्रमाणांत होती. म्हणूनच प्राचीनकालीं मेग्यास्थेनिसनें जो अभिप्राय दिला तसाच ब्रिटिश अंमलाच्या सुरवातीला कोलब्रुक व मॅकनॉटन यांनींही दिला आहे. ते लिहितात कीं, ‘ गुलाम व नोकर यांच्यामध्यें हिंदुस्थानांत

नावापेक्षा कोणताच फरक नाहीं.' काहीं वर्षांपूर्वी लिहिल्या गेलेल्या 'ब्रिटिश अमलातील गुलामगिरी'[1] या नावाच्या पुस्तकात त्याच्या लेखकाने प्रतिपादन केले आहे की वरील साहेबमजकुराचा अभिप्राय हा बगालपुरताच असून तोही एकंदरींत फाजील सौम्यपणाने प्रकट केला आहे. कारण मलबार, मुंबई, मद्रास या ठिकाणीं गुलामगिरी उग्र स्वरूपात होती असे त्याचे म्हणणे आहे. पण सर्व हिंदुस्थानात ती तशी होती असे मोठें सशोधन करूनही त्याला दाखविता आलेले नाही. त्याची मुबई म्हणजेही मुख्यतः मुंबई बदरच घेतले पाहिजे. महाराष्ट्रात दाससंस्था नांवालाच होती. गुलामगिरी रद्द करण्याचा कायदा करण्यापूर्वी गुलामगिरीची माहिती निरनिराळ्या संस्थानातून इग्रजानीं मुद्दाम मागविली होती व त्याकरिता मोठी प्रश्नपत्रिका तयार केली होती. तिला दिलेलें उत्तर पेशवेदसरामध्ये प्रसिद्ध झालेले आहे त्यात लिहिले आहे:– 'बहुतकरून या प्रातीं पुरुषास गुलामगिरी प्राप्त होत नाहीं. लुटीचे समई बायकामुलीस धरून कुणबीण म्हणून आणून विकतात. असल्या कुणबिणीचे काम दळणकाडण असलें असतें.' ( खंड ४२ ).

## संग्राहक वृत्ति

या सहिष्णुतेच्या जोडीला दुसरें डोळयात भरण्यासारखे वैशिष्टय म्हणजे संग्राहकपणा हे होय. नुसती सहिष्णुताच हिंदुसमाजात वावरत असती तर भिन्न भिन्न समाज एकमेकाशेजारीं नादत राहिले असते एवढेच, पण त्या सर्वांचें सास्कृतिक एकीकरण झालें नसतें. तसें एकीकरण राजकीय क्षेत्रांत नाहीं तरी धार्मिक व सामाजिक क्षेत्रात तरी झालें ही कामगिरी क्षुल्लक नव्हे. त्यातहि हें एकीकरण त्या त्या पंथाचें आणि समाजाचें वैशिष्ट्य कायम ठेवून करण्यात आलें हे विशेष होय.

सामाजिक आणि धार्मिक क्षेत्रात हें एकीकरण कसें करण्यात आलें याचें धावतें दर्शन घेणेंहि मनोरंजक आहे. हिंदुस्थानातील अनेक भिन्न-भिन्न रक्तांच्या समाजाना एका सूत्रात गोवणें ही क्रिया फारच जिकीरीची होती. खुद्द भारतीय आर्यांच्या टोळ्या हिंदुस्थानांत आल्या त्याच्यापूर्वीच

१. 'Slavery in British India' by Banaji.

येथें द्रविड सुप्रतिष्ठित झाले होते. त्याच्याहि आधीं येथें मूळचे रहिवासी होते. त्याना आदिद्रविड म्हणता येईल. आर्यांच्या वसाहतीनंतर पर्शु, यवन, पल्हव, शक, कुषाण, हूण, गुर्जर वगैरे अनेक परकीय लोक भरतखडात आले व येथल्या अफाट समूहात मिसळून गेले. शिवाय प्रथमपासून आर्यांचे प्रतिस्पर्धी म्हणून असुर, नाग, राक्षस, दस्यु, वानर वगैरे भिन्न समाज येथे स्थायिक झालेले होतेच. या सर्वांचा उल्लेख मागील प्रकरणीं आलाच आहे या सर्वांना एका समाजसूत्रात गोवून त्यांचीं परस्परस्थाने एका व्यापक समाजात निश्चित करणे हें काम व्यापक व संग्राहक बुद्धिविना अशक्यच होतें. ही समाजघटना तयार करण्यात आर्यांनीं जी वर्णव्यवस्था व जातिव्यवस्था निर्माण केली ती त्याच्या समाजसघटनकौशल्याची द्योतक होय. कालान्तरानें ही जाति-संस्था उपयुक्त राहिली नाहीं, किंबहुना विघातकही ठरली; कारण तिच्या तळाशीं असणारें गुणकर्मांचे अधिष्ठान लोपून ती उत्तरकालीं जन्मावर उभारली जाऊन वज्रलेप बनविली गेली.

आर्येतर गटाना समाजघटनेत प्रविष्ट करण्यात प्रथम प्रथम ही जाति-संस्था फार सोयीची ठरली असावी. म्हणजे एखादा बाहेरील गटच्या गट भारतीय समाजघटनेत समाविष्ट केला म्हणजे त्याला रूढ जातींपैकी ज्या जातीशीं तो गुणकर्मानें जवळचा असेल त्या जातींत त्याला स्थान दिलें जाई. शिवाय मोठा गटच्या गट प्रविष्ट झाल्यानें त्याची एक पोटजात बने व त्यामुळें त्याच्या विवाह व अन्नोदक या व्यवहारात पुरेसें क्षेत्र मिळे. उच्चवर्णीयात परकीयाना समाविष्ट करून घेतलेल्याचे उदाहरण म्हणजे मागील प्रकरणीं उल्लेखिलेल्या पारशी मग लोकाचें. हे लोक इराणातून हिंदुस्थानात येऊन मित्र देवतेच्या उपासनामार्गाचा फैलाव करते झाले. याचा आचार पुजारीवर्गासारखा असल्याने त्याना शकद्वीपाहून आलेले ब्राह्मण असें लेखून त्याचा प्रवेश येथील ब्राह्मणवर्णात करण्यात आला. आता मग हे पुजारी म्हणून धंद्याने ब्राह्मण जातीचे ठरले तरी रक्ताने, भाषेने, धर्मानें परकीय; तेव्हा त्याच्याशीं विवाहसंबंध होणें कठीण होतें. यामुळें त्याची पोटजात बनली. तशी ती प्रारंभीं बनणें हेंच स्वाभाविक. पण कालांतरानें या पोटजाति इतर बहुसंख्याक जातीशीं एकरूप होतात त्या वेळीं पुन्हा शरीरसंबंध

सुरू केला पाहिजे ही क्रिया मात्र झाली नाहीं. जाती वाढत जाण्याची क्रिया सुरू राहिली पण त्या मोडण्याचा स्थगित झाली हे मात्र योग्य झाले नाहीं.

## व्रात्यस्तोम

परकीय समाजातील गटच्या गट आपल्या समाजात समाविष्ट करून घेण्याचा वैदिक काळातील सुप्रसिद्ध प्रयोग म्हणजे व्रात्यस्तोम विधि हा होय. आपल्या मराठी भाषेत व्रात्य हा शब्द आता फक्त खोडकर या अर्थी रूढ होऊन बसला आहे. पण तो वैदिकसंहिताकाळीं भरतखंडाच्या पूर्वभागातील म्हणजे प्राचीन मगध किंवा हल्लींच्या उत्तर बिहार प्रांत यांत राहणाऱ्या आर्येतर लोकांचा वाचक असावा. ब्राह्मणकाळीं या शब्दाचा विस्तार होऊन व्रात्यांच्या प्रांतात जाऊन राहणारे वैदिक किंवा आर्य संस्कार ज्यांच्यात लुप्त झाले आहेत अशा सर्वांना लावण्यात येऊं लागला व पुढे धर्मशास्त्राच्या काळीं व्रात्य हा शब्द एकेकाळीं प्रादेशिक लोकवाचक होता याचें स्मरण नष्ट होऊन तो संस्कारलुप्त अशा सर्वांना लावण्यात येऊ लागला. पण व्रात्य व व्रात्यस्तोमविधि यांचे ताण्ड्यमहाब्राह्मण व लाट्यायनसूत्र यांत जे वर्णन आलेले आहे त्यावरून आर्येतर गटच्या गट आर्यांत समाविष्ट करून घेण्याकरिता या व्रात्यस्तोमविधीचा प्रयोग बसविण्यात आला होता असे स्पष्ट दिसते. ताण्ड्यमहाब्राह्मणाच्या सतराव्या अध्यायातील पहिले चार खंड या व्रात्यस्तोमविधीला वाहिलेले आहेत. ब्राह्मणकार लिहितो कीं, " देव जेव्हा स्वर्गलोकाला गेले तेव्हा त्यांचे काहीं अनुयायी व्रात्यांच्या प्रदेशात राहून गेले. हे अनुयायी नंतर स्वर्गाला जाण्याच्या इच्छेनें देव जेथून स्वर्गाला गेले त्या प्रदेशीं आले, पण देवांचा मंत्र आणि त्यांचा छंद माहीत नसल्याने गोंधळले. ते पाहून देवांना त्यांची दया आली व त्यांनीं मरुतांना सांगितलें कीं या व्रात्यांना तुम्ही षोडशमंत्र व अनुष्टुभ छंद हीं शिकवा कीं ज्यांच्या साहाय्याने त्यांना स्वर्गाला येता येईल " ब्राह्मण ग्रंथातील या वचनाचा ऐतिहासिक अर्थ असा असावा कीं देव किंवा आर्य हे मध्यदेशातून पूर्वेकडे जसजसे स्वाऱ्या करूं लागले[1] तसतसे या स्वारींपैकीं पुष्कळ लोक व्रात्यांच्या

१. पृ. २३९ वरील विदेघमाधवाची कथा पहा.

प्रातात राहूं लागल्यानें त्याचे वैदिक संस्कार लोपले असावेत. ते परत मध्यदेशात आल्यावर त्याना व्रात्यस्तोमविधि करून शुद्ध करून घेत असावेत. याच विधीने पुढे व्रात्यापैकीं ज्याना वैदिक धर्मात येण्याची इच्छा असे त्यानाही व्रात्यस्तोमविधीनें वैदिक धर्मात घेण्यात येई व लाट्यायन-सूत्रकार लिहितो कीं, ' या विधीनतर या व्रात्याना द्विजत्वाचा दर्जा प्राप्त होई व मग त्याना वेदपाठनाचा, यज्ञविधीचा व ब्राह्मणाना दान देण्याचा अधिकार प्राप्त होई आणि ब्राह्मण त्याच्याशीं अन्नोदकव्यवहारही करीत. ( ८।६ ).

या व्रात्याची माहिती जी ब्राह्मणावरून मिळते तीवरून त्याच्यात काहीं अगदीं मागासलेले वन्य व काहीं चागले पुढारलेले असे वर्ग आढळून येतात. ब्राह्मणकार लिहितो, " व्रात्याच्या प्रातात जे जाऊन राहातात ते त्याच्याप्रमाणेंच हीन होतात. ते ब्राह्मणाचीं कर्में करीत नाहींत[1] आणि कृषिवाणिज्यही करीत नाहींत. पण ' अधाहींद्र ' या विषम छदातील मंत्रानें ते सर्व व्रात्यसम होऊन जातात. या प्रसंगीं द्यौतान साम म्हणावे. कारण द्युतान हा व्रात्य-देवाचा गृहपति होय. व्रात्याच्यापैकीं काहींना गरगिर (विषखादक)[2] म्हणत'त. ते ब्राह्मणाचे अन्न खातात आणि दीक्षा न घेताच दीक्षिताप्रमाणें भाषा बोलतात. पण षोडशस्तोममंत्रानें त्याचें पाप नष्ट होतें." ब्राह्मणकार पुढें लिहितो कीं ज्या व्रात्याच्या गृहपतीला व्रात्यस्तोम विधि करावयाचा असेल त्यानें मुंडास पराणी, धनुकली, छकडा, काळ्या दशा असलेली घोंगडी, कातड्याचीं कावरुणें, चादीचा निष्क अशी सर्व सामग्री जुळवावी व त्याच्या अनुयायानीं तावडे रंगाची दशा असलेलीं कावरुणें, कातड्याचीं कावरुणें, पायताणे वगैरे जिनसा जमवाव्या. हे सगळें धन देऊन टाकलें म्हणजे ज्यांना तें दान केलें जातें त्याच्याकडे त्याचें पाप धुवून जातें (एतद् वै व्रात्यधन यस्मा एतद्ददाति तस्मिन्नेव मृजाना यन्ति ।). हा विधि करणाऱ्या गृहपतीबरोबर तेहतीस तेहतीस अनुयायी असावे." हा भाग प्रथमखंडात आला आहे. द्वितीय व तृतीय खंड हे निदिंतव्रात्य आणि कनिष्ठव्रात्य

---

१. न हि ब्रह्मचर्यं चरति याचा सायणाने केलेला अर्थ.

२. बैराग्यामध्यें सोमल व बचनाग खाणारे आजही आढळतात म्हणे.

याच्यासंबंधीं असून चतुर्थखण्डात 'शमनीचमेढ्र' म्हणजे ज्यांचें तारुण्य नष्ट झालें आहे अशा वृद्धाच्या करिता विधि सांगितला आहे. या वृद्धाचा कुषीतक ऋषि गृहपति होता असे वर्णन आहे. त्यावरून म्हातारपणींही कांहीं व्रात्य वैदिक धर्मांत येण्याची इच्छा धरीत असावेत.[1]

लाट्यायन सांगतो कीं, व्रात्यस्तोमाचा विधि संपल्यावर शुद्ध झालेल्यानीं नवीं वस्त्रें धारण करावींत व जुनीं इतर व्रात्यांना किंवा मगधातील ब्रह्मबंधूना देऊन टाकावींत.

अनार्यांना आर्य करून घेण्याचा दुसरा मोठा प्रयत्न रजपुतांच्या काळीं झालेला भविष्यपुराणात नमूद आहे. या पुराणाच्या प्रतिसर्ग पर्वांतील प्रथमखंडात लिहिलें आहे कीं कान्यकुब्जातील कोणा द्विजोत्तमानें आबुर्द शिखरावर ( अबूच्या पहाडावर ) येऊन ब्रह्महोम केला. त्या यज्ञातील दिव्यमंत्राच्या प्रभावानें प्रमर चपहानि वगैरे चार क्षत्रिय उत्पन्न झाले. यानाच अग्निवंशीय क्षत्रियकुलें हें नामाभिधान प्राप्त झालें. या चारात कांहीं परकीय म्लेच्छ असणें शक्य आहे. कारण तिसऱ्या खंडात अग्निवंशाच्या विस्तारकालाचें वर्णन करताना 'आर्यधर्मकराः म्लेच्छाः बभूवुः सर्वतोमुखाः' व 'मत्पुत्राश्च स्मृताः म्लेच्छा आर्यधर्मत्वमागताः' (मत्पुत्र म्हणजे कलीचे पुत्र) असें वर्णन आलेले आहे. राजपुतान्यामध्यें चपहानीनें राज्य केले यावरून रजपूत हे मूळचे वैदिकेतर होते असें अनुमान काढणे अवास्तव होणार नाहीं.

समाजसंघटनेचा आणखी एक प्रयोग म्हणजे कल्पित वंशावळी तयार करणें हा होय. ऐतरेय ब्राह्मणातील विश्वामित्राची कथा ह्या बाबतींत बोधप्रद आहे. या कथेमध्यें विश्वामित्रानें बळी देण्यास आणलेल्या शुनःशेपास दत्तक घेऊन ज्येष्ठ पुत्र मानले. तें त्याच्या ज्येष्ठ पुत्राना रुचलें नाहीं. तेव्हा विश्वामित्रानें त्याना शाप दिला कीं आन्ध्र, पुण्ड्र, शबर, पुलिंद, मूतिब वगैरे पाचपन्नास आर्येतर जातीच्या लोकाची तुमची संतति होईल. ( ७।१८ ).

---

१. डॉ. दे. भांडारकर यांचे मतें हे लोक नीचमेढ्र देवतेचे उपासक असावत. -Aspects of Ancient Indian Culture p.44.

संघटनेची आणखी दिशा म्हणजे त्या त्या प्रदेशांतील वा संघातील लोकांच्या चालीरीतींना मान्यता देणे ही होय. न्यायनिवाडा करीत असता देशधर्म, जातिधर्म, कुलधर्म, पाषडधर्म हे सर्व लक्षात घेऊन निवाडा करावा असे मनूनें सांगितले आहे (मनु. १.११८). ही पद्धत विवाहाचे गांधर्व, आसुर, पैशाच इत्यादि अष्टप्रकार कायदेशीर म्हणून मान्य करण्यातही दिसून येते. या अष्टप्रकारांपैकीं कांहीं प्रकारच प्रशस्त मानले गेले असले तरी बाकीचे बेकायदेशीर गणले जात नसत याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. इतर देशांत राजमान्य विवाहपद्धतींशिवाय इतर पद्धति मान्य करीत नसत हे पाहिले म्हणजे भारतीयांच्या संग्राहक सहिष्णुतेचे मर्म लक्षात येईल. उदाहरणार्थ, रोमन साम्राज्यात गुलामांची लग्ने कायदा मानीत नसे.

## धार्मिक संग्राहकपणा

संग्राहकपणाची खळखळ कोणत्या प्रांतात सर्वात अधिक असेल तर ती धर्माच्या प्रांतात. या प्रांतात संग्राहकपणाचा एखादा नवा प्रयोग सुरू झाला कीं प्रथम प्रथम कटकटी होतच. वेदांतील निरनिराळ्या शाखांमध्यें शैववैष्णवांमध्ये, वैदिक व बौद्ध यांमध्यें अशा कटकटी झाल्या नाहींत असें नाहीं. पण त्या सर्वांना पुरून उरून शेवटीं हिंदूंचा संग्राहकपणाच शेवटीं विजयी ठरला असें इतिहास सांगतो.

हें धार्मिक संग्राहकपणाचें धोरण थेट वैदिक कालापासूनच अवलंबिलेलें आढळून येते. वैदिक कालामध्ये अवैदिकांना यज्ञ करू द्यावयाचा कीं नाहीं हा मोठा महत्त्वाचा प्रश्न गाजला होता. यज्ञ करणें हे आर्यत्वाचें मुख्य लक्षण त्या काळीं गणले जाई. आपल्या शत्रूंना आर्य नेहमीं यज्ञाचे शत्रु म्हणून संबोधीत; पण पुढे कांहीं निषादासारखे अनार्य जेव्हा मित्र बनले व आर्यांचे आचारविचार उचलण्याची मनीषा बाळगू लागले तेव्हा आर्यांचा श्रेष्ठतम धर्म जो यज्ञ तो करण्याची अनार्यांना परवानगी द्यावी कीं नाहीं याविषयीं चळवळ होऊन अंतीं रथकार व निषादस्थपतींना रौद्रइष्टि करण्याचा अधिकार देण्यात आला. ताण्ड्यमहाब्राह्मणांत तर प्रतिपादन केलें आहे कीं विश्वजित यज्ञ करणारानें तीन दिवस

निषादाच्यामध्यें वसति करावी ( १६·६·७ ). खुद्द वैदिक अभिमान्यातही कालांतराने त्या त्या चार वेदाच्या अभिमान्यांमध्ये एकीकरणाची जरूरी उत्पन्न झाली होती. चार वेदाना मान्यताहि कालांतराने मिळाली. वेदाचा उल्लेख त्रयीनेच केला जाई. म्हणजे अथर्ववेद बाटगाच समजला जाई वेदाच्या निरनिराळ्या शाखा निरनिराळ्या स्थळीं सुरू झाल्या होत्या. मंत्रतंत्रक्रिया भिन्न भिन्न झाल्या होत्या. प्रथम यज्ञ लहान प्रमाणावर होत असत; व जो तो आपापल्या शाखेप्रमाणे विधि करी. या निरनिराळ्या शाखाच्या एकीकरणाचा प्रयत्न हा महिनानुमहिने, वर्षानुवर्षे चालणारीं महान् सत्रे होत त्यात करण्यात आला. हीं मोठमोठीं सत्रे वैदिक काळची अत्यंत महत्त्वाची संस्था होती. या सत्रात होता, पोता, अध्वर्यु, ब्रह्मा वगैरे अनेक उपाध्याय लागत. ते निरनिराळ्या वेदांचे असावेत असे ठरवून त्या त्या वेदाच्या अनुयायाचें एकीकरण करण्यात आले. इतकेच नव्हे तर ज्या अथर्ववेदाला तुच्छतेनें लेखण्यात येई त्या अथर्ववेत्याला सर्व यज्ञविधीवर देखरेख करण्याचे ब्रह्मयाचें महापद देण्यात आले. सोमयागात ऋत्विजाच्या एकीकरणाचा एक विधिच सांगितलेला आहे. तो तानूनप्त्र हा होय. या विधीप्रमाणे प्रारंभीं सर्व ऋत्विज एकदिलाने वागण्याची शपथ घेत, व यागसमाप्तीच्या वेळीं सख्य-विसर्जनविधि करीत. हीं सत्रें वर्षानुवर्षें चालत, अनेक ठिकाणचे विद्वान् एकत्र येत, वादविवाद चालत, फावल्या वेळीं नृत्य, गायन, नाट्य, कथाश्रवण वगैरे चाले. उदाहरणार्थ, तानूनप्त्र विधीचें महत्त्व बिंबविण्याकरिता देवात फूट पडली तेव्हा त्याचा पराभव झाला ही कथा वर्णिली जाई. या प्रसंगीं होणाऱ्या विद्वचर्येतूनच हिंदूंचीं शास्त्रोपशास्त्रे व विद्योपविद्या निर्माण झाल्या.

कालान्तराने यज्ञविधि फार मानगर्डीचे झाले, खर्चाचे झाले आणि शेतकीच्या जनावराच्या संहारामुळें अप्रिय झाले. तेव्हा अग्नीची उपासनाच नष्ट होण्याचा प्रसंग आला असता गार्हस्पत्याग्नि ज्यानें त्यानें आपआपल्या घरीं बाळगावा व काहींनीं अग्निहोत्र स्वीकारावें अशी स्मृति काढून अग्नीची पूजा रक्षण केली गेली.

पुढें उपनिषत्कालीं अग्नीच्या पूजेचें प्रयोजन काय अशी सर्वसाधारण

कर्मकांडावरच शंका घेण्यात येऊ लागली. यज्ञ हे फुटक्या नावेप्रमाणें बेभरंवशाचे आहेत हे न जाणता त्याच्या साहाय्याने जरा-मृत्यूच्या पलीकडे जाण्याची इच्छा धरणारे मूर्ख होत (मुंडकोपनिषद् १.२.७) असें प्रतिपादन सुरू झाले, आणि अंतिम निःश्रेयसाला कर्मकांडाची आवश्यकताच नाहीं असा उपनिषद्कारांनीं सिद्धान्त मांडला. अशा वेळीं पूर्वीच सुप्रतिष्ठित होऊन बसलेला यज्ञादि कर्ममार्ग आणि नवोदित औपनिषदिक ज्ञानमार्ग यांची सांगड कशी घालावयाची असा प्रश्न उपस्थित झाला. त्यावर अशी तोड काढली कीं, 'ज्ञानान्मोक्षः' हा सिद्धान्त मान्य केला तरी ज्ञानालाहि चित्तशुद्धि अवश्य असते आणि ती कर्ममार्गानें मिळते असें मानावे ! यज्ञ शब्दही लोकप्रिय झालेला होता तो कायम ठेवून जपयज्ञ, दानयज्ञ, अशीं नवीं रूपे कल्पिण्यात आली. नारायणीय उपनिषदात तर ब्रह्मज्ञान झालेल्याचे सर्व जीवनच यज्ञरूपी असते असे रूपक केलें आहे 'तस्यैव विदुषः यज्ञस्य आत्मा यजमानः' वगैरे.

पुढें तत्त्वज्ञानात अनेक पंथ उत्पन्न झाले. त्यांचाहि मिलाफ करणे प्राप्त झालें. त्या सर्वांचा समन्वय आपल्या पूर्वजांनीं दोन सुंदर समर्पक तत्त्वांनीं केला. तीं तत्त्वे म्हणजे **अधिकारभेद** आणि **अवस्थाभेद** हीं होत. या दोन सूत्रांनीं शेंदूर फासलेल्या दगडाच्या म्हसोबापासून तो 'यत्र वाचो निवर्तन्ते' अशा अनिर्वाच्य ब्रह्मापर्यंत सर्वांना एकत्र गुंफण्यात आलें. हिंदुसमाजाच्या विराट् देहात संस्कृतीच्या निरनिराळ्या पायऱ्यांवर उभे असलेले अनेक समाजघटक होते. त्या सर्वांच्या धार्मिक कल्पना एकसूत्रात गोवावयाच्या तर सर्वांना एकच दैवत आणि एकच धर्मग्रंथ लागू करणे यासारखें अप्रयोजक दुसरें कांहींच झाले नसते. तेव्हा सामाजिक बाबतींत विवाहाचे भिन्न भिन्न प्रकार कायदेशीर मानून जे संग्राहक उदारपणाचे धोरण स्वीकारलें तसेच धार्मिक बाबतींत हरतऱ्हेचीं देवदैवते व देवस्की वगैरे प्रकारांना मान्यता देण्यात दाखविले गेले. वटपौर्णिमा, नागपंचमी, वसुबारस, पोळा हे खेडुतांचे सण स्वीकारण्यात आले, व वृक्षपूजा, नागपूजा वगैरे जे प्रकार रूढ होते त्यानाहि अव्हेरिलें नाहीं. इतकेंच नाहीं तर, या सर्वांचा समावेश केला तोहि नाकें मुरडत, नाइलाजाने, उपकार करण्याच्या आढ्यतेने नव्हे तर तो करीत असता एका मोठ्या उदार

तत्त्वाची प्राणप्रतिष्ठा करून. ते तत्त्व म्हणजे **जेथें जेथें म्हणून कसल्याहि प्रकारचा तेजस्वीपणा चमकला असेल तें तें सर्व ईश्वराचेंच प्रतीक होय** यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंशऽसंभवम्॥ हे सुप्रसिद्ध भगवद्गीतोक्त तत्त्व होय. या तत्त्वानें वृक्षपूजा, पाषाणपूजा, पशुपक्षिपूजा, मानुषपूजा या सर्वांनाच प्रतिष्ठित अशा तत्त्वज्ञानाची बैठक प्राप्त करून दिली.

ही भगवद्गीता ज्या ग्रंथात अन्तर्भूत आहे तो महाभारत ग्रंथ हा संग्रहतेचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ होय. शैव, शाक्त, गाणपत्य, सौर, पांचरात्र वगैरे धर्मपंथ व सांख्ययोग वगैरे तत्त्वज्ञानपंथ यांचा समन्वय करण्याच्या प्रयत्नाचे ठळक प्रतिबिंब महाभारत आणि भगवद्गीता या दोहोंमध्यें स्पष्ट उमटलेले आहे. "सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः" या सुप्रसिद्ध भगवदुक्तीची या ठिकाणीं वाचकांना सहजच आठवण होईल. गीता ही या संग्राहक समन्वय-पद्धतीची उज्ज्वल निशाणीच होय. सांख्य आणि योग, कर्ममार्ग, भक्तिमार्ग, ज्ञानमार्ग, द्वैत, अद्वैत या सर्वांचा समन्वय करण्याचा गीतेनें प्रयत्न केला आहे. आणि यातच सर्व पंथांना गीता सारखीच आदरणीय वाटत आली आहे याचें बीज आहे. योगवासिष्ठकारानेंहि असाच समन्वय केला आहे, कीं सांख्याचा पुरुष, योग्यांचा ईश्वर, शैवांचा शिव, काल हे सर्व एकच होत. 'पुरुषः सांख्यदृष्टीनां ईश्वरो योगवादिनाम्। शिवः शशिकलाङ्कानां कालः कालैकवादिनाम्॥' ब्रह्मा विष्णु-महेश यांना सृष्टीच्या उत्पत्ति, स्थिति व लय यांच्या देवता कल्पून विष्णु-पुराणकारानें असेंच ऐक्य साधले आहे. तो लिहितो कीं, 'सृष्टि स्थित्यंतकरणीं ब्रह्मविष्णुशिवाभिधाम्। स संज्ञां याति भगवान् एक एव जनार्दनः॥' वेदांतील पवित्र अक्षर ॐ यातील घटक जे अ, उ, म ते ब्रह्मा, विष्णु, शिव यांचे प्रतीक होत असें मानण्यातहि हीच ऐक्यभावना दिसून येते.

समाजातील अनेक गटांच्या धार्मिक संस्कारमंत्रांनाहि एकत्र गोवण्यात आलें. त्याचें अगदीं सहज वर वर पाहणाराच्याहि लक्षात येणारें सूत्र म्हणजे नित्याच्या संकल्पातील 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' हें होय. हें सूत्र सांगतें कीं कांहीं आचार श्रुतिप्रणीत आहेत, कांहीं स्मृतिप्रणीत आहेत, आणि कांहीं

पुराणोक्त आहेत. वैदिक आर्य आपले विधि वैदिक मंत्रानीं करीत. अवैदिकाना वैदिक मंत्र वापरूं देण्यास ते तयार नव्हते. पण त्याना मंत्र तर हवेत तेव्हा त्याचे कार्य पौराणिक मत्रानीं साधण्यात येई. आज सुप्रतिष्ठित असलेले काहीं धर्मपंथहि प्रारभीं वेदबाह्य होते. कालान्तराने त्याचा वैदिक धर्मात स्वीकार करण्यात आला. उदाहरणार्थ, पाचरात्र व पाशुपत म्हणजेच भागवत आणि शैव हे पथ आज आपण सनातनी म्हणून ओळखतो तेहि एके काळीं वेदबाह्य गणले जात होते. शैवाची थट्टाही केली जाई. भागवतात 'नष्टशौचा मुधधियो जटाभस्मास्थिधारिणः। विशतु शिवदीक्षाया यत्र दैवं सुरासवं॥ असे शैवाचें वर्णन केलें आहे (४।२). शिव हे दानवाचें दैवत होय अशीं वचनेहि सापडतात. 'देवाना दैवतं विष्णुः दानवाना त्रिशूलधृक्।' मनूचा प्राचीन टीकाकार मेधातिथि याचे एतद्विषयीं स्पष्ट विधान आहे. तो म्हणतो, 'एव सर्वे एव बाह्याः भोजकपाचरात्रिकनिर्ग्रंथपाशुपतप्रभृतयः स्वसिद्धान्ताना प्रणेतृन् पुरुषातिशयान् प्रत्यक्षतदर्थदर्शिनः अभ्युपपन्ति न वेदमूलमम् अपि धर्मं अभिमन्यते।' (मनु अ. २ श्लो. ६). यात उल्लेखिलेल्या निर्ग्रंथ म्हणजे जैनाना सनातनधर्मात पूर्ण प्रविष्ट करता आलें नाहीं, त्याच्याविषयीं आदराची भावना राजे लोक बाळगीत हें मागे आलेंच आहे. पाचरात्र हें अवैदिक समजलें जात असे असें वृद्धहारीतहि सागतो. शाडिल्य ऋषीने ते प्रथम प्रवर्तित केले तेव्हा ते अवैदिक होते. 'स तु धर्मप्रसंगेन विष्णोराराधनं प्रति। अवैदिकेनैव विधिना कृतवान् धर्मसंहिताम् (वृद्धहारीत संहिता ११।१८१). पुढें या विधीचें वैदिकीकरण झाले. त्यात कपाळावर ऊर्ध्व पुण्ड्र चिन्ह व बाहुमूलावर चन्द्र चिन्ह हीं चिन्हे वैदिक म्हणून स्वीकारण्यात आलीं. श्रौतेन विधिना चक्रं धृत्वा वै बाहुमूल्योः। धृतोर्ध्वपुण्ड्रः शुद्धात्मा विधितैवार्चयेद्धरीम्। (वृ. हा. ११।१९४).

## सर्वसंग्राहक महाभारत

तत्त्वज्ञानाच्या भूमिकेवरून गीता, योगवासिष्ठादींनीं जें कार्य साधलें तेंच कार्य महाभारतानें मोठ्या प्रमाणांत कथानकांच्या रूपानें साधलें. सौतीनें भारताचें महाभारत जेव्हां बनविलें तेव्हां त्याच्या

विद्याकडे श्रेष्ठ वर्णांचे लोक दुर्लक्ष करू लागले. वैद्यकीसारखा अत्यंत समाजोपकारक असा धंदा तर प्राचीन कालापासूनच निकृष्ट मानण्यात येत होता. भैषज्याविषयी अनादर हा तैत्तिरीय संहितेइतका प्राचीन आहे. ब्राह्मणेन भेषज्य न कार्यम् (तै. स. ६-४-९-३) असा तैत्तिरीय संहितेत उल्लेख आहे. 'चिकित्सितात् पुण्यतम न किंचिदपि सुश्रुम' अशी ज्या धंद्याविषयी सुश्रुतात यथार्थ स्तुति आहे त्या धंदेवाइकाविषयी औशनस स्मृतीने 'नृपाया विप्रतः चौर्यात् संजातो यो भिषक् स्मृतः' असले मुर्दाड विधान केले आहे. ज्ञानेश्वरींतहि वैद्यकाला हीन लेखले आहे, 'आणि आयुर्वेद हि आघवा। याच मोहरा पाडवा। जो जिवा-कारणे करावा। जीवघातु॥ (१३.२२४). असले सर्व प्रकार युरोपात झाले पण ते लोक त्यातून बाहेर पडले. पण आम्ही मात्र गुरफटूनच राहिलो आणि शास्त्रकलादिकात मागसत चाललो.

युरापमध्येहि अधश्रद्धेचे तमोयुग दाट माजलें होते. पण पंधराव्या सोळाव्या शतकानतर त्याच्या बुद्धीला लागलेलें ग्रहण सुटले आणि आपल्याकडे दिवसेदिवस खग्रास होत चालले असा एकदरीत प्रकार झाला. कृष्णमिश्रानंतर दोन शतकानीं ज्ञानेश्वराच्या काळीं आमच्याकडे व्यवहार-निपुण हेमाद्रि व्रतवैकल्याच्या याद्या तयार करीत होता तर त्याच काळीं पाश्चात्यात उपाध्यायवृत्तीचा रॉजर बेकन हा शास्त्रीय प्रयोगाचे महत्त्व लोकाना पटवीत होता आणि शास्त्रीय ज्ञानाच्या जोरावर माणसाला हवें-तून उडताहि येईल असें भविष्य वर्तवीत होता.

एकटे ज्योतिषशास्त्र घेतले तर पूर्वीच्यात व आताच्यात केवढे अंतर पडले आहे हे आपल्या प्राचीन ज्योतिषशास्त्राचा ज्यानीं आमूलाग्र अभ्यास केला आहे त्या विद्वद्वर्य दीक्षित याच्या तोंडूनच ऐकावे. ते लिहितात—" कोपर्निकसाचा ग्रंथ शक १४६५ मध्यें झाला. त्याच्या पूर्वी आमच्या देशातील व युरोपातील ज्योतिष सारख्याच स्थितींत होतें म्हटलें तरी चालेल. मात्र आमचें युरोपच्याप्रमाणें वर्धमान स्थितींत नव्हतें. कोपर्निकसाच्या पूर्वी नुकतेच आमच्या देशातील शोधक ज्योतिषी पितापुत्र केशव दैवज्ञ आणि गणेश दैवज्ञ होऊन गेले. पण कोपर्निकसा-पासून युरोपांतल्या ज्योतिषशास्त्राचें इतकें स्थित्यंतर झालें आहे कीं

पूर्वीचें आणि नंतरचें यास अनुक्रमे वटवृक्षाचा नुकताच उगवलेला रोपा आणि अनेक शतकें वाढून आपल्या छायेत हजारों जीवास आश्रय देणारा अतिभव्य वटवृक्ष याची उपमा शोभेल" (पृष्ठ ५२२). युरोपमध्ये कोपर्‌निकसापासून पुढे भौतिकशास्त्रांना विलक्षण बहर आला व आम्ही मात्र आमच्या जुन्या ज्ञानाच्या चाकोरींत घाणा घालीत बसलों. गाथा-माधवचपूच्या प्रस्तावनेत राजवाडे लिहितात कीं, "शहाजीच्या हयातींत युरोपांत डेकार्ट, बेकन इत्यादि विचारवंत सृष्टपदार्थ-संशोधनकार्याचे वाली जारीनें पंचभूतांचा शोध लावण्यास लोकांना प्रोत्साहन करीत होते आणि आपल्याकडे एकनाथ, तुकाराम, दासोपंत, निपटनिरंजन इत्यादि संत पंचमहाभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारांत राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटींत होते. अशांना स्क्रू, टांचणी, बंदूक व तोफ यांचा विचार वमन-प्राय वाटल्यास त्यांत नवल कसलें?" (पृ. १०७).

पाश्चात्यांचे आजचें श्रेष्ठत्व हे त्यांच्या भौतिक शास्त्रांतील प्रगतींत व लोकशाही संघटनेत आहे. ज्याचें शास्त्र त्याचें शस्त्र, आणि ज्याचें शस्त्र त्याचें राज्य ही प्रणाली अपरिहार्य आहे. शिवाय शास्त्रानें नुसत्या शस्त्रालाच तीक्ष्णता येते असे नव्हे तर ते शस्त्र वापरणाऱ्या बुद्धीलाहि येते. शास्त्राच्या उपासनेने बुद्धीला शिस्त लागते, वृत्तीला निर्भयपणा येतो, अंतःकरणांत आत्मविश्वास वाणू लागतो. याचा साकल्याने परिणाम म्हणजे शास्त्रवेत्त्यांची संस्कृति उन्नतीच्या मार्गाला लागते. लोकशाही पद्धतीने ऐक्याची भावना सर्व राष्ट्रांत पसरून दृढमूल होते. मुसलमानांच्या पुढे हिंदूंना नामोहरम व्हावे लागले तरी त्यांची संस्कृति हिंदूंच्यापेक्षा फारशी श्रेष्ठ नव्हती. नव्या विद्या हस्तगत करण्याचा उत्साह त्यांच्यांत होता; पण शास्त्र, विद्या, कला, धर्म यांपैकीं कोणत्याच बाबतींत त्यांच्याजवळून शिकण्यासारखे काहीच नव्हते. यामुळें शिवाजीनें त्यांच्याच तोडीची शिस्त व संघटना निर्माण करितांच तो औरंगजेबाच्या प्रबल सेनेलाहि पुरून उरला. पण मोगल आणि मराठे या दोघांचे सामने खेळले जात असतां पाश्चात्य राष्ट्रांत एक नवीन अपूर्व अशी शक्ति निर्माण होत होती. त्या शक्तीपुढें लवकरच मोगल व मराठे दोघेहि निष्प्रभ ठरले.

## पाश्चात्यांचें बलस्थान

हे पाश्चात्य कडवे लढवय्ये आहेत, अत्यंत धूर्त आणि कावेबाज आहेत, त्यांचें आरमार बलिष्ठ आहे, आधीं वखार घालतात आणि पाहता पाहता त्या वखारीचा अभेद्य किल्ला बनून जातो हें चाणाक्षानीं ओळखिलें होतें. पेशवाईत ओळखलें होतें एवढेच नव्हे तर 'आज्ञापत्रकारा'च्या काळीं म्हणजे राजारामाच्या वेळीं व तत्पूर्वी शिवभारतकाराच्या काळीं म्हणजे शिवाजीच्या काळींहि हे बलिष्ठ आहेत, युद्धविद्येंत विशारद आहेत, हें हिंदु आणि मुसलमान या दोघानींहि ओळखिलें होते. शिवभारतकार तिसऱ्या अध्यायात प्रारंभींच लिहितो, "अथाग्नियंत्रसंधानविशेषोदग्र-विक्रमान् । प्राकारयुद्धकुशलान् ऋध्या जितधनेश्वरान् ।। मयमायाधरान् अब्धिमध्यसंचारदुर्धरान् ।" पुढें पेशवाईत तर अधिक स्पष्टपणे उमगूं लागलें. त्यांचीं शस्त्रेंहि आपणापेक्षा अधिक संहारक, अधिक अचूक होतीं हें पटलेलें होते; तथापि दारूगोळा तयार करण्याचे व तोफा ओतण्याचे कांहीं प्रयत्न येथें झाले असले तरी शिवाजीच्या वेळेपासून पेशवाईअखेर तोफा आणि बंदुका पाश्चात्यापासून विकत घेण्याचाच प्रघात असे. मुंबईहून तोफा व गोळे खरेदी करून पाठविण्याचें काम पेशव्याचा साष्टी येथील अधिकारी व मुंबई येथील रत्नोजी आगरवाले व पालनजी पार्शी हे करीत[1]. अर्थात् ज्या शत्रूशीं सामना द्यावयाचा त्याच्याकडूनच संहारक शस्त्रें विकत घेण्याचा लाचारपणा करणारास जय कितपत मिळणार हें वर्तविण्यास कुडली मांडण्याची आवश्य-कताच नाहीं. पण हा लाचारपणा स्वीकारल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. कारण भौतिक शास्त्राची अक्षम्य हेळसांड झालेली होती. फिरंग्याकडून शस्त्रें विकत घेऊनहि त्यानें करामत काय होई याचें खरे शास्त्र्यांनीं वर्णन केलें आहे कीं, "आमच्या फौजाचे मोर्चे एखाद्या किल्ल्यास बसले म्हणजे मोर्च्यांत गोलंदाजानीं एकदा तोफेचा बार काढून पुनः बार भरून ठेवावा, मग चिलीम ओढावी, घटका दोन घटका गप्पागोष्टी कराव्या, इकडे तिकडे थोडें हिंडावें, मग तोफेजवळ जाऊन भरलेला बार सोडावा

१. पेशवेकालीन महाराष्ट्र पृ ५३१.

व दुसरा भरून ठेवावा. पुनः चिलीम, गप्पा वगैरे प्रकार व्हावे; याप्रमाणें सायंकाळपर्यंत दहा-पाच बार काढून तोफ तळावर आणून पोचती केली म्हणजे संपला रोजगार. या लिहिण्यात अतिशयोक्ति बिलकल नाहीं. इंग्रज प्रेक्षकानीं जे लिहून ठेवलें व जुना पत्रव्यवहार आम्हीं जो वाचला आहे त्यावरून अशीच वहिवाट असल्याचें अनुमान निघतें." ('मराठे इंग्रज' प्रस्तावना.)

**पाश्चात्यांचें बळ त्यांच्या श्रेष्ठ शस्त्रांत व शिस्तींत आहे हें हिंदूंनीं ओळखिलें होतें पण त्यांचीं श्रेष्ठ शस्त्रें आणि श्रेष्ठतर शिस्त या दोन्हीच्याहि पाठीशीं असणारें त्यांचें खरें बळ ओळखिलें गेलें नव्हतें. हें त्यांचें श्रेष्ठतम बल त्यांच्या शास्त्रीय प्रगतींत होतें.** दिल्लीदरबारचें रुपेरी छत फोडण्याचा भीमपराक्रम करणारे सदाशिवरावभाऊ आमच्यात होते पण यःकश्चित् घड्याळ करणारा जिनगर आमच्यात नव्हता. इंग्रज हे शत्रूचें सैन्य दहापाच मैलावर असतां आपल्या दुर्बिणींतून न्याहाळीत होते तर आम्ही नक्षत्राकडे पाहून ज्योतिष्याना मुहूर्त विचारीत होतों. स्टीफन्सन् हा आपल्या खिस्तपुराणाच्या शेंकडों प्रती छापखान्यातून छापून काढून गोरगरिबाना वाटीत होता तर त्याच वेळीं एकनाथी भागवताची एकेक प्रत चार महिने खपून आम्ही हातानें लिहून काढीत होतों. पाश्चात्याचे हें शास्त्रीय प्रगतींतील मर्म आम्हीं ओळिखलें नव्हतें. आम्ही दिल्लीन्द्रपदलिप्सवः होतों. आमची नजर बादशाही सिंहासनावर खिळलेली होती. आणि या सिंहासनावर अधिष्ठित झालेले मुसलमान सुलतान आमच्यापेक्षा विद्येमध्यें कोणत्याही रीतीनें पुढारलेले नव्हते. पण जगात इतर राष्ट्रें पुढारलेलीं होतीं त्याची काय वाट ? त्याची दखलगिरी आम्हीं बाळगिली नाहीं हाच आमचा घोर प्रमाद. पेशवाईच्या अखेरीस पुण्यास देवीची साथ उद्भवली. तिचा प्रतिकार यशस्वी रीतीनें कसा करावा हें आम्हास माहीत नव्हते. पण शेजारच्या रेसिडेन्सींत गोरे लोक रहात होते त्यानीं देवीची लस टोचून घेतली, आणि त्यापैकीं कोणी दगावलाहि नाहीं. पुण्यातील लोकाना हें वृत्त कळलें तेव्हां रेसिडेन्सींतील गोऱ्या डॉक्टरला मुद्दाम पाचारण करून हजारों लोकानीं त्याच्याजवळून लस टोचून घेतली. नाना फडणिसानें १७९९

मध्यें काशीस कर्मनाशी नदीवर पूल बांधावयास काढला असता नदीचें पाणीच हटेना. झालें ! आमच्या इंजिनिअरानीं हातपाय गाळले. मांत्रिक-तांत्रिकानीं जलदेवतेला प्रसन्न करण्याकरिता तोडगे केले. नानाचा काशी येथील कारकून कुंटे यानें कुमारस्वामी कोमटी याच्या विद्यमानें अनुष्ठान आरंभिलें. पण शास्त्रीय उपाय योजण्याचे सोडून अर्थशून्य बडबड करणाऱ्या या मांत्रिकाकडे पाहून जलदेवता मनात फक्त हसली असावी. शेवटीं नाना फडणिसानें केलें काय तर बेकर नावाच्या इंग्रज इंजिनियरला बोलावणे धाडलें, आणि तो आल्यावर कृष्णाचा स्पर्श होताच यमुनेनें वाट द्यावी त्याप्रमाणें बेकरच्या कळीच्या बबाचा स्पर्श होताच जलदेवतेने सुखानें पूल बांधू दिला ! (जुन्या ऐतिहासिक गोष्टी इतिहाससंग्रह). इंग्रज लोक हे असल्या विद्येत आपल्यापेक्षा पुढारलेले आहेत हें नाना फडणिसासारख्याना कळून चुकले होतें. पण ही विद्या आपण आत्मसात् केली पाहिजे याची आवश्यकता मात्र त्याना पटल्याचे दिसत नाहीं.

## जगाचें अक्षम्य अज्ञान

त्याचें एक कारण म्हणजे हिंदूंचा विश्वसंचार थांबला होता व ते कूप-मंडूकवृत्तीचे झाले होते. या वृत्तीचें उत्तम निदर्शक उदाहरण म्हणजे त्याचें भूगोलाचे ज्ञान होय. नाना फडणीस त्यातल्या त्यात चौकस व जागृत बुद्धीचा मुत्सद्दी असल्यानें हरतऱ्हेच्या ज्ञानाचा सवाई माधवराव पेशव्याच्या शिक्षणक्रमात समावेश करावा असें त्यास वाटे. पण त्या काळीं खुद्द हिंदूचें भूगोलविषयक ज्ञान हिंदुस्थानच्या बाहेरील प्रांताविषयीं सर्वस्वीं शून्याकार होतें. पुर्तुगालिया, रोम वगैरे काहीं तुरळक नावें त्याच्या कानावरून गेलीं असतील तेवढींच. पण बाकीच्या जगाची त्याना कल्पनाहि नव्हती. नाना देशींचे नाना सौदागर हरतऱ्हेचे, हरहुन्नरीचे जिन्नस विकावयास घेऊन आपल्या बंदरीं येत तसले पदार्थ तयार करण्याची कारागिरी आपल्याकडे नाहीं याची अस्पष्ट जाणीव असे. पण परकीय सौदागर जेथून येतात त्या सातासमुद्रापलीकडे कोणते देश आहेत, तेथें शास्त्र, विद्या, कला कोणत्या दशेप्रत आलेल्या आहेत याची कधीं चौक-

शीच केली गेली नाहीं. उलट चौकस व जागरूक असे पाश्चात्य मराठ्याचा इतिहास लिहीत बसले होते. स्प्रेगल या जर्मन पडितानें १७९१ त मराठ्याचा इतिहास लिहिला ( भा. इ सं. त्रै. ४।११३ ). नाना फडणिसाला वाटले कीं, सवाई माधवरावाकरिता आपण एक भूगोल तयार करावा. पण आपल्या देशात ही विद्या पूर्ण लुप्त झालेली. म्हणून डॉ. फिन्डले नावाच्या एका फिरग्यापासून एक भूगोल त्याने तयार करवून घेतला. बरें, भूगोल तयार करावयाचा तर फिन्डलेकडून नुसती माहिती मिळवून घेऊन आपल्याकडील एखाद्या हुशार पडिताकडून तो लिहवून तर काढावा? तसें न करिता एनाजिन्सी फिन्डलेलाच तो लिहावयास सागितला. आणि फिन्डलेनेहि त्याचा भरपूर फायदा करून घेतला. इग्रजाची विलायत रूमस्थानानजीक आहे, रूमचा बादशहा मुख्य असून दिल्ली वगैरे त्याचे सुभे आहेत असल्या भाकडकथा सागून भूगोलवर्णनाच्या या चोपड्यात इग्रज हिंदुस्थानात आले ते दैवी योजननेच आले असा प्रचारात्मक मजकूरहि दडपून देण्यात आला आहे. "हिंदूचीं कलियुगाचीं पाच हजार वर्षे भरत आलीं आणि तेरवी सद्दीही आली असे योग एकत्र होऊन दिवसेंदिवस धर्माचा उच्छाद व्हावा यास्तव इग्रजी लोकात ईश्वरी शक्ति जास्त होऊन हिंदु व मुसलमान याचा गर्वपरिहार होऊन इग्रजाचा व्याप पृथ्वीवर होऊं लागला."[1] असला हा भूगोल सवाई माधवरावासारख्या श्रेष्ठ पदाधिष्ठित व्यक्तीला नानाफडणविसाने खरोखरच शिकावयास दिला असेल असे मानणें कठीण आहे. पण असला एक कागद दप्तरीं सापडला आहे येवढे मात्र खरे. त्यातील भावार्थ जो कीं आपल्या लोकाचें भूगोलविषयक ज्ञान अगदीं कोरें होतें ते खोटें नाहीं. सजीवनी विद्या हरण करण्याकरिता देवाचा गुरु जो बृहस्पति त्याने आपल्या साक्षात् पुत्राला शत्रूच्या गोटात पाठविलें हा पुराणातरींचा प्रकार नाना फडणिसादि मुत्सद्दी पुराणात वाचीत होते; पण तो दाखला आजकालहि व्यवहारांत आणला पाहिजे ही जाणीव त्याना पटली नाहीं. इग्रज हे शास्त्रविद्येत आपल्यापेक्षा पुढारलेले आहेत हें त्याना दिसत होतें. तोफा व दारूगोळा

---

१. मराठे इंग्रज परीक्षण– प्रो. द. वा. पोतदार.

तयार करण्याच्या विद्या थोड्याबहुत ते त्याच्यापासून शिकत होते. अह्मदाबाद, पुणें वगैरे ठिकाणीं तोफांचे कारखाने उभारले होते. पण या विद्यांच्या पाठीमागे असलेल्या शास्त्रीय प्रगतीची यथार्थ कल्पना त्यांना झालेली नव्हती. ती होणें तर शेपन्नास तल्लख बुद्धीचे विद्वान् आणि कारागीर विलायतेस पाठवावयास हवे होते. जपाननें हें मर्म ओळखलें आणि म्हणून अवघ्या पन्नास वर्षांच्या मुदतींत शास्त्रीय प्रगतींत आपलें राष्ट्र पाश्चात्य राष्ट्रांच्या मालिकेंत त्यानें आणून बसविलें. आम्हीं हें मर्म ओळखलें नाहीं म्हणून पाश्चात्यांच्या आहारीं गेलों. हें मर्म आमच्या पूर्वजांच्या लक्षात का आलें नसावें व शास्त्रीय प्रगति कुंठित का झाली असावी याची थोडी अधिक चर्चा पुढील प्रकरणीं करण्यात येईल.



## प्रकरण पंधरावें

# संस्कृतीच्या स्थिरावस्थेची चर्चा



आपल्या भारतीय संस्कृतीचा विकासप्रवाह कैक शतकें जोमानें आणि वेगानें वाहल्यानंतर मुसलमानी संस्कृतीच्या आक्रमणाच्या सुमारास त्याचा जोर कमी होऊं लागून तो स्थिरावूं लागला व त्यावर अज्ञान, मिथ्याभिमान, कुटीरपणा वगैरेंचें शेवाळें माजू लागलें, व त्याच्या योगानें प्रथम मुसलमानाच्या पुढे व नंतर इंग्रजाच्या पुढे आपणास लाचारपणा स्वीकारावा लागला हें आपण मागील दोन प्रकरणीं पाहिलें. या दोन्ही आक्रमकाचा आपणास यशस्वी प्रतिकार करता आला नाहीं याचीं कारणें सर्वस्वीं एकाच प्रकारचीं नसलीं तरी सामाजिक जीवनात व रणांगणावर अशा दोन्ही ठिकाणीं अवश्य असणारी उभारी व शिस्त हीं कमकुवत झालीं होतीं हें कारण समान होय. मुसलमान हे हिंदूच्यापेक्षा शास्त्र, विद्या, कला यात अधिक पुढारलेले होते असें नव्हे; पण नवीन विद्या हस्तगत करण्याची तीव्र लालसा मात्र त्याच्या ठिकाणी उदित झालेली होती. हिंदु पंडित हे आपल्या विद्येनें स्वतःच दिपून गेले होते तर मुसलमान हे हिंदूंची विद्या व ग्रीकाची विद्या अत्यंत हौसेनें आणि चिकाटीनें आत्मसात् करीत होते. हिंदूंत जातीच्या उपजाती वाढत होत्या तर भिन्न भिन्न देवतांची उपासना करणाऱ्या भिन्न जातींना एकेश्वरी पंथाची घोषणा करणारा इस्लाम एकत्र आणीत होता. हिंदु हे समुद्रयान निषिद्ध मानण्याच्या मार्गावर होते तर मुसलमान हे स्पेनपासून चीनपर्यंत खुष्कीनें आणि अरबस्थानापासून मलाया द्वीपकल्पापर्यंत समुद्रमार्गें व्यापारी वाहतूक काबीज करीत होते. हिंदु हे शत्रु तावडींत सापडला असताही औदार्याच्या भ्रामक कल्पनांस बळी पडून गैरमुत्सद्दीपणानें वागत होते तर मुसलमान हे शत्रूला जरब बसेल अशा रीतीनें पुरे ठेचून काढीत होते. पराभव

होतोसा वाटताच दैवाचा प्रतिकूल कौल समजून हिंदु पळ काढीत होते तर मुसलमान शिस्तीने शेवटपर्यंत टिकाव धरीत होते. आणि शेवटीं मुसलमानास उत्तम रणनेते लाभले तसे हिंदूंना लाभले नव्हते. अर्थात् या सर्व बाबतींत इस्लामच्या समोर हिंदु नामोहरम व्हावेत हे क्रमप्राप्तच होतें. त्याप्रमाणें ते बाराव्या तेराव्या शतकात हतप्रभ झाले. दोन तीन शतकानतर इस्लाम-धर्मीयातही फाटाफूट, मत्सर व चुरस सुरू झाली आणि औरंगजेबाला गोवळकोंडा व विजापूर येथील इस्लामी राज्यें बुडवून टाकणें इष्ट वाटलें. मुसलमानी राजामधील फुटीचा फायदा घेण्याइतके हिंदूही हळू हळू सावध झाले व त्याना शिवाजीसारखा अव्वल दर्जाचा नेता मिळाला. यापुढें हा लढा मुसलमान व मराठे यामध्येच राहिला असता तर अखिल भरतखंडभर मराठ्याचें राज्य पसरणे अशक्य नव्हते. पण सतराव्या अठराव्या शतकात पाश्चात्याच्या आक्रमणाचा जो प्रचंड रणगाडा फिरूं लागला त्याला प्रति-कार करण्याचे सामर्थ्य मुसलमान वा हिंदु यापैकीं कोणाच्याही अंगीं वसत नव्हते. या आक्रमणाचे स्वरूपच निराळे होतें. या आक्रमणाच्या काळीं हिंदु व मुसलमान दोन्हीही समाजशासन, शास्त्र, शस्त्र, शिस्त या बाबतींत पाश्चात्याच्यापेक्षा मागासलेले होते.

ते तसे मागें का पडले असावे याविषयीं तर्क लढविणें हा इतिहासातील एक कूट व म्हणूनच आकर्षक असा उद्योग होय. या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देण्याइतकें इतिहासशास्त्र प्रौढ झालेले नसलें व आवश्यक तेवढी साधनसामग्री उपलब्ध झालेली नसली तरी त्याकरिता थाबून न रमता सुचतील तीं अनुमानें बाधीत राहण्यानेच इतिहासशास्त्राची प्रगति होणार आहे. म्हणून पाश्चात्य संस्कृतीच्या आक्रमणप्रसंगीं भारतीय संस्कृतीचा जोम कमी का झालेला होता याची पाश्चात्य इतिहासकारापैकीं एक-दोघानीं केलेली मीमांसा प्रथम पाहूं या.

## इतिहासमीमांसक मार्क्स

गेल्या शतकातील पाश्चात्य इतिहासमीमासकामध्यें कार्ल मार्क्स याचें स्थान फार उच्च आहे. इतिहासमीमांसेचें एक स्वतंत्र दर्शनच त्यानें स्थापन

केले. इतिहासातील अनेक घटनाचा उलगडा एका विशिष्ट तत्त्वानुसार होऊ शकेल असें तत्त्व माडणारा तो दार्शनिक होय. मार्क्सनें जें असें व्यापक तत्त्व म्हणून माडले तें म्हणजे ऐतिहासिक घडामोडी या आर्थिक घडामोडींच्या पोटीं जन्मास येत असतात हे होय. कोणत्याही राष्ट्राची प्रगति वा परागति होत असेल तर त्याचीं कारणे त्या राष्ट्राच्या आर्थिक औद्योगिक जीवनात शोधलीं पाहिजेत. आर्थिक जीवन रुद्ध झालेले असेल तर एकंदरींत सास्कृतिक जीवनच रुद्ध अथवा स्थिर होईल. हा आपला सिद्धान्त मार्क्सने हिंदुस्थानच्या ऐतिहासिक घडामोडीला लावून पाहिला आहे. पाश्चात्याच्या पुढें हिंदुस्थानला टिकाव धरता आला नाही ही ऐतिहासिक घटना मार्क्सच्या मीमासेचा विषय आहे. या मीमासेंत हिंदु हे राजकारणात आणि उद्योगकारणात मागासलेले असल्यानें त्याचा पराभव हा ठरून चुकलेलाच होता हें मार्क्सनें योग्य रीतीने दाखविलें आहे. पण ते मागसले का हाच खरा अधिक कूटप्रश्न आहे. त्याचें मात्र मार्क्सने दिलेलें उत्तर समाधानकारक नाहीं.

हिंदुस्थान इग्रजाचा गुलाम बनला तो हिंदु संस्कृति ही पाश्चात्य संस्कृतीच्या चढाओढींत मागे पडत चालली होती म्हणून बनला.

हिंदुस्थानचें हें मागसपण दोन तऱ्हेचें आहे. उद्योगधंदे व भौतिकशास्त्रोपासना यातील मागसपण हें एक, व सामाजिक आणि राजकीय संघटना यामधील मागसपण हें दुसरें. इंग्लडचा आणि हिंदुस्थानचा सामना झाला तेव्हा या दोन्ही अंगात हिंदुस्थान हा इंग्लंडपेक्षा मागासलेला होता. उद्योगधंद्याची वाढ व शास्त्रीय शोध या दोहोंचा परस्परावलंबी असा संबंध आहे. दोहोंचीहि प्रगति परस्पराच्या मदतीनेंच होते आणि दोहोंनाही साहाय्य होतें तें राजकारणात वैश्यवर्गाचें स्थान सुप्रतिष्ठित होत जाणें, म्हणजेच व्यापारात लहानमोठ्या प्रमाणात माडवलशाही व राज्यकारभारात कमीअधिक स्वरूपाची लोकशाही याचे होत असतें. उद्योगधंदे ज्या प्रमाणांत वाढलेले असतील त्या प्रमाणात युद्धोपयोगी शस्त्राचीहि निपज होऊं शकते. कारण शाततेच्या काळात जे उद्योगधंदे जीवनाच्या हरएक गरजा दूर करतात तेच उद्योगधंदे युद्धकाळीं आपल्या सैन्याची रसद व शत्रुसंहाराचीं शस्त्रें पुरवूं शकतात. तसेंच लोकशाहीचें. लोकशाही ही

जितक्या प्रमाणात सर्व लोकात विस्तारलेली असेल व रुजलेली असेल तितक्या प्रमाणात लोकाना राष्ट्रावरील संकट तें सर्वांवरील संकट असें वाटू लागतें व स्वयंस्फूर्तीनें सैन्यात शिरण्यास लाखों नागरिक तयार होतात. यामुळें उद्योगधंद्यात भांडवलशाही व राज्यकारणात लोकशाही हीं ज्या राष्ट्रात सुप्रतिष्ठित झालेलीं असतील ते राष्ट्र बलिष्ठ ठरावें हें स्वाभाविक. साम्यवादाचा उदय शेदीडशे वर्षांपूर्वी झालेला नसल्यानें त्याचा विचार तूर्त बाजूस ठेवूं. या दृष्टीनें इंग्लंड व हिंदुस्थान याची झुंज ज्या वेळीं जमली त्या वेळीं हिंदुस्थान हें दुर्बल ठरावें हें क्रमप्राप्तच असें होतें. भांडवलशाहीचें उद्योगकारण व राजकारण हें खाजगी उद्योगधंद्यापेक्षा व जमीनदारी राजकारणापेक्षा पुढारलेलें असतें हाच त्याचा अर्थ, व तो मार्क्सने योग्य रीतीने लावून दाखविला आहे.

पण पुढारलेलें राजकारण व उद्योगकारण हिंदुस्थानात निर्माण का झालें नाहीं याची त्यानें केलेली कारणमीमांसा मात्र प्रत्ययोत्पादक नाहीं. उद्योगधंद्यामध्यें व शास्त्रीय शोधामध्यें मागसलेलें हिंदुस्थान जागतिक राजकारणात पराभूत झालें हें ठीक पण जे हिंदुस्थान दहाव्या बाराव्या शतकापर्यंत उद्योगधंद्यात व वैद्यक, ज्योतिष, रसायन आदि करून शास्त्रात त्या कालाच्या मानानें पाश्चात्य राष्ट्रांच्या तोडीचें होते ते हिंदुस्थान पंधराव्या सोळाव्या शतकापासून हळू हळू मागें का पडूं लागले हाच खरा अवघड प्रश्न आहे. या बाबतींत मार्क्सनें जीं कारणें दिलीं आहेत तीं समाधानकारक वाटत नाहींत.

शास्त्रीय संशोधन, उद्योगधंद्याची प्रगति व व्यक्तिस्वातंत्र्यसंवर्धन या सर्व बाजूंनीं अपकर्षाचा हेलकावा पाहण्याचा प्रसंग हिंदुस्थानावरच आला असें नव्हे—युरोपलाही या अवस्थेचा अनुभव चाखावा लागला होता. तोही थोडा काळ नव्हे, तर जवळ जवळ हजार वर्षे. पांचव्या शतकातील रोमन राज्याच्या अमलापासून तों पंधराव्या शतकातील विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या कालापर्यंतचा दहा शतकाचा दीर्घकाल हा युरोपच्या इतिहासांत अज्ञानांधकाराचा काल म्हणून मानला जातो. या कालात व्यापाऱ्यांचे संघ स्थापिले गेले, खुष्कीनें पूर्वेकडील दूरदूरच्या देशांतील माल आणून व्यापार करण्याचा उद्योग चालू राहिला, कलाकौशल्याला उत्तेजन

मिळत राहिलें. पण नवनव्या उद्योगधंद्यांची वाढ होणें, व्यापाऱ्याचें शासनसंस्थेंत वजन वाढणें, विचारस्वातंत्र्य फैलावणें, भौतिक शास्त्राचें संवर्धन होणें या दिशेनें हा काल स्थिरावस्थेचा काल होय.

या कालाच्या अंतीं युरोप या स्थिरावस्थेंतून बाहेर पडलें आणि हिंदुस्थान मात्र त्याच अवस्थेंत घुटमळत राहिलें. असें का व्हावें ? युरोपलाहि आपली मध्ययुगीन कात टाकण्याला दहा शतकें लागलीं. तर त्याच हिशेबानें मिळाला त्यापेक्षा थोडा अधिक काल स्वतःच्या प्रगतीस मिळता तर कदाचित् हिंदुस्थानही आपल्या स्थिरावस्थेंतून बाहेर पडला नसता म्हणून कशावरून असा विचार साहजिकपणें सुचेल. तसें घडलें नाहीं ही वस्तुस्थिति आहे. किंबहुना तसे काहीं घडेल अशीं पूर्वचिन्हें पेशवाईअखेरपर्यंत दिसून येत नाहींत.

शास्त्रीय ज्ञानाची वाढ ही राष्ट्राच्या गरजाबरोबर स्वाभाविकपणें होत जावी हा एक प्रकार. तो हिंदुस्थानात इंग्रजी राज्य स्थापन होण्याच्या आधीं घडला नाहीं दुसरा प्रकार म्हणजे जपानमध्यें घडला तो. पाश्चात्याच्या विज्ञानप्रगतीपुढें आपला टिकाव लागणार नाहीं हें लक्षात येताच जपाननें ते विज्ञान आत्मसात् करण्याची भीष्मप्रतिज्ञा केली व तींत विलक्षण यश संपादलें. आज जपानचा पराभव झाल्यामुळें त्याची शास्त्रीय उपासना फुकट गेली असें क्षणभर वाटण्यास संभव आहे. पण हें खरें नाहीं. जपानी बादशहानें स्वतः कबूल केल्याप्रमाणें जपानचें शास्त्रीय संशोधन व त्यास लागणारी अजस्र साधनसंपत्ति हीं अमेरिकेच्या मानानें कमी पडलीं हें जपानच्या पराभवाचें कारण. त्याचें चीनवर आक्रमण व साम्राज्यशाही धोरण यानींही पराभवास हातभार लावला. पण आज पराभव झाला असला तरी त्याची विज्ञानोपासना व औद्योगीकरण हीं फुकट गेलीं असें समजणें चूक होईल. जपानचा पुनरुद्धार व्हावयाचा असेल तर तो याच्याच बळावर. या दोन्हींकडे ज्या राष्ट्रानें पाठ फिरवली त्याला चालू आंतरराष्ट्रीय जीवनकलहात स्वतंत्र राष्ट्र म्हणून जगणेंच अशक्य होईल.

पण जपानसारखा प्रकार हिंदुस्थानात का घडला नाहीं ? शास्त्रीय

ज्ञानात आपला टिकाव लागणार नाहीं हे ध्यानीं येताच तें ज्ञान आत्मसात् करण्याचा भगीरथ प्रयत्न जसा जपानने सुरू केला तसा करण्याचें हिंदुस्थानला का सुचलें नाहीं किंवा त्याला अगत्य का वाटले नाहीं ? मराठे, रजपूत किंवा मोगल यापैकीं कोणालाच कसे वाटले नाहीं ?

टोपीकराचे शस्त्र आपल्यापेक्षा तिखट आहे याचे ज्ञान त्याना नव्हते असें नव्हे; ते सर्वांना प्रत्यक्ष रणांगणावरच मिळत होतें; पण त्या शस्त्राच्या पाठीशीं असलेल्या शास्त्रीय प्रगतीची मात्र त्याना यथार्थ कल्पना झाली नसावी. शास्त्रीय प्रगतीमुळेच साध्य होणाऱ्या अशा आरसे, झुंबरें, घड्याळ, दुर्बीण, देवीची लस, शोभेचे दारूकाम अशा अनेक चिजा बाजारपेठात येऊं लागल्या होत्या. असल्या फर्मासीच्या चिजा आपल्याकडे दुर्मिळ असल्याने त्या जबर मोल देऊन विकत घेण्यात येत. पेशव्याच्या खाजगी खर्चाच्या एका नोंदीत तीन घड्याळयाना२७७७रुपये दिल्याचे नमूद आहे. इंग्रजाच्याकडून नजराणे म्हणून किंवा विकत म्हणून घेतलेल्या हुन्नरी वस्तूंत घड्याळें व दुर्बिणी असत. काच हिंदुस्थानात फार प्राचीन काळापासून माहीत आहे पण दुर्बिणी करण्याची विद्या निघाली नव्हती. त्यामुळें याबाबत इंग्रजावर अवलंबून रहावें लागे. मेणबत्त्या, आरसे, पचरंगी काचेचीं भिंगें, कुलुपे, कागद या वस्तूही इंग्रज पुरवीत. असल्या वस्तु इकडे होत पण इंग्रजाचा माल या प्रत्येक बाबतींत अधिक टिकावू व सुबक येऊं लागला होता. असल्या जिनसानीं व्यापारी जगात इंग्रजानीं आपले वर्चस्व केव्हाच स्थापन केलें होते.[1]

पण या जिनसाकडे पाहण्याची दृष्टि ही फक्त कौतुकाची होती. त्या श्रीमंताच्या उपयोगी असत व ऐश्वर्य-प्रदर्शनापुरताच त्याचा उपयोग मानण्यात येई. त्याना आधारभूत असलेलें शास्त्रीय ज्ञान हे फर्मासीच्या चिजाच्याबरोबर प्राणघातक चिजाही निर्माण करू शकतें याचें योग्य आकलन झालें नव्हतें.

---

१. पेशवे दप्तराच्या २२ व्या भागांत असली पुष्कळ माहिती आलेली असून त्यातील व इतर ग्रंथांतील माहितीचें उत्तम संकलन वा. कृ. भावेकृत 'पेशवेकालीन महाराष्ट्र' (प्रकरण २०) मध्ये सापडेल.

## जपान व हिंदुस्थान

तें न होण्याचें एक कारण लक्षात येण्यास टोपीकर व्यापारी आणि हिंदु राजे याच्यामध्यें जेव्हा कटकटी सुरू झाल्या त्या वेळचा काळ आपण लक्षात घेतला पाहिजे. अठराव्या शतकाच्या मध्याला प्रथम इंग्रजांनीं बंगालमध्यें पाय रोविला व त्या शतकाच्या शेवटीं सर्व देश हस्तगत केला. हा सर्व प्रकार अठराव्या शतकात घडला, एकोणिसाव्या शतकात नव्हे, हें लक्षात घेणें महत्त्वाचें आहे. अशाकरिता कीं शास्त्रीय शोधातील डोळे दिपवून टाकणारे असे क्रांतिकारक जे शोध ते एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील होत. वाफेचा व विजेचा उपयोग उद्योगधंद्यात व दळणवळणाच्या साधनात होऊं लागला तोहि एकोणिसाव्या शतकात —म्हणजे हिंदुस्थानचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यानंतरच्या कालात ! त्याच्या पूर्वी म्हणजे सतराव्या व अठराव्या शतकात विज्ञानाच्या बाबतींत युरोप हिंदुस्थानच्या पुढें गेलेलें होते हे खरें व त्यामुळेंच घड्याळें, दुर्बिणी, कागद, लोखंड, औषधें वगैरे विज्ञानसाध्य अशा अनेक चिजा हिंदुस्थानच्या पेठेंत मिरवूं लागल्या होत्या. पण वाफेच्या व विजेच्या साहाय्यानें विराट् रूप धारण करणारी प्रचंड कारखानदारी अद्याप अस्तित्वात आली नव्हती.

वाफेच्या यंत्राचा शोध लागला तो १७८२ मध्यें. पण प्लासीच्या रणांगणावर बंगाल इंग्रजाचा ताब्यात गेला तो त्यापूर्वी म्हणजे १७५७ सालीं, आणि वाफेनें चालणाऱ्या आगगाड्या, आगबोटी व गिरण्या ह्या सुरू झाल्या त्या तर पेशवाई नष्ट झाल्यानंतर अथवा हिंदुस्थान सर्वच्या सर्व इंग्रजाच्या ताब्यात गेल्यानंतर. यामुळें टोपीकर हे अनेक दुर्मिळ व फर्मासी चिजा हिंदी पेठांतून माडूं लागले असले तरी ते हिंदुस्थानच्या पेठांच्या पेठा धुळीस मिळवतील हें दृश्य त्या वेळीं स्वप्नींही येणें कठीण होतें. सुताचें कापड तर हिंदुस्थानातूनच इंग्लंडमध्यें एवढ्या प्रमाणावर जात होतें कीं त्यावर निर्बंध घालून इंग्रजी धंद्यांना उत्तेजन देणें इंग्लंडला आवश्यक वाटलें. अशा स्थितींत उद्योगधंद्यांवर पुढें

येणाऱ्या संकटाचें चित्र डोळयापुढें उभें रहावें कसें ? आमचे लोक पर-देशीं मुशाफरी करून तेथील प्रत्यक्ष स्थिति अवलोकन करते तरच भावी संकटाची कल्पना येण्याचा काहीं संभव होता; पण तसला जागरूकपणा व चौकसपणा आपणामध्यें लोपला होता हे आपण मागें पाहिलेंच आहे. अर्थात् पाश्चात्यांचें शास्त्रीय ज्ञान आत्मसात् करण्याचे अगत्य एकोणिसावें शतक अर्धें लोटून गेल्यानंतर जपानला जसें पटावे तसें अठराव्या शतका-तील पेशव्याना तितकेंसें पटलें नसल्यास अगदींच आश्चर्यकारक नव्हे.

आता प्रश्न असा कीं, मध्ययुगीन अज्ञानयुगातून युरोप बाहेर पडलें तसें हिंदुस्थान का पडलें नाहीं ? मध्ययुगापूर्वी ग्रीसमध्यें ज्या प्रमाणात भौतिकशास्त्राची व चिकित्सक बुद्धीची वाढ झाली होती तेवढी वाढ त्या वेळीं हिंदुस्थानातही झालेली होती. त्या काळीं वैद्यक, ज्योतिष, गणित ह्या शास्त्रात ग्रीक आणि हिंदु सारखेच पुढारलेले होते. दोघाच्यात दळणवळण असून एकमेकाच्या विद्येचा लाभहि एकमेव घेत होते. रोमच्या अस्ताबरोबर युरोपमधील चिकित्सक बुद्धि खुरटली, पण सुमारें दहा शतकें लोटल्यावर तिला पुनश्च नवे धुमारे फुटू लागले व दोन तीन शतकात जगाला गवसणी घालण्याइतका तिचा विस्तार वाढला. उलट हिंदुस्थानात मात्र सातव्या आठव्या शतकापर्यंत वैद्यक, ज्योतिष, गणित, रसायन, स्थापत्य वगैरे शास्त्राची जोपासना जी चालू होती त्याची ज्योत जी एकदा मंद होऊं लागली (रसायनाचा जोर चार पाच शतकें अधिक टिकला) ती पाश्चात्याच्या हातीं स्वातंत्र्याचें उदक सोडण्याच्या कालापर्यंत, म्हणजे अठराव्या शतकाच्या अंतापर्यंत, पुन्हा प्रज्वलित झालीच नाहीं. हें असें का व्हावें ? पाश्चात्यां-च्यामध्यें दहा शतकाच्या दीर्घ निशेनंतर का होईना विज्ञानोपासनेचा सूर्य उमाळ्यावर येऊं लागला व दोन तीन शतकात आपल्या तेजानें सगळ्या जगाला दिपवून सोडूं लागला. पण हिंदुस्थानात शास्त्रीय ज्ञानाला नवा बहर अठराव्या शतकापर्यंत आलाच नाहीं. हिंदूंमध्यें बुद्धीची कुशाग्रता कमी होती असें कोणीच म्हणूं शकणार नाहीं. कुशाग्रतेची साक्ष देणारी रमण, बोस, रामानुज, कपिलाश्रमाचे लिमये अशी मंडळी आपणांमध्यें आजकाल वावरत आहेतच ना ! मग पाश्चा-

त्याची बुद्धि भौतिक शास्त्राकडे वळली तशी आपल्याकडील चिकित्स-कांची का वळली नाहीं? हिंदुस्थानातीलच चिकित्सकांची नव्हे तर युरोप-बाहेरच्या दुसऱ्या कोणत्याच देशातील चिकित्सकाची का वळली नाहीं?

## मार्क्सकृत मीमांसा

वळली नाहीं यामुळें साहजिकच अशी शंका सुचते कीं युरोप व आशिया या खंडातील भौगोलिक व आर्थिक परिस्थिति ही भिन्न असल्या-नेंच तर हा फरक पडला नसावा ना? या फरकासंबंधीं मार्क्स व एंजल्स यानीं आपल्या परीनें विचार केला आहे. मार्क्स व एंजल्स याचा पत्र-व्यवहार, मार्क्सची 'न्यू यॉर्क ट्रिब्यून' पत्रातील लेखमाला व त्याचा भाडवलशाहीवरील सुप्रसिद्ध ग्रंथ यात तो आलेला आहे. मार्क्सचें हिंदु-स्थानच्या इतिहासाकडे लक्ष गेलें तें पुढील कारणाकरिता. १८४८ सालीं युरोपमध्यें लोकशाही स्वरूपाच्या क्रांतीची मोठी लाट उसळली, पण ती यशस्वी न होता साम्राज्यशाही व भाडवलशाही याचा अंतीं विजय झाला. तो का झाला या घटनेचा विचार करताना मार्क्सला असे आढळून आलें कीं आशिया, आफ्रिका वगैरेतील मागसलेले देश जोंपर्यंत लुटावयास मिळत आहेत तोंवर भांडवलशाही नष्ट होणें शक्य नाहीं; उलट तिचा अधिकाधिक विकासच होईल. भाडवलशाहीच्या या आक्रमणापुढें उद्योगधंद्यात मागस-लेल्या देशाचा टिकाव लागणें शक्यच नाहीं. पण या मागसलेल्या देशांना मारतामारताच मात्र भाडवलशाही स्वतःचें मरणही ओढवून घेईल. ते ते देश पादाक्रांत केल्यावर त्याच्या कानाकोपऱ्यातून कच्चा माल शोषून घेण्या-करिता व पक्का माल फैलावण्याकरिता आगगाड्या, तारायंत्रें वगैरे सुरू करावीं लागतील त्यातूनच पुढें या मागसलेल्या देशातून भांडवलशाही यंत्रयुग सुरू होईल व अशा रीतीनें जगभर भाडवलशाही यंत्रयुग विस्तारलें गेलें व आणखी लुटायला देश राहिले नाहींत असें झालें म्हणजे भांडवलशाही ही आपल्या मरणानेंच मरेल व त्यातून समाजसत्तावाद यशस्वी होईल.

या पद्धतीनें उपपत्ति बसवीत असता आशियांतील राष्ट्रें हीं उद्योगधंदे व शास्त्रीय शोध यात मागें कां पडलीं याचा विचार क्रमप्राप्त आला. हा

विचार मनात घोळत असता १८५३ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीची सनद पुनश्च चालू ठेवण्याचा प्रश्न पार्लमेंटपुढें आला. तें टिपण साधून मार्क्सनें हिंदुस्थानविषयक आपले विचार 'न्यू यॉर्क ट्रिब्यून' या वर्तमानपत्रात एका लेखमालेच्या रूपानें माडले. त्याचा मित्र एंजल्स याच्याबरोबर त्यानें पत्रव्यवहारानें विचारविनिमय केला तोही प्रसिद्ध आहे. त्याच्यावरून दोघाचेही विचार कळून येतात, व ते गैरमाहितीवर उभारलेले आहेत हेंही कळून चुकते !

मार्क्सच्या मते हिंदुस्थानात उद्योगधंद्याची वाढ झाली नाहीं याचीं कारणे तीन. पहिले कारण खेड्यापाड्यात शेतजमिनीच्या खाजगी मालकीचा अभाव. दुसरे कारण म्हणजे दळणवळणाच्या साधनाचा अभाव. तिसरें खेड्यातील स्वयपूर्ण जीवन. या तिन्ही विधानाना इतिहासात पुरेसा पुरावा आढळून येत नाहीं हें इतिहासज्ञास सागावयासही नको. पण मार्क्सच्या महनीय व्यक्तिमाहात्म्याने त्याचीं चुकीचीं विधानेंही प्रमाणभूत मानलीं जाण्याचा सभव आहे म्हणून दिग्दर्शन करतों. मार्क्सने आपल्या कॅपिटल ग्रथामध्ये हिंदुस्थानातील गावगाड्याचें वर्णन दिलेलें आहे. त्यात तो लिहितो कीं, "या छोटेखानी गावगाड्याचा पाया म्हणजे जमिनीची समाईक मालकी, धंद्याची कुलपरंपरा व परस्पराच्या गरजा गावातल्या गावात भागविण्याची स्वयंपूर्ण व्यवस्था हा होय. गरजा थोड्या आणि जरूर ते सर्व कारू नारू गावातल्या गावातच. यामुळें राजाला कर म्हणून जो माल बाहेर जाई तो सोडला तर औद्योगिक व्यापव्यवहार गावकुसूच्या आतच चालावयाचा. गरजा अल्प व त्या निवारण्याची योजना गावातल्या गावात, यास्तव हा गावगाडा शतकानुशतकें लोटलीं किंवा राज्यकर्त्या आल्या आणि गेल्या तरी आपल्या ठराविक चाकोरीच्या बाहेर येण्याचें कारणच उद्भवलें नाहीं. यामुळें गावगाड्याची ठराविक चाकोरी हीच हिंदुस्थानच्या, किंबहुना आशियातील देशाच्या, मागसलेपणास जबाबदार होय." हिंदुस्थानविषयक जें वाङ्मय त्या कालीं मार्क्सला उपलब्ध होतें त्यावरून मार्क्सनें हें गावगाड्याचें वर्णन केलें आहे ( विल्क्स व कॅंबेल या दोघाच्या ग्रंथाचा तळटीपेंत उल्लेख आहे.) पण मार्क्सला मिळाले ते ग्रंथ हिंदुस्थानच्या परिस्थितीचा योग्य परिचय करून देणारे नसावे असें

दिसतें. मार्क्सच्या मतें हिंदुस्थानच्या मागसलेपणाचीं कारणें (१) जमिनी-वरील खाजगी मालकीचा अभाव, (२) खेड्यातील अल्प गरजा भाग-विण्यापुरते अल्प व स्वयंपूर्ण उद्योगधंदे, व (३) दळणवळणाच्या साधनाचा अभाव हीं होत. पण इतिहास या कारणाचा पाठपुरावा करताना दिसत नाहीं. कसें तें क्रमशः पाहूं या.

पहिलें कारण शेतीची समाईक मालकी. युरोपमध्ये अनेक देशात प्राचीन काळीं खेड्यातील जमीन ही समाईक मालकीची असे. आता हिंदुस्थान हें फार पुरातन अवस्थेतच आहे अशी चुकीची समजूत झाली असेल तर येथील खेड्यातील जमीन ही समाईक मालकीची असावी असा गैरसमज पसरला असावा. पण तो गैरसमज होय. वस्तुस्थिति अशी कीं खेड्यातील गुरचराईचें रान तेवढें समाईक असे व असते, पण शेतीच्या लहान लहान पट्टया या ज्याच्या त्याच्या मालकीच्या असतात व त्या गहाण टाकता येतात किंवा विकता येतात. नागरठी, बेणणी, कापणी अशा प्रसंगीं इरजीकाचा म्हणजे गावातील सगळयानीं एकमेकाना मदत करण्याचा धारा असतो; पण मालकी ज्याची त्याची खाजगी असते. आणि हा प्रकार आज शेकडो वर्षें रूढ आहे. 'स्थाणुच्छेदस्य केदारम्' हा न्याय मनूनें स्वीकारला आहे. कुटुंबाकुटुंबाची तर खाजगी जमीन असेच पण समाईक कुटुंबपद्धति रूढ असतानाहि जरूर वाटल्यास भावाभावाची किंवा बाप व मुलें याची वाटणी होण्यास, जमिनीसुद्धा सर्व जिंदगीची वाटणी होण्यास, कायद्याची किंवा रूढीची मना नसे. स्मृति-काराना विभक्त कुटुंबपद्धति गौण वाटे असेंही नाहीं. उलट विभक्त झाल्यानें हव्यकव्य, श्राद्ध वगैरे धर्मक्रिया एकाच्या ऐवजीं अनेक ठिकाणीं होऊं लागतात म्हणून विभक्ततेचें त्यानीं स्पष्ट समर्थनही केलें आहे ! मनु लिहितो, "एवं सह वसेयुर्वा पृथग्वा धर्मकाम्यया । पृथग्विवर्धते धर्मः तस्माद्धर्म्या पृथक्क्रिया ॥ (९.१११). स्मृतिग्रथामध्यें ही वाटणी कशा प्रकारें करावयाची याचा तपशीलही दिलेला आहे. वाटणीमध्ये काहीं वस्तु वाटावयाच्या नसतात, त्याचा जो मनुस्मृतींत उल्लेख आहे (वस्त्रं पत्रं अलं-कारं कृतान्नं उदकं स्त्रियः । योगक्षेत्रं प्रचारं च न विभाज्यं प्रचक्षते ॥) त्यातही जमिनीचा समावेश नाहीं. खरेदीविक्रीला गावकऱ्याची संमति लागे

पण या संमतीचाही अर्थ गावकऱ्यांना कळवावें लागे येवढाच होता. याज्ञवल्क्यस्मृतीचा टीकाकार विज्ञानेश्वर लिहितो कीं, " ग्रामानुमतिः व्यवहारप्रकाशनार्थं न पुनः अनुमत्या विना व्यवहारासिद्धिः ॥"(याज्ञ.२.११४) वस्त्र, अलंकार वगैरेंची वाटणी करूं नये असें जें मनूचें वचन आहे त्यातूनही टीकाकारानीं पळवाटा काढल्या आहेत. बृहस्पति स्मृतिकार तर निपटून लिहितो कीं असल्या जिनसाचे वाटप करू नये असे म्हणणारांनीं नीट विचारच केलेला नसावा ! कारण वस्त्रालंकार हें तर श्रीमंताचें धन होय. तेव्हा सर्वांची युक्तियुक्तीनें वाटणी करावी. सेतू व क्षेत्र याची देखील वाटणी करावी. " वस्त्रादयोऽअविभाज्याः यैरुक्तं तैर्न विचारितम् । धनं भवेत् समृद्धाना वस्त्रालंकारसंश्रितम् । यथा भागानुसारेण सेतुः क्षेत्रं विभज्यते ॥ "[1] स्थावरजिंदगीचे वाटप करूं नये, ती समाईक समजावी, सबंध गावाची किंवा सबंध कुटुंबाची समाईक मानावी अशी युरोपातल्याप्रमाणें हिंदुस्थानातही अति प्राचीनकालीं प्रवृत्ति होती. याचे अवशेष पंजाब व मलबार यात सबंध गावाची समाईक जमीन व कुटुंबाची समाईक जमीन या रूपानें आजही काहीं ठिकाणीं आढळतात. त्या प्रवृत्तीच्या निदर्शक वचनाचा उल्लेख विज्ञानेश्वराने दायभागावर लिहितांना केला आहे. पण तीं वचने बंधनकारक नाहींत असाच त्याचा अभिप्राय आहे. स्थावर विकताना सर्वांची संमति घ्यावयाची ती विभक्त-अविभक्त वगैरे संशय राहूं नये म्हणून व्यवहारसौकर्यांकरिता घ्यावयाची हें त्यानें स्पष्ट केलें आहे.

ह्या खाजगी मालकीच्या हक्काचा मागोवा घेत प्राचीनतर कालाकडे गेलों तर तो थेट वैदिक कालापर्यंत जाऊन पोंचतो. वैदिक वाङ्मयातहि खेड्यापाड्यातील शेतजमीन समाईक मालकीची होती असे उल्लेख नाहींत.[2] उलट वसिष्ठ ऋषि आपल्या जिंदगीची वाटणी करीत आहे असा उल्लेख आढळतो. अर्थात् हिंदुस्थानची स्थितिप्रियता ही जमिनीवरील समाईक मालकीच्यामुळें उत्पन्न झाली ही उपपत्ति टिकण्यासारखी नाहीं. मार्क्सलाही थोडी शंका आली होती. १८५३ च्या 'ट्रिब्यून'मध्यें तो निःशंकपणें लिहितो

१. गायकवाड प्रत पृ. १९५.

२. There is no trace in Vedic literature of communal property, nor is there mention of communal cultivation—*Vedic Index*. Vol.I. p.100.

की, " ब्रिटिश राज्यापूर्वी हिंदुस्थानात औद्योगिक प्रगतीस अवश्य अशी जी खाजगी मालकी तिचा पत्ता नव्हता. जमीनदारी व रयतवारी या खाजगी मालकीच्या संस्था ब्रिटिशानीं सुरू केल्या." पण हा मजकूर लिहिण्याच्या आधींच्याच महिन्यात एंजल्सला जे त्यानें पत्र पाठविलें त्यात तो कबूल करतो कीं, "खाजगी मालकीचा प्रश्न हा एकंदरींत गुंता-गुंतीचा दिसतो कारण त्या विषयावर लिहिणाऱ्या ग्रंथकारात मेळ नाहीं!" अशी शंका होती तर रास्त मार्ग म्हणजे समाईक मालकीच्या प्रश्नावर ठाम मत देण्याचे टाळणे हा नव्हे काय ?

दुसऱ्या मुद्याविषयीं पाहता असे दिसते कीं हिंदुस्थानातल्या शहराचा मार्क्सने विचार केलेला नसावा. खेड्यातल्या गरजा थोड्या असत व व्याप-व्यवहार, उद्योग क्षुद्र असत हे खरे. पण शहराची स्थिति तशी नव्हती. का हिंदुस्थानात फक्त खेडींच होतीं असा मार्क्सचा समज होता ? शहरातील उद्योगधदे त्या त्या काळच्या मानानें समृद्ध होते. उद्योगधंदे अगदींच खुरटे असते तर इंग्लंडच्या पेठेंत हिंदुस्थानचे रेशमी व सुती कापड का जातें ? तें येवढ्या प्रमाणावर जात होतें कीं १८१३ सालीं इंग्लंडला त्यावर ८० व ७० टक्के जकात बसविणें आवश्यक वाटलें. वस्तुतः खंडतुल्य अशा भरतखंडाला बहुंशीं व्यापून टाकतील येवढीं मोठमोठीं साम्राज्यें जेथे नादलीं तेथें त्या साम्राज्याच्या विविध गरजा भागविणारा उद्योगधंदा मोठ्या प्रमाणावर असलाच पाहिजे. 'भारतीयाची ऐश्वर्योपासना' या सातव्या प्रकरणात याविषयीं माहिती दिलेली आहे ती वाचकाच्या लक्षात असेलच. अलीकडील शास्त्रीय शोधानंतरचे व वाफ-विद्युत्कारखानदारीनंतरचे विराट्स्वरूपी उद्योगधंदे मात्र नव्हते. पण तसें ते पूर्वी युरोपातही नव्हते. तथापि कालांतरानें का होईना, युरोपात शास्त्रीय शोध लागले तसे हिंदुस्थानात लागले नाहींत तें का हें कूट आहे. मात्र हिंदुस्थानात त्यापूर्वी खाजगी मालकी माहीत नव्हती किंवा उद्योगधंदे उदयास आले नव्हते व त्यामुळें शास्त्रीय शोधाची भूमिका तयार नव्हती असा पक्ष मांडता येणार नाहीं हें उघड होय.

व्यापारवृद्धि न होण्यास दळणवळणाच्या साधनाचा अभाव हें एक मार्क्सनें तिसरें कारण म्हणून दिलें आहे. त्यातहि फारसें तथ्य नाहीं.

हल्लींच्यासारखीं आगगाडी, आगबोटी, मोटारी हीं साधनें पूर्वी कोठेंच नव्हतीं. खडी टाकून केलेले पक्के रस्ते हे देखील इंग्लंडात १८०२ नंतर बाधले गेले. त्यापूर्वी मालाची ने-आण जनावराच्या पाठीवरूनच होई. पण हिंदुस्थानात ती ने-आण फार मोठ्या प्रमाणावर चाले. ती करणारे लमाण असत, त्याचे हजारो बैलाचे ताडे असत व त्याचा संचार सर्व देशभर असे. मार्क्स 'ट्रिब्यून'मधल्या लेखात लिहितो कीं, दळणवळणाच्या साधनाभावी हिंदुस्थानची उत्पादनशक्ति पागळी झाली आहे व त्यामुळें निसर्ग सढळ हातानें देत असताही लोकात दैन्य नादावें हा प्रकार हिंदुस्थानातल्याइतका इतर क्वचितच आढळतो. याचा पुरावा देताना तो लिहितो कीं, "१८४८ मध्यें नेमलेल्या एका कमिटीपुढे असा पुरावा माडण्यात आला कीं या सालीं खानदेशात धान्याची धारण एका क्वार्टरला (१४ शेर) ६ ते ८ शिलिंग होती तर त्याच वेळीं पुण्यात ती ६४ ते ७७ होती." हा पुरावा खरा असला तरी तो सर्वसाधारणरीत्या दळणवळणाच्या साधनाचा अभावदर्शक मानणें चुकीचें होईल. पावसाळ्यात पूर आला असता, रस्ते वाहून गेले असताना, अति चिखल झाला असता दळणवळणाचीं संकटें मधून मधून थोडे दिवस उद्भवतात. ती नित्याची स्थिति नव्हे. दिग्विजयाकरिता, व्यापाराकरिता, विद्यार्जनाकरिता, यात्रेकरिता लोक सर्वत्र हिंडत. त्याचा संचार एरवीं कसा होऊं शकता ? सामान्य लोक काशीपासून रामेश्वरापर्यंत यात्रा करीत. त्या यात्रेचे टप्पेहि ठरलेले सर्वांच्या परिचयाचे असत. पेशवेकालीं काशीपासून पुण्यास हरकारा पाठविला तर तो सुमारें वीस बावीस दिवसात एवढा प्रवास आटपी. मुसलमानी अमदानींत रस्ते होते येवढेंच नव्हे तर त्यावर वाट फुटण्याच्या ठिकाणीं इशारा देणारे दगडही रोवलेले असत. असला एक १५९९ मधला पाच फूट लाब, तीन फूट रुंदीचा मार्गदर्शक शिलाफलक वऱ्हाडातील कळंब गावीं सापडलेला नागपूर म्युझियममध्यें ठेवलेला आहे.[1] चिनी प्रवासी पाचव्या सातव्या शतकांत आले त्यांच्याही प्रवासवृत्तात रस्ते नसण्याची तक्रार नाहीं. युवानच्यागनें तर सबंध भरतखंड पालथें घातलें तरीही दळणवळणाच्या

---

१. या मा. काळे. भा. इ. सं. त्रैमासिक वर्ष ५.

साधनाबद्दल त्यानें तक्रार केलेली नाहीं. शिलालेखांत राजपथ व सार्थवाह यांचे उल्लेख येतात. रावबहादूर का. ना. दीक्षित याना बंगालमध्यें धनोरा गावाजवळ दोन्ही बाजूंनीं बांधून काढलेल्या जुन्या रस्त्याचे अवशेष सापडले आहेत.[१] भरहुत येथील स्तूपावर नाशिकच्या श्रीमंताच्या देणग्याचा उल्लेख आहे हें सांगून सर भांडारकर दक्षिणच्या प्राचीन इतिहासात लिहितात कीं, "प्रांतोप्रांतींचे दळणवळण फारसें अवघड असलेलें दिसत नाहीं."[२] बुद्धाच्या कालापर्यंत पाठीमागें गेले तरीही वेगळी स्थिति आढळत नाहीं. त्या वेळींही राजगृह व पाटलीपुत्र येथून उत्तरेस तक्षशिला व पश्चिमेस उज्जैनी व भडोच येथपर्यंत शेकडों मैलाचे रस्ते होते असा उल्लेख आढळतो. पाटलीपुत्राहून बनारस, कोसाम्बी, भारुत, बेसनगर, उज्जैन येथपर्यंत रस्ता येऊन पुढे एक फाटा सिंधुमुखाकडे जाई व दुसरा भडोचकडे निघे. व्यापारी इतके धनाढ्य होते कीं एका अनाथपिंडक नावाच्या नवकोट नारायणाने एक रस्ता स्वतःच्या खर्चानें बांधला होता. देशातल्या देशात तर ने-आण सुरू होतीच पण समुद्र ओलांडून आजूबाजूंच्या द्वीपांतरींही व्यापार सुरू होता. हा इतिहास आता सुशिक्षिताच्या परिचयाचा झाला आहे. अर्थात् दळणवळणाच्या अभावीं हिंदुस्थान मागासला ही उपपत्ति रास्त नव्हे.

तात्पर्य, जमिनीची समाईक मालकी, खेड्यातील अल्प गरजा भागविण्यापुरते उद्योगधंद्याचे आकुंचित क्षेत्र, व दळणवळणाच्या साधनाचा अभाव हीं जीं कारणे मार्क्सनें दिलीं आहेत त्याना ऐतिहासिक आधार दिसत नाहीं.

## इतिहासमीमांसक बकल

मार्क्सच्या कालीं इंग्लंडमध्यें एक प्रख्यात इतिहासमीमांसक होऊन गेला तो म्हणजे बकल हा होय. ह्याचें मार्क्ससारखें इतिहासमीमांसेच्या क्षेत्रांत स्वतंत्र दर्शन आहे. त्याच्या दर्शनाचें सूत्र हें कीं, कोणत्याही राष्ट्राचें भवितव्य हें त्या राष्ट्राच्या मानवी कर्तबगारी व भौगोलिक परि-

१. History of Bengal Vol. I. p. 660. ed. by R. C. Majumdar.
२. History of the Deccan 3rd ed. p. 76.

स्थिति यांनीं व मूलतः भौगोलिक परिस्थितीनें ठरून जात असतें. राष्ट्राचा ललाटलेख लिहिणारी भवितव्यता दुसरी कोणी नसून भौगोलिक परिस्थिति ही होय ! अशाच प्रकारची उपपत्ति चौदाव्या शतकातील आरबी इतिहासमीमासक इब्न खाल्दून यानें माडली होती. बकलनें तिचा प्रपंच सागोपाग थाटला आहे. या सूत्राचें उदाहरण म्हणून ग्रीस व हिंदुस्थान याची त्यानें तुलना केली आहे. ग्रीस व हिंदुस्थान या दोन प्रदेशातील लोकाची मनोवृत्ति भिन्न घाटाची का झाली याचें कारण बकलच्या मतें या दोन प्रदेशातील नद्या, पर्वत, जंगलें, खाद्य पदार्थांची सुबत्ता व हवामान यातच साठविलेलें आहे. आपल्या ग्रंथाच्या[1] दुसऱ्या प्रकरणाच्या प्रारंभींच तो लिहितो कीं, राष्ट्राच्या एकंदर भवितव्यावर सृष्टींतील ज्या चार गोष्टींचा परिणाम होतो त्या म्हणजे हवामान, अन्न, जमीन आणि नद्या, पर्वत जगलें या रूपाने प्रकट होणारें सृष्टीचे स्वरूप. हें सृष्टीचें स्वरूप उग्र भयानक असेल तर त्या देशात राहणाराची कल्पनाशक्ति तरल होईल व विचारशक्ति पागुळेल. उलट, सृष्टीचे स्वरूप सौम्य असेल तर कल्पनाशक्ति स्वैर न होता विचारशक्तीची वाढ होईल. कल्पनाशक्ति मोकाट सुटल्यानें अदृष्ट व अद्‌भुत याचे आकर्षण वाढतें व पौरुषप्रयत्नावरील विश्वास कमकुवत होतो. असाच प्रकार हिंदुस्थानात घडला असें बकलनें प्रतिपादन केले आहे. .

या संदर्भात युरोप व अशिया याची तुलना करताना तो लिहितो कीं, युरोप व आशिया यातील सृष्टीचे स्वरूप पाहिलें तर युरोपात सृष्टीचे देखावे सौम्य व मध्यम आकाराचे तर आशियातील देखावे उग्र, अजस्त्र, विराट् होत. ग्रीस आणि हिंदुस्थान याच्या क्षेत्रफळाची तुलना केली तर ग्रीस हा हिंदुस्थानच्या चाळिसाव्या हिश्शाइतका लहान भरेल. ग्रीसमधला उंचातला उंच पर्वत हा हिमालयाच्या तिसऱ्या हिश्श्याइतकाही उंच येणार नाहीं. तसेंच, हिंदुस्थानाच्या मानानें ग्रीसमध्ये वादळें कमी, भूकंप कमी, हिंस्त्र पशू कमी, आणि पर्वतावरून पाण्याचे प्रचंड लोट घेऊन वाहणाऱ्या नद्याही कमी. या निसर्गाच्या स्वरूपातील भेदामुळेंच ग्रीक

१. History of Civilisation in England by T. H. Buckle.

आणि हिंदु याच्या स्वभावात भेद उत्पन्न झाला. ग्रीकाच्यात विचार-स्वातंत्र्याची वाढ झाली तर हिंदुस्थानात अंधश्रद्धेचे पीक फोफावलें. हवा-मानाचा परिणाम खाद्यपदार्थांवरही होतो. हिंदुस्थानातील हवामान उष्ण असल्याने थोडक्या अन्नाने पुष्कळ श्रम करण्याची ताकद उत्पन्न होईल असें अन्न सेवन करण्याकडे प्रवृत्ति होते. हिंदुस्थानातले असे अन्न म्हणजे तादूळ हें होय. शिवाय जमीन शेतीला अनुकूल अशी असल्यानें या तादुळाचे पीक उमाप येतें. अन्न अल्पश्रमात मिळूं लागल्याचा अंतिम परिणाम असा होतो कीं, मजुरीचे दर निकृष्ट होतात, श्रीमंत व गरीब यामधील अंतर कमालीचें वाढते व निकृष्ट वर्गाला वर मान करावयास उसतच सापडत नाहीं. मजुरीच्या दराची योग्य कल्पना येण्याचे एक साधन म्हणजे व्याजाचा दर हे होय. व्याजाचा दर जितका चढा तितका मजुरी-चा दर हलका असे धरून चालण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानात प्राचीन काळीं मनुस्मृतीवरून पाहता व्याजाचा दर पंधरा टक्के पासून साठ टक्केपर्यंत होता असें दिसते. याचा अर्थ मजुरीचे दर फार फार हलाखीचे असले पाहिजेत. ते तसे असल्याशिवाय इतके जबर व्याज देऊन पैसे उसने घेण्याची जरूरी भासती ना. पण मजुरी हलकी असली तर कर्ज फिटायचें कसे ? कर्ज फिटत नसे म्हणूनच शेतकरी-कामकरी कर्जात नेहमीं बुडलेला असावयाचा. तात्पर्य, बकलच्या मते अन्न सढळ हाताने देण्याच्या सृष्टि-मातेच्या औदार्याचाच अंतिम परिणाम म्हणजे दलित वर्गाची पिळवणूक परमावधीस गेली हा होय !

मार्क्सचा मित्र एंजल्स यानेही हिंदी संस्कृतीच्या खुरटलेल्या अवस्थेला येथील हवापाण्यालाच जबाबदार धरले आहे. मार्क्सच्या मतें जमिनीची खाजगी मालकी हीच हिंदुस्थानात स्थापन होऊ शकली नाहीं. तें मत गैरसमजुतीवर आधारलेलें आहे हें आपण वर पाहिलेंच. मार्क्सचा मित्र एंजल्स याचाही असाच गैरसमज होता. त्याच्याही मतें जमिनीची खाजगी मालकी व तिच्यातून विकास पावणारी सरंजामी या संस्कृती-च्या विकासांतील एकापुढच्या एक अवस्था हिंदुस्थानात विकसित झाल्या नाहींत. मार्क्स याचें कारण देत नाहीं, पण एंजल्स देतो. याचें कारण त्याच्या मतें हिंदुस्थानची भौगोलिक स्थिति हेंच होय.

या भौगोलिक स्थितीविषयींचे त्याचें वर्णन मात्र बकलच्या पेक्षा अगदीं भिन्न आहे. मार्क्सला लिहिलेल्या पत्रात (६ जून १८५३) तो लिहितो. "खाजगी मालकी हिंदुस्थानात कां स्थापन झाली नसावी याचा विचार करता मला वाटतें कीं त्याचें कारण हवामान आणि शेतजमीन यातच दिसून येतें. तेथील जमीन म्हणजे मुख्यतः वैराण, उजाड माळरान होय. असल्या उजाड मरुभूमीचा एक मोठाच्या मोठा पट्टा इजिप्तमधील सहारा, अरबस्थान, इराण, हिंदुस्थान व तार्तरी या देशातून गेलेला दिसतो. यामुळें येथील शेती ही मुद्दाम साठाविलेल्या जलाशलावर, पाणी बंधाऱ्यावर अवलंबून असे; व असलीं मोठीं कामें हीं खाजगी मालकीचीं नसून सबध जमीन प्रातिक सरकार वा मध्यवर्ती सरकार याच्याच ताब्यात असत." तात्पर्य, जमीन निकस आणि पर्जन्य अल्प या सृष्टिप्रकोपामुळें खाजगी मालकी उत्पन्न होऊं शकली नाहीं, व संस्कृतीची वाढ खुंटली. बकलच्या मते सृष्टीच्या औदार्यामुळें वाढ खुंटली तर एंजल्सच्या मतें तिच्या कृपणपणामुळें संस्कृतीची वाढ खुटली! हीं परस्परविरोधी विधानें माडलीं गेलीं याचे कारण दोघाचीही माहिती अपुरी होती हें होय. सहारापासून तार्तरीपर्यंतच्या मरुभूमीच्या ज्या दीर्घ पट्ट्याचा उल्लेख एंजल्सने केला आहे तो पट्टा हिंदुस्थानातील मारवाड, कच्छचें रण व रजपुताना या भागातून जातो हें खोटें नाहीं. पण अखिल भरत-खंडाचा विचार करता हा पट्टा म्हणजे भरतखंडाचा एक अल्पसा भाग होय. बाकीचा निरनिराळ्या नद्यांच्या खोऱ्यातील भाग हा ओसाड मुळींच नव्हे. दुष्काळी भाग म्हणून जे प्रसिद्ध आहेत त्या भागातहि पीक येतें तेव्हा असें येतें कीं तें तीन वर्षें पुरावें. अर्थात् खाजगी मालमत्ता उत्पन्न न होण्यास एंजल्सने दिलेलीं हवामान व जमिनीचा निकसपणा हीं कारणें काल्पनिक होत हें सागावयास नकोच. खाजगी मालकी उत्पन्न झाली नव्हती हें मतच मुळात निराधार होय हें वर आलेंच आहे. यामुळें याविषयीं अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

बकलच्या मतें भरतखंडातील सृष्टीच्या विराट् स्वरूपामुळें अंधश्रद्धेची प्रवृत्ति बळावली व पौरुषप्रयत्नावरील विश्वास शिथिल झाला, याही विधानाचा पाठपुरावा इतिहास करीत नाहीं. खरा प्रकार असा असता

तर प्राचीन कालाकडे जों जों अधिक जावें तो तों पौरुषप्रयत्नावरच्या अविश्वासाचा आविष्कार अधिक उठावानें आढळावा. तसा तो आढळत नाहीं. वैदिक काळीं सृष्टीच्या सुंदर, भव्य व भयानक अशा विविध रूपाची भारतीयांनीं दैवतें मानून पूजा, प्रार्थना केली पण त्या काळातील व तेथून पुढें अनेक शतकातील त्यांची वृत्ति ही गागरून भिऊन दडपून गेलेल्याची मुळींच दिसत नसून उलट 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' असल्या धाडसी जोमाची दिसून येते. त्यानीं अनार्योशीं सामना दिला, जंगले तोडून काढलीं, वसाहती केल्या, आणि समुद्रावरील मुशाफरींतही प्रावीण्य संपादन केले. विंध्य पर्वत उच्च ताठ मान करून उभा होता त्याला मान मोडून लवविण्याचा पराक्रम अगस्त्य मुनीनीं फार प्राचीन काळीं गाजविला. त्यानंतर दाशरथी रामचद्रानें सिलोनपर्यंत झेंडा मिरविला. पुढील काळात ग्रीक, शक, हूण वगैरेंना पिटाळून लावणारे सम्राट् निघाले. तात्पर्य, पौरुषप्रयत्न ढिला पडलेला या प्राचीन काळात दिसून येत नाहीं. वस्तुतः पाहता या विषयाचा इतका प्रपंच करण्याचेंहि कारण नाहीं. पण गैरमाहितीवर उभारलेल्या मतातील अवास्तवपणा दाखविण्याकरितांच वरीलसारख्या सामान्य घटनाचा उल्लेख करावा लागतो आहे. त्यावरून आपल्या देशातील भव्य-भयानक निसर्ग व सुपीक जमीन यामुळें विवेकशक्ति दडपली गेली ह्या बकलच्या मताने भारतीय संस्कृतीच्या स्थिरावस्थेचा उलगडा होत नाहीं हें दिसून येईल. भौगोलिक परिस्थितीचा परिणाम व्हावयाचा तो प्राचीन काळीं अधिक तीव्र स्वरूपाचा व सृष्टीवर जसजसें स्वामित्व प्रस्थापित होत जाईल तसतसा उत्तरोत्तर तो सौम्य होत गेलेला आढळावा. पण आपल्या इतिहासांत पहावें. तों प्राचीन काळीं पौरुषवृत्तीचा आविष्कार जोमाने आढळत असून उत्तरकालीं त्याचा जोर कमी झालेला दिसतो. शास्त्र-कला-विद्यांमध्यें प्राचीनकालीं आत्मविश्वासाचें आणि विचारस्वातंत्र्याचें तेज धगधगलेले आढळतें व उत्तरकालीं मंद झालेलें आढळतें. त्याचा उलगडा केवळ भौगोलिक कारणांनीं समाधानकारक होत नाहीं.

## जातस्य हि ध्रुवो मृत्युः

आर्यांच्या हिंदुस्थानातील आगमनानंतर काहीं शतकें त्यांच्या संस्कृतीचा प्रसार आणि विकास जोमानें चाललेला आढळावा व उत्तरोत्तर त्याचा जोर दुर्बल होत जावा यावरून आणखी एक उपपत्ति सहज सुचण्यासारखी आहे. ती अशी कीं उन्नतीमागून अवनति हा निसर्गस्वभावच असावा. उत्तरोत्तर दुर्बलत्वाचे कारण अटळ, अपरिहार्य असून मानवी संस्कृतीच्या मूलघटकातच ते अन्तर्भूत असावें. याला दाखला प्राण्याच्या आयुर्मर्यादेचा. कोणताहि प्राणी वा वनस्पति घेतली तरी तिची आयुर्मर्यादा ही त्यातील मूलभूत बीजशक्तीनेंच नियमित झालेली असते. वृक्ष हा काहीं काल फोफाट्याने वाढावा, फलाफुलानीं डंवरावा, काहीं काल शाखाविस्ताराच्या वैभवानें डुलावा, पण कालांतरानें हळूहळू वठूं लागण्याच्या प्रारब्धातून त्याची सुटका नसावी असा नियतीचा दंडक दिसतो. चराचराला व्यापून टाकणारा व सृष्टीच्या मूलभूत घटनेतच अन्तर्भूत असलेला असा हा नियम असावा. 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' ज्याला ज्याला उत्पत्ति आहे त्याला त्याला मरण हे अटळ आहे. बाल्य, तारुण्य, वार्धक्य, मरण या अवस्थातून कोणाचीहि सुटका नाहीं. यमराजाच्या धर्मसभेतील हा सर्वंकष विधिनियम होय. प्राणिकोटीच्या बाबतींत ह्या सर्वंकष नियमाचा आढळ सर्वत्र आढळतो. तारुण्यातील उन्मादाचा आस्वाद चाखल्यानंतर वार्धक्याच्या कषायाचे घुटके चुकविता येत नाहींत. व्यक्तीप्रमाणें एकेका कुटुंबाचा इतिहास पाहिला तरीहि हाच प्रत्यय येतो. कुटुंब दोनतीन पिढ्या भरभराटलेलें दिसावें व नंतर उतरती लागून पुढें दोनतीन पिढयात नामशेषहि व्हावे असे अनेक उदाहरणात आढळून येतें. राजघराण्याचे इतिहास पाहिले तर असेंच आढळून येतें कीं संस्थापकाने मोठ्या धडाडीनें व कल्पकतेने राज्य कमवावें, पुढें एकदोन पिढयानीं मूळ संस्थापकाच्या पावलावर पाऊल टाकून त्याचा विस्तार करावा, त्यानंतरच्या पिढ्यानीं वैभवाच्या ऐषआरामात धुंद व्हावें व नंतर र्‍हास व अंत व्हावा. प्राचीन काळचीं मौर्य, शातवाहन, गुप्त, वाकाटक, राष्ट्रकूट, चालुक्य, वर्धन वगैरे रियासती किंवा अर्वाचीन कालांतील मोगल, मराठे, वगैरे रियासती पाहिल्या तरी प्रत्येक

रियासत काहीं पिढयानंतर मोडकळीस येते असें दिसून येतें. यावरून सर्व मानवी संस्थाच्या मूलभूत घटकावयवातच असें काहीं असावें कीं त्यामुळें त्या संस्थाचें बाल्य, तारुण्य, वार्धक्य हीं सर्व अन्तर्गत नियतीनेंच कालबद्ध असावींत अशी कल्पना साहजीकच सुचते.

आणि जें व्यक्तीला वा कुलाला लागू तेच अनेक कुलाचा समूह जो समाज त्यालाही का लागू नसावें? अविच्छिन्न सास्कृतिक परंपरा चालविणारा जो लोकसंघ तो समाज व ती परंपरा तुटली म्हणजे तो समाज नाश पावला असें मानले तर प्राचीन काळचे इराकमधील खाल्डियन, क्रीटमधील मिनोयन, मॅक्सिकोंतील मय असे समाज व त्याच्या संस्कृति कालाच्या उदरात गडप झालेल्या आढळतात. यावरून प्रत्येक संस्कृतीच्या नशिबीं असाच अंत लिहिला असला पाहिजे असें अनुमान का माडूं नये? स्पेंग्लर नावाच्या जर्मन ग्रंथकारानें ते ठसठशीतपणें माडलें असून पाश्चात्य संस्कृति ही आतां वार्धक्याच्या घरात गेली आहे असें त्यानें प्रतिपादिलें आहे. त्याच्या मतें शास्त्र, विद्या, कला, राजकारण, समाजकारण यात खोल, अन्तर्भेदी वैयक्तिक प्रतिभेच्या आविष्कारापेक्षा उथळ विस्ताराकडे समाज वळूं लागला कीं त्याचा ऱ्हासकाल सुरू झाला असे समजावें. आणि हें परिवर्तन अटळ अशा नियतीनेंच येत असतें; तें टाळता येत नाहीं; त्याचें स्वरूप ओळखून युगधर्म जाणून घेऊनच प्राप्त परिस्थितीला तोंड देत राहणें येवढेंच मानवाच्या हातीं आहे[१] असें त्यानें प्रतिपादन केलें आहे. पाश्चात्य संस्कृतीच्या वार्धक्याचें लक्षण म्हणून स्पेंग्लर सागतो कीं, कोणत्याहि ललितकलेंत पाश्चात्याची प्रतिमा आतां नवीन कांहीं श्रेष्ठ व भव्य अशी कृति निर्माण करूं शकणार नाहीं. चित्रकला व संगीतकला याच्या क्षेत्रात कांहीं भर टाकणें आता त्यांना शक्य नाहीं. आणि वास्तुकलेंतील त्याची कामगिरी तर तीनशें वर्षांपूर्वीच संपून

१. 'A century of purely extensive effectiveness is a time of decline. True. But we cannot help it.'—Decline of the West. Vol. I. p. 44. by Splenger, tr. by Atkinson.

गेली आहे.[१] त्याच्या मते तरल प्रतिभेचे युग संपून चिकित्सक प्रज्ञेचें युग सुरू होणे हे ऱ्हासाचें लक्षण होय व ते आता पाश्चात्यात दिसूं लागलें आहे असें त्याचे प्रतिपादन आहे. वरीलसारख्या प्रतिपादनानें जीवनातील उत्साह, आशावाद हीं करपून जाणार नाहींत काय असे कोणी विचारील तर त्याला स्पेंग्लर उत्तर देतो कीं, सुदृढ आणि निकोप मनाच्या प्रकृतीवर वाईट परिणाम होणार नाहीं. अमुक घटना अटळ आहे हें बुद्धीला पटलें म्हणजे ते कितीहि अप्रिय असले तरी सरळपणें मान्य करणें हेंच निकोप बुद्धीचे लक्षण. म्हणून आजचा काल हा पाश्चात्य संस्कृतीचा वार्धक्याचा काल होय हे ओळखून या कालातच साध्य होणाऱ्या गोष्टींचीच उपासना करणे रास्त. उदाहरणार्थ, काव्याचा त्याग करून यांत्रिक सुधारणेची जोपासना करणें हे आजच्या युगधर्मास अनुसरून होय.[२]

## युग-ऱ्हास

आपल्या धर्मशास्त्रकाराच्या युगऱ्हासाच्या कल्पनेशीं जुळती अशी ही स्पेंग्लरची कल्पना आहे. या कल्पनेप्रमाणे ऱ्हास हा नियतीचा सर्वंकष नियम होय. दिवसाच्या पाठोपाठ रात्र यावी तशी विकासाच्या पाठोपाठ अवनति यावी हे सृष्टीचें अनुल्लंघनीय सूत्र होय. तेव्हा हिंदु संस्कृतीनें दोन तीन हजार वर्षें वैभवानें मिरविल्यावर तिची पडती कमान सुरू व्हावी हे नियतीच्या नियमानेच प्राप्त होणारे प्रारब्ध आहे. इंग्रज इतिहासमीमांसक टॉनबी यानेहि नियतिसिद्ध ऱ्हासाची उपपत्ति चक्रनेमिक्रमाच्या रूपानें मान्य केली आहे. त्याच्या मते हा पडता काल सुरू होण्याचें पूर्वचिन्ह म्हणजे राज्यविस्तार आणि संस्कृतिविस्तार हे होय. या विस्ताराबरोबर संघटना दुर्बल होते आणि ऱ्हासास प्रारंभ होतो. रोमन राज्य प्रमाणाबाहेर विस्तारलें तेव्हाच त्याच्या नाशाची बीजें रोवलीं गेलीं व अशोकानें साम्राज्य व धर्म यांच्या विस्ताराची रूपरेखा आखली तेव्हाच त्यानें पुढील नाशाची मुहूर्तमेढ रोवली असें टॉनबीचें प्रतिपादन आहे. युरोपियनांचें साम्राज्य

---

१. Decline of the West p. 40.

२. „ p. 41.

हेंही असेंच आज अफाट पसरलेलें आहे. तेव्हा त्याचें काय व्हावयाचें? विस्ताराच्या पोटीं ऱ्हास हा नियम सार्वत्रिक असेल तर युरोपियन संस्कृतीचा ऱ्हास हा अटळ आहे असें मानल्यावाचून गत्यंतर नाहीं. स्पेंग्लर तसें निर्वेधपणें मानतो. टॉनबी मात्र या अशुभ भविष्यानें गडबडून गेलेला आहे. म्हणून त्यातून पळवाट काढण्याकरितां लिहितो कीं, 'जिवंत विद्यमान संस्कृतीचें भविष्य स्पष्टपणें वर्तवितां येत नाहीं.' पण तें भविष्य भयानक असूं शकेल याची पोटात भीति असल्यानें शेवटीं तो लिहितो कीं, पुढचें भविष्य स्पष्ट दिसत नसल्यानें तें अशुभ न ठरो म्हणून अनुतापपूर्वक प्रभूची प्रार्थना करूं या.[1]

टॉनबी गडबडला आहे याचें कारण येवढेंच कीं पाश्चात्यांचें साम्राज्य आज जगावर पसरलें आहे तें यापुढें तसेंच चालणार नाहीं या भीतीचा गोळा पोटात उठला आहे म्हणून. ज्या परक्या देशाचें स्वातंत्र्य पाश्चात्यांनीं हरण केलें ते देश जागृत होत आहेत, सुसंघटित होत आहेत, सुविद्य होत आहेत; तेव्हा आज नाहीं उद्या ते पाश्चात्यांचें साम्राज्यशाही जूं झुगारून दिल्याविना राहणार नाहींत हे सुस्पष्ट दिसत आहे. पण यांत गांगरून गडबडून जाण्यासारखे कांहींच नाहीं. खरी गोष्ट अशी कीं साम्राज्याचा नाश म्हणजे संस्कृतीचा नाश ही टॉनबीची कल्पनाच कोती होय. दुसऱ्या राष्ट्राचे स्वातंत्र्य हरण करण्याची व त्याना नागवून आपलें घर भरण्याची कल्पना ही मानवी संस्कृतींतील एक रोगट कल्पना होय. साम्राज्यशाही नष्ट झाली तर हा रोग नाहींसा होईल पण त्यामुळें संस्कृति नष्ट न होता उलट अधिक निकोप होईल. आता टॉनबी याला अशी भीति वाटत असेल कीं पाश्चात्यांचें नुसतें साम्राज्य नष्ट होऊनच न भागता पौर्वात्याचा वरचष्मा होऊन पौर्वात्याची गुलामगिरी पत्करण्याचा प्रसंग आपणावर येईल तर ती भीति रास्त होय. कारण राजकीय स्वातंत्र्य हें सांस्कृतिक जीवनाचें संरक्षक कवच होय. हें कवच भंगलें म्हणजे

१. 'The destiny of a live civilisation is necessarily obscure... We must pray and ask favour in contrit spirit.'—Study of History Vol. VI. p.320-321 by Toynbee.

सांस्कृतिक जीवनाचीं सर्वच अंगोपांगें विकल होऊन जातात. पण साम्राज्य प्रमाणाबाहेर वाढलें कीं ऱ्हासास प्रारंभ होतो हे खरे मानलें तरी शेवटीं सर्व सांस्कृतिक जीवनच धोक्यात येतें अशी अगदीं अपरिहार्य प्रणालि मांडणें आवश्यक दिसत नाहीं.

## ध्रुवं जन्म मृतस्य च

स्पेंग्लरच्या मताप्रमाणें ऱ्हास व मृत्यु पावणे ह्या नैसर्गिक अटळ अवस्था होत. तशा त्या असतील तर त्याचा व्यापार सर्वत्र अप्रतिहत दाखविता आला पाहिजे. स्पेंग्लरला तसा तो दाखविता आलेला नाहीं. सर्वत्र तसा तो आढळतही नाहीं. स्पेंग्लरने हिंदु संस्कृतीतील बौद्धिक ऋतुमानाच्या व परिवर्तनाच्या अवस्थाचे एक कोष्टक दिलें आहे. त्या अवस्था अशा कीं यातील वैदिक काल हा वसंतऋतु; ब्राह्मण व उपनिषदे यांचा काल हा बुद्धीच्या परिपाकाचा ग्रीष्मऋतु; सूत्रें, योग, वेदान्त यांचा काल हा शरदृऋतु व बौद्धमताच्या प्रसाराचा आणि षड्दर्शनाचा काल हा शिशिरऋतु होय. ही मांडणी अगदीं शिथिल स्वरूपाची आहे हें सांगावयास नकोच. विकास आणि ऱ्हास हे नियतीनेंच ठरत असतील तर त्याची कालमर्यादा निश्चित सांगता यावी. स्पेंग्लरच्या वरील कोष्टकाप्रमाणें पाहिलें तर भारतीय संस्कृतीच्या आयुमर्यादेचा काल चांगला दोन तीन हजार वर्षांचा येतो. ज्या देशाचा सुदीर्घकालीन इतिहास उपलब्ध आहे असा दुसरा देश म्हणजे इजिप्त होय. त्याच्या इतिहासात विकास आणि संकोच यांचें चक्रच दृष्टीस पडतें. या देशाच्या प्राचीन इतिहासाचे अभ्यासक फ्लिंडर्स पेट्री यांनीं असें दाखविलें आहे कीं इसवीशकपूर्व पांच सहा हजार वर्षांपासून ख्रिस्तीशकाच्या तेराव्या शतकापर्यंतच्या या देशाच्या इतिहासात संस्कृतीच्या संकोचविकासाचे साधारणपणें तेरातेराशें वर्षांचे असे आठ फेरे आढळून येतात. येथें आयुर्दाय अल्प दिसतो. पण या फेऱ्यावरून दुसरें अनुमान सुचतें तें अधिक महत्त्वाचें आहे. तें हें कीं हे फेरे लक्षांत घेतल्यास स्पेंग्लरप्रमाणें 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' येवढेंच म्हणून न थांबता 'ध्रुवं जन्म मृतस्य च' हेंही म्हटलें पाहिजे! समाजाच्या बाबतींत मृत्यु व पुनर्जन्म

या संज्ञा वापरण्यापेक्षा संकोच व विकास या संज्ञा अधिक रास्त होत. जेथें परंपरा अजीबात तुटेल तेथे मृत्यु म्हटला तर पुनःपुनः टवटवीत होणाऱ्या अवस्थेला संकोच-विकास ही संज्ञा अधिक सार्थ ठरेल. चीन व हिंदुस्थान यातील दीर्घकाल अविच्छिन्न परंपरा टिकविणाऱ्या संस्कृतीच्या संबंधीं मृत्यूची संज्ञा न वापरिता संकोच-विकासाची वापरणे न्याय्य होईल हें आता सागावयास नकोच.

या दृष्टीनें आपल्या संस्कृतीला संकोचावस्था का प्राप्त झाली याचा विचार कर्तव्य आहे— वृद्धावस्थेनंतर अपरिहार्य रीतीनें येणाऱ्या मृत्यूचा नव्हे ! तो विचार चालू असता विकासातील प्राथमिक अवस्था जी जमिनीची खाजगी मालकी तीच हिंदुस्थानाने ओलांडली नाहीं हें मार्क्सचें मत गैर माहितीचें कसें आहे हे आपण पाहिलें. तसेच हिंदुस्थानातील पर्वत, नद्या, जंगलें याच्या भव्य भयानक रूपानें हिंदूंची विचारशक्ति व आत्मप्रत्यय दडपून गेला या बकलच्या मताचाही इतिहास पाठपुरावा करीत नाहीं ह्याकडे लक्ष दिलें. एंजल्सच्या मताप्रमाणे हिंदुस्थानातील भूमि निकस म्हणून संस्कृति खुरटली तर बकलच्या मताप्रमाणें जमीन अतिसुपीक म्हणून संस्कृति खुरटली हीं मतें एकमेकाना काट देणारीं आहेत हेंही आपण पाहिलें. हिंदुभूमि ही मरुभूमीही नाहीं व अमर्याद पीक देणारी मयभूमीही नाहीं. व्याजाचा दर भारी त्या अर्थी मजुरी अल्प अथवा जीवनवेतन अल्प पुरत असलें पाहिजे व यामुळे फार मोठा समाज गुलामगिरीच्या अवस्थेंत डाबला गेला असला पाहिजे असें मानलें तर ज्या हवापाण्याची बकलनें तारीफ केली आहे त्या अथेन्समध्ये दोन लाख पसतीस हजार लोकसंस्थेंत एक लाख गुलाम होते याचा अर्थ काय करावयाचा ? रोममध्यें याहीपेक्षां प्रमाण मोठें होतें. शिवाय भव्य-भयानक निसर्गदेखाव्यानीं भारतीयाची बुद्धि गांगरली नाहीं तर ग्रीसच्या भूमीमध्यें शास्त्रकलाची वाढ झाली तशी हिंदुस्थानच्या भूमीमध्येंही झाली हें 'भारतीयाची ऐश्वर्योपासना' या प्रकरणात दाखविलेंच आहे. तेव्हां भूमि व हवापाणी याचा मानवी स्वभावावर होणाऱ्या परिणामाला अनुलक्षून संस्कृतीचा संकोच-विकासाचा नियम बसविता येतो असें दिसत नाहीं. बकल हा जमीन हवापाण्याला प्रमुख

स्थान देत असला तरी तोही मानवी कतबगारी हा एक घटक मानतोच व तो मानून निसर्ग आणि मानवी बुद्धि याच्या संघर्षातून संस्कृतीचा संकोच–विकास होत असतो असे प्रतिपादन करितो.[१] निसर्ग हा फारच कठोर असेल तर संस्कृतीच्या वाढीला मर्यादा बसेल हे खरें. अखंड बर्फाच्या प्रदेशात राहणारे एस्किमो संस्कृतीच्या विकासात काहीं मर्यादेच्या पलीकडे जाऊं शकले नाहींत. पण हिंदुस्थानचें हवापाणी पाहिलें तर तें संस्कृतीच्या विकासाला युरोपपेक्षा फारसे प्रतिकूल आहे असे मुळींच नाहीं. शिवाय पंधराव्या सोळाव्या शतकापर्यंत हिंदुस्थान युरोपच्या कोणत्याही प्रकारें मागे होता असेही नाहीं. सातव्या आठव्या शतकात तो विद्येच्या बाबतींत मुसलमानाच्याही मागे नव्हता. पण नवी विद्या हस्तगत करण्याचा नवोत्साह मुसलमानात नव्यानेच प्रादुर्भूत होत होता तर आम्ही आमच्या विद्येने कृतकृत्य होऊन शिथिलयत्न झालों होतो, व रणांगणावरील शिस्त आणि कडवेपणा व सामाजिक जीवनातील ऐक्याची भावना याही आमच्यात दुर्बल होऊं लागल्या होत्या हे आपण मागें पाहिलेंच.

## शास्त्राची वाढ

तेव्हा पुन्हा विचारात घेण्याचा मुख्य प्रश्न म्हणजे सोळाव्या सतराव्या शतकानंतर युरोपमध्यें शास्त्राची, उद्योगधंद्याची, लोकशाहीची जी वाढ झाली तशी आपणाकडे का झाली नसावी ? शास्त्रीय शोध हे गरज व कल्पकता याचें अपत्य होत. उदाहरणार्थ, अनेक उद्योगधंद्यांशीं संबद्ध असलेल्या रसायनादि शास्त्रांची वाढ ही त्या उद्योगधंद्याच्या विकासास रोकून धरणाऱ्या अडचणी व त्या अडचणींचा परिहार करणारी मानवी बुद्धिमत्ता याच्या झगड्यातून होत असते. या अडचणी काहीं वेळा फार जाचक होऊं लागतात. कोळशाच्या वगैरे खाणींच्या धंद्यात खाणींत सारखे साचत राहणारे पाणी बाहेर काढून टाकणें व खाणींतील वायु पेट घेणार नाहीं याविषयीं दक्षता घेणे जरूर असते. ही जरुरी दमट हवेच्या

[१]. All the changes of which history is full must be the fruit of a double action; an action of external phenomena upon the mind and another action of the mind upon the phenomena.–Ch.I.

इंग्लंडसारख्या देशात विशेष तीव्र स्वरूपात भासूं लागते. यामुळें पाणी उपसून काढणाऱ्या पंपाचा रचनाविशेष व निरनिराळ्या वायूंचे गुणधर्म यांचें संशोधन अगत्याचें होऊन बसतें. यामुळें या विषयाच्या संशोधनाकडे लक्ष लागणें स्वाभाविक होतें[१]. भूस्तरशास्त्राची वाढ ही खाणी, कालवे आणि रेल्वेचे बोगदे वगैरेच्या खोदकामातून झालेली आहे.[२] शिवाय नव्या शोधाचा उपयोग करून घेण्यास लागणारा आत्मप्रत्यय, धाडस, भांडवलाची उभारणी, माल खपणारी बाजारपेठ व जेथें न खपेल तेथें बळजबरीने लादण्याची सत्ता अशा अनेक गोष्टींची अनुकूलता असावी लागते. ती नसल्यास शोध लागूनही ते व्यवहारात उतरत नाहींत व शास्त्राची वाढ जोमानें होत नाहीं. या अनुकूलतेशिवाय आणखी ज्याचा उल्लेख केला पाहिजे तो म्हणजे श्रेष्ठ प्रतिभावान् त्या त्या शास्त्रास लाधणें हा होय. यासंबंधीं विचार करणारा एक ग्रंथकार लिहितो कीं, सतराव्या शतकात युरोपात शास्त्राना जो एकदम अपूर्व बहर आला तो विशेष अनुकूल परिस्थिति लाभली म्हणून होय. सामाजिक, राजकीय, औद्योगिक, परिस्थिति पोषक आणि थोडे पण श्रेष्ठ प्रतिभावान् शास्त्रज्ञ असा सर्व अनुकूल संच या काळीं लाभला होता.[३] पुढील शतकात ही अनुकूल परिस्थिति टिकली नाहीं, सरकारी आश्रय फारसा मिळाला नाहीं. सरकारचें लक्ष फक्त युद्धोपयोगी शास्त्राकडे तेवढे असे. व्यापाऱ्याच्या ज्या श्रेणी अथवा संघ होते त्यांची प्रवृत्ति आपली विद्या गुप्त ठेवण्याची असल्यानें नवनव्या शोधाना त्यांचा विरोधच होता. नव्या शोधाची कुलमक्तेदारी (पेटंट) घेऊन विकण्याची युक्ति अमलात नव्हती. या अनेक कारणामुळें अठराव्या शतकाच्या प्रथमार्धात शास्त्रीय ज्ञानाची विशेष वाढ झाली नाहीं. पण कोलंबस, वास्को ड गामा वगैरेंच्या धाडसी प्रयत्नानीं दर्यावरील मुशाफरीला जोर चढत आलेला होता, माल खपविण्याच्या नव्या

---

१. Science for the Citizens p 551 by L. Hogben.

२. Social Function of Science p 34 by Burnal.

३. 'The great scientific outburst depended on the favourable conjunction of social, political, economic factors and on the genius of men.' Burnal p. 24.

नव्या बाजारपेठा हस्तगत होत होत्या व भांडवल जमत होतें. एकोणिसाव्या शतकात वॅट्स, फॅरडे सारखे शास्त्रज्ञ, वाफेच्या व विद्युत्च्या यंत्राची युक्ति, कारखानदारीला लागणारें भांडवल, व आफ्रिका हिंदुस्थान वगैरे ठिकाणच्या हुकमी बाजारपेठा याचा संच जमताच उद्योगधंद्याना उधान भरती आली. यापुढें शास्त्रीय शोध हे धंद्याना अधिकाअधिक उपकारक होऊं लागून प्रयोगशाळाच्या उभारणीवर अधिकाधिक द्रव्य खर्चण्यात येऊं लागले. प्रयोगशाळेइतकेच त्या प्रयोगशाळेंत अनन्यभक्तीनें विद्येची उपासना करणारे शास्त्रज्ञ लाधले हे महत्त्वाचें होय. या शास्त्रज्ञाची शास्त्रभक्ति ही अव्यभिचारी होती, पैशाच्या लोभानें उद्भवलेली नव्हती. विद्युज्जननाच्या अद्भूत शोधानंतरही (१८३३) रॉयल इन्स्टिटट्यूटचा खर्च चालविणें फॅरडेला कठिणच जाई.[१]

इंग्लंडमधील शास्त्रीय ज्ञानाच्या वाढीची ही जी त्रोटक हकीगत दिली आहे तीवरून त्या वाढीला अनेक प्रकारची अनुकूलता कशी लागते ह्याचा बोध होईल. तो ध्यानीं घेऊन आपल्या इतिहासाला लावून काय अनुमानें सुचतात तीं पाहूं. इंग्लडातील खाणींचा उल्लेख वर केला तसेच हिंदुस्थानातही खाणींतून लोहसुवर्णादि खनिज द्रव्यें खणून काढून शुद्ध करण्याचा धंदा मोठ्या प्रमाणावर चाले हे मागे पाहिलें आहे. अशा पुष्कळशा अर्धवट सोडून दिलेल्या खाणी आज ठिकाठिकाणीं सापडतात. कांहीं काल खणल्यानंतर त्या सोडून का दिल्या ? तर त्यासंबंधीं असे दिसतें कीं, खाणी खणत खणत पाणी लागेपर्यंत खणावयाच्या व पाणी लागलें म्हणजे सोडून द्यावयाच्या व दुसरीकडे खणावयाचें. देशाचा विस्तार मोठा असल्यामुळें खोलवर खणलेल्या खाणी पाणी उपसून पुढे चालू ठेवण्याची निकड भासली नसावी. व त्यामुळें इंग्लंडमध्यें पपाचा व खाणींतील वायूच्या गुणधर्माचा जितका कसून शोध झाला तशा शोधाचें अगत्य भारतीयाना तीव्रतेनें भासलें नसावें या संबंधाचें संशोधन पुढें विकास पावलें नसावें. शिवाय मुशाफरी बंद झाल्यानें इतर देशात काय चालले आहे याचा कानोसा घेण्याचेंहि बंद पडलें असावें.

---

१. Burnal p. 28.

दर्यावरील धाडसी मुशाफरीची आवड पश्चिम युरोपांतील राष्ट्रांत पंध-राव्या सोळाव्या शतकात विशेष जोरानें उसळलेली दिसते. त्याला कारण चिमुकल्या भूप्रदेशामुळें व्यापाराचा व वाढत्या लोकसंख्येचा कोंडमारा आणि समुद्राच्या नित्य सानिध्यामुळें दर्यावरील धाडसी जीवनाची आवड व ओढ. उलट हिंदुस्थानचा भूप्रदेश हा खंडतुल्य, देशातल्या देशातच व्यापाराला उमाप क्षेत्र. यंत्रयुगापूर्वीच्या व्यापाराला हें क्षेत्र पुरून उरण्याइतकें विस्तीर्ण होते. हिंदुस्थानच्या बाहेर पाठविण्यासारखे जे रेशीम, केशर, मोती, असले मौल्यवान् जिन्नस ते बाहेर घेऊन जाण्यास देशो-देशींचे व्यापारी हिंदुस्थानच्या बंदरातच ठाण देऊन बसलेले असत. हिंदुस्थानातलें रेशीम ख्रिस्ती शकाच्या प्रारंभीं रोममध्यें सोन्याच्या भारंभार इतक्या उच्ची भावाने विकलें जात असे व त्यामुळे रोमच्या सोन्याला लागलेल्या गळतीबद्दल रोमन लोकसभेत गवगवाही झाला याचा उल्लेख मागें केला आहे. येथें हें सांगितलें पाहिजे कीं, हें रेशीम रोममध्ये नेणारीं जहाजें बहुधा रोमन व्यापाऱ्यांचीं असत. हिंदी व्यापारीही नौकानयनात प्रवीण होते. त्यानीं पूर्वद्वीपकल्पांत व्यापार, धर्मप्रसार, वसा-हती कशा थाटल्या हें आपण पाहिले. पण इस्लामच्या उदयानंतर दर्यावरील व्यापाराचे प्रभुत्व अरबी लोकांच्या हातीं गेले. यामुळें सातव्या आठव्या शतकानंतर देशादेशींच्या संचारामुळें येणाऱ्या चौकसपणास व जागरूकतेस हिंदु लोक मुकत चालले. दर्यावर्दीपणाला दुसरा वाव आरमारात मिळा-वयाचा पण राजसत्तेला आरमाराचीही विशेष जरुरी भासलेली दिसत नाहीं. पश्चिम किनाऱ्यावरील राजाना आरमारी युद्धाचा प्रसंग यावयाचा तो अरबाशीं. पण त्याच्याशीं सलोख्याचें धोरण असल्यानें राष्ट्रकूटाना आरमाराचें महत्त्व वाटले नसावें.[१] महंमद बिन कासीमची व जुनेदची सिंधवरील स्वारी सोडली तर इस्लामचें पुढील काळातील आक्रमण हें खुष्कीच्या मार्गानें झालें होतें, दर्याच्या नव्हे. त्यानंतर सोळाव्या शतकात वास्को-ड-गामानें कालिकत येथें उतरून हिंदूंची कत्तल केली तोंपर्यंत हिंदुस्थानचा बराच भाग इस्लामी सत्तेखालीं गेला होता. सोळाव्या शतकापासून युरोपियन व्यापाऱ्याचें आक्रमण सुरू झालें. ते आरमार व

१. Rashtrakutas by Dr. Altekar p. 257.

शस्त्रें यांनीं सज्ज होते. पण त्याचा मुख्य पेशा व्यापाऱ्यांचाच होता. त्याना आश्रय दिल्यानें कराच्या रूपानें खजिन्यात भर पडे व चैनीच्या हरहुन्नरी वस्तु मिळत. यामुळें या व्यापाऱ्याना सवलती देण्याचेच धोरण दिल्लीच्या बादशहाचें असे. या व्यापाऱ्याच्या मायदेशातील राजकीय सत्तेचें व विद्यासंपन्नतेचें स्वरूप कोणींच ओळखलें नव्हतें. तें आक्रमणाच्या रूपानें डोळयावर येण्याच्या स्वरूपात एकोणिसाव्या शतकापर्यंत परिणत झालेंच नव्हतें. पूर्वतयारी मात्र सुरू होती; ती लक्षात न येण्यास देशाच्या बाहेरचा संचार मंद झाला होता.

## देशविस्तार

या संचारमंदीचें एक कारण म्हणजे देशाचा विस्तार आणि सधनता हें होय! बकल या इतिहासमीमासकाचा तर्क कीं, हिंदुस्थानच्या विराट् सृष्टिस्वरूपानें हिंदूंची चिकित्सक वृत्ति पागुळली व सुपीकतेनें संपत्तीची विषम वाटणी झाली आणि त्याच्या सस्कृतीचा विकास रुद्ध झाला तो चपखल बसत नाहीं हे पाहिले. पण देशाच्या विस्ताराचा व सुपीकतेचा दुसरा एक स्वाभाविक परिणाम म्हणजे देशाबाहेरील संचाराची मंदी हा होय. मागें पहिल्या प्रकरणात मॅक्समुल्लरचे विधान उद्धृत केलें आहे कीं, शिकंदराच्या मोहिमेसारखी मोहीम एखाद्या हिंदुसाम्राटाला सुचली असेल याची कल्पना देखील करवत नाहीं (पृ. ९). त्यानें हें विधान केलें आहे ते हिंदु लोकाना राजकीय दृष्टि नव्हती हें दाखविण्याकरिता हेटाळणीच्या स्वरात केले आहे. पण विचारान्तीं असें दिसून येईल कीं, बाहेरच्या प्रदेशावर चालून जाऊन आक्रमण करण्यासारखा विलोभनीय प्रदेश हिंदुस्थानच्या पश्चिम सीमेच्या लगत बाहेर नव्हताच मुळीं. विलोभनीय प्रदेश होता तो पूर्वद्वीपकल्पाचा मसाल्याचा प्रदेश होय. त्या प्रदेशावर पूर्वकिनाऱ्यावरील राजानीं स्वारी केल्याचा उल्लेख 'विश्वसंचारा'च्या प्रकरणात आलाच आहे. हिंदुस्थानच्या बाकीच्या प्रदेशातील राजाचें लक्ष या पूर्वद्वीपाकडे विशेष गेलें नसले तर त्याचेंहि कारण हेंच कीं हिंदुस्थान हा देशच येवढा विस्तीर्ण आहे कीं तो जिंकण्यांतच कोणाही सम्राटाची सबंध उमर खर्ची पडावी. शिवाय देश समृद्ध.

तेव्हा तो सोडून बाहेरच्या कमी समृद्ध देशाकडे भारतीयाचें लक्ष जाईल कशाला ? पश्चिम सीमेपलीकडील बलुचिस्तान, अफगाणिस्तान हे देश हिंदुस्थानातच मोडत. त्याच्या पलीकडे सैस्तान व उत्तरेस मध्य आशियाचे निर्जल प्रदेश. हे दोन्ही प्रदेश विशेष समृद्ध असे कधींच नव्हते. आठव्या शतकानंतर तर ते रेताड रणच बनले. त्याच्या पूर्वी हा प्रदेश वसतीयोग्य व यूरोप-आशियाच्या दळणवळणाच्या हमरस्त्यावर असल्यानें व्यापारीदृष्ट्या महत्त्वाचा होता तेव्हा तेथें हिंदूंच्या वसाहती होत्या हें मागें पाहिलेंच आहे. त्यानंतर तो प्रदेश उजाड झाला. तिकडे जाण्यासारखें आकर्षण कांहीं राहिलें नाहीं. उलट मध्य एशियातील भटक्या टोळ्याना मात्र हिंदुस्थानचे आकर्षण अधिकाधिक वाटूं लागल्यास नवल नाहीं. म्हणजे हिंदुस्थानचा विस्तार आणि सुपीकता हीं हिंदु संस्कृतीच्या स्थिरावस्थेला कांहीं अंशीं कारणीभूत झालीं असे म्हणावें लागतें. सरस्वतीच्या तीरावरून पूर्वेकडे व दक्षिणेकडे वैदिक आर्य दिग्विजय करीत निघाले ते पूर्वेस ब्रह्मदेशापर्यंत व दक्षिणेस सिलोनपर्यंत सर्व देश आक्रमण करीपर्यंत कित्येक शतकें लोटलीं. नवीन प्रदेशाच्या आक्रमणाचे प्रभावी आकर्षण होते तोवर त्याचा उत्साह कित्येक शतकें जोमात राहिला. या उत्साहानें हिंदुस्थानचे बाहेर पूर्वद्वीपकल्पेंहि त्यांनीं व्यापून टाकलीं पण येथें विस्ताराची स्वाभाविक मर्यादा संपली. आधुनिक यंत्रयुगापूर्वीची प्रवासाचीं साधनें लक्षात घेता यापेक्षा विस्तार अशक्यच होता. किंबहुना झाला आहे हाच विस्तार झेपण्यासारखा नव्हता. खुद्द भरतखंडच सर्व एकछत्राखालीं आणणें अशक्यप्राय असल्याने शिकंदराप्रमाणें हिंदुस्थानच्या बाहेरील प्रांतावर दिग्विजयाची स्वारी काढण्याचा बेत कोणा हिंदुसम्राटानें केला नसल्यास त्याला बिलकूल नांवें ठेवता येणार नाहींत अफाट भरतखंडाची दौलत हीं येवढी मोठी होती कीं तेवढी टिकविण्यातच सर्व शौर्य आणि बुद्धिवैभव खर्ची पडावें. यामुळें भरतखंडाच्या बाहेरील जगात काय उलाढाली चालल्या आहेत याकडे लक्ष देण्याचें अगत्य वाटले नसावें.

## धर्मभावनेचें शैथिल्य

पण परक्या बुभुक्षिताच्या टोळधाडी वरच्यावर येऊं लागल्या तेव्हा

मात्र त्याचा यशस्वी प्रतिकार करण्यास उपयोगी पडणारी जूट आणि संघटना निर्माण करण्याचे अगत्य वाटावयास हवें होतें. एखादा प्रभावी सम्राट् निघे तेव्हा तो परकीयाना पिटाळून लावी. पण एरवीं परक्याच्या आक्रमणप्रसंगीं जुटीने आणि शिस्तीनें प्रतिकार करण्याचे तंत्र निर्माण झालें नाहीं. जूट निर्माण करणाऱ्या दोन जोरदार भावना म्हणजे धर्मभावना व राष्ट्रभावना. पैकीं मुसलमानाच्या पूर्वीच्या आक्रमणाविरुद्ध जूट निर्माण करण्यास धर्मभावनेचा फारसा उपयोग होण्यासारखा नव्हता. कारण हे आक्रमक स्वतःच येथील वैदिक किंवा बौद्धधर्म स्वीकारीत हें कनिष्क, मिनॅंडर, मिहिरगुल वगैरेंच्या उदाहरणावरून दिसून येईल. परकीयानीं धर्मभावनेस विरोध करण्याचे टाळल्यानें व धर्मभावनेच्या सहिष्णु आणि संग्राहक वृत्तीमुळे तिच्यातील पीळ आणि जोर शिथिल झाला होता. यास्तव हिंदुधर्मभावनेवर आघात करणारे मुसलमानी व ख्रिश्चन आक्रमण सुरू झालें तेव्हा धर्मभावनेच्या बळावर संघटन करण्याइतकी ती भावना प्रखर राहिली नव्हती. देवद्रोही कुत्याना मारून काढावें अशी जळजळीत भाषा बोलणारा रामदासासारखा एखादाच साधुसंत सापडावा याचा दुसरा अर्थ काय ? गोव्यास राहणाऱ्या हिंदूंना खिस्ती पोर्तुगीजाचा अनेक प्रकारचा जुलूम सहन करावा लागे. पोरक्या मुलास सक्तीनें बाटविण्यात येई, मंदिरें उभारण्यास परवानगी मिळत नसे, विवाहविधिही सरहद्दीबाहेर उरकावा लागे. तरी देखील तत्रस्थ हिंदु प्रजेच्या धर्मरक्षणाकरिता मराठ्यानीं विशेष यातायात केलेली दिसत नाहीं. वसई पडल्यानंतर गोव्यावर पेशवे चालून गेले (१७३९) तेव्हा तेथील पोर्तुगीज सधन कुटुंबें गोवे मोकळे सोडून मुरगावास गेलीं. तेव्हा धन हातीं लागणारें नसल्यानें मराठ्याचा उत्साह कमी झाला. याबाबत चिमाजीआप्पास आलेल्या एका पत्राचा उल्लेख करून प्रो. पिसुर्लेकर लिहितात कीं, "गोवें काबीज करण्यात लुटीखेरीज अधिक उच्च ध्येय दिसत नाहीं. महाराष्ट्रधर्मरक्षणासाठीं संग्राम करणाऱ्या मराठ्याना गोव्यात हिंदुधर्माची पताका फडकवावयाची इच्छा झाली नाहीं...फिरंग्यावर व्यंकटरावानें जय मिळविल्यावर गोव्यात हिंदूचें देऊळ असावें वगैरे भाषा तहाचे वेळीं बोलण्यात आली. पण पुढें या मुद्यास महत्त्व देण्यात आलें नाहीं......हिंदूंची ही

वृत्ति पोर्तुगीजास ठाऊक होती. विजरई लिहितो कीं 'धर्मस्वातंत्र्याच्या मुद्यावर मराठे भर देतील असे वाटत नाहीं. बाजीरावानें पाठविलेल्या तहाच्या खर्ड्यांत या बाबतींत एक शब्दही नाहीं.' विजरईनें लिहिल्या-प्रमाणें धर्मस्वातंत्र्यावर भर देण्यात खरोखरच आला नाहीं. वाटाघाटींच्या सुरवातीस गोवींयात महाराष्ट्रधर्म चालवावा असे कलम होतें पण तहाच्या प्रसगीं तेंही गाळले[१]" पोर्तुगीजांच्या नतर येणाऱ्या फ्रेंच व इंग्रज या फिरंग्यानीं धर्मात हात न घालण्याचें सहिष्णु व धूर्तपणाचें धोरण स्वीकार-ल्यानें त्याच्याविरुद्ध धर्मभावनेस चेतविण्याची संधि उरली नाहीं. उलट इंग्रजाच्या सहिष्णुवृत्तीने व शिस्तवार राज्यपद्धतीने गुप्त पेढीवाल्यासारख्याना देशद्रोह करण्याइतकी भुरळ पडली.

## राष्ट्रभावनेचा अभाव

धर्मांच्या बरोबरीनें एकजुटीला उत्तेजन देणारी दुसरी भावना म्हणजे राष्ट्रीय भावना होय. या भावनेचा उठाव आपल्या विचारवंतानीं केलेला आढळत नाहीं. हिमालयापासून समुद्रापर्यंतचा हिंदुस्थान हा एक अखंड, एकसंघ असा देश आहे ही भावना जनमनामध्यें रुजविण्यात आली होती. ती रुजविण्यात अखिलभारतीय तीर्थक्षेत्रे, अखिलभारतीय संस्कृत भाषा व धर्मांच्या क्षेत्रातील संग्राहक धोरण कशीं उपकारक ठरलीं हें आपण पाहिलें. पण सामाजिक व राजकीय ऐक्याची भावना रुज-विण्यात आली नाहीं. झाले ते उलटच झालें. जातिभेदाला जन्माचें अधि-ष्ठान दिल्यानें उच्चनीचत्वतेची भावना उत्तरोत्तर तीव्र होत गेली. वैदिक आर्य हिंदुस्थानात आले तेव्हा संख्येने अल्प होते. ज्या अनार्यांशीं त्याचा संबंध येई त्याच्यातील मोठमोठ्या जमातींच्या जमाती व्रात्य-स्तोमासारख्या विधीनें त्याना आर्यसमाजात घ्याव्या लागल्या असतील. अनार्यांच्या स्त्रियानाहि आर्य-गृहव्यवस्थेंत स्थान द्यावें लागलें असावें. आर्यांच्यामधील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांत परस्पर रोटी बेटी-व्यवहार असेच. यामुळें वर्णांच्या कल्पना वैदिक वाङ्मयाच्या काळा-पासून रूढ असल्या तरी लवचिक होत्या. अनार्यांशीं फार प्रमाणावर

१. सरदेसाई स्मारक ग्रंथ पृ. २५, २९.

संकर झाल्यावर व बौद्ध जैनाचे वैदिक धर्मावर हल्ले सुरू झाल्यावर वैदिक धर्माभिमान्याना आपली चूक कळून येऊन, आपला वैदिकधर्म सुरक्षित राहावयाचा असल्यास कडक शिस्तीचीं बंधनें समाजावर लादलीं पाहिजेत अशी भावना उसळली असली पाहिजे. बौद्धधर्माचा व समतेचा प्रसार करणारें अशोकाचें साम्राज्य पुष्यमित्रानें नष्ट केल्यावर वैदिक धर्माचा दुर्दम्य उत्साहानें पुरस्कार करण्यात आला, त्याचे स्वच्छ प्रतिबिंब मनुस्मृतीमध्यें पडलेलें आहे. समता आणि स्वातंत्र्य याऐवजीं वर्णभेद, जातिभेद, जन्मजात उच्चनीचत्व, शिस्तपालन याचा अट्टाहासानें पुरस्कार करण्यात आला. धर्मशास्त्र हें सृष्ट्युत्पत्तीबरोबर ब्रह्मदेवानेंच निर्माण केलें, वेद हेच धर्माचें मूळ होय, ब्राह्मण हे जन्मानेच चारी वर्णांचे गुरु होत, द्विजाची शुश्रूषा करणे हाच फक्त शूद्राचा अधिकार, वगैरे तत्त्वें मनुस्मृतींत अधिकारवाणीनें आणि अत्यत आवेशानें प्रतिपादन करण्यात आलीं आहेत. अशाच आवेशानें राजा हा परमेश्वराचा अंश होय या तत्त्वाचाही पुरस्कार करण्यात आला. सत्ताधीश राजाना तो रुचण्यासारखाच होता. यामुळें क्षत्रबळ आणि ब्रह्मबळ हीं एकवटून या दोन्ही बळाची सत्ता निमूटपणें मान्य करण्यातच समाजाचें कल्याण आहे अशी आग्रहाची जी शिकवण सुरू झाली त्यातून समाज बाहेरच पडला नाहीं.

शासनसंस्थेंत राजशाही आणि विद्येमध्ये वेदविद्या हींच तेवढीं प्रतिष्ठित समजण्यात येऊं लागलीं. शासनसंस्थेमध्यें लोकशाहीचा कोणत्याही स्मृतिकारानें नुसता उल्लेख देखील केला नाहीं, मग समर्थन करणें दूर दूरच. छोटीं छोटीं लोकशाहीरूपाचीं गणराज्यें हीं टिकत नाहींत या अनुभवामुळें अर्थशास्त्रकारानींहि राजशाहीच उचलून धरली. ब्राह्मण श्रेष्ठ कीं क्षत्रिय श्रेष्ठ याविषयीं झालेले तंटे वसिष्ठ-विश्वामित्राच्या कथेंत व बौद्धग्रंथांत पाहावयास सापडतात. बौद्धधर्मानें श्रेष्ठस्थानीं ब्राह्मणाऐवजीं क्षत्रियांची स्थापना केली पण जातिभेद नष्ट केला नाहीं. समतेचे तत्त्व धर्माच्या प्रातात पसरविण्याचें श्रेय बौद्धधर्म आणि भागवतधर्म यानीं मिळविलें, पण व्यावहारिक क्षेत्रात तें त्याना उतरविता आलें नाहीं. व्यावहारिक क्षेत्रात जातिभेदाच्या, वंशपरंपरेच्या, उच्चनीचत्वाच्या तत्त्वाचाच सारखा गजर होत राहिला. यामुळें राज्ययंत्रात राजे आणि त्याच्या भोंवतालचे प्रधान व

सरदार याच्याव्यतिरिक्त इतराना काही स्थान असूं शकतें याची जाणीवच नष्ट झाली. राजशाही ह्या एकाच पद्धतीचा अव्याहत पुरस्कार होत राहिल्यानें राज्य हें राजघराण्याचें ही कल्पना बद्धमूल झाली. युद्धाकरितां कर्जें उभारलीं तरी तीं राजाच्या वैयक्तिक जबाबदारीवर. अशा स्थितींत सर्वांच्या राज्याची कल्पना किंवा राष्ट्राची कल्पना रुजावी कशी ?

## व्यापाऱ्यांत राजकीय दृष्टीचा अभाव

व्यापारी व सावकार याच्या हातीं धनाची सत्ता असल्याने समाजात प्रतिष्ठा आणि राजकारणात प्रवेश मिळण्याबद्दल त्याच्यात चळवळ होणें शक्य होतें. पैकीं ब्राह्मणासारखी प्रतिष्ठा समाजात आपणासही मिळावी याबद्दल दक्षिण-हिंदुस्थानातील सोनार, कासार वगैरे पाच कारागीरवर्गांनीं केलेल्या पंचाल-ब्राह्मण चळवळीचा तेवढा उल्लेख आढळतो. पण हीहि चळवळ बद्धमूल झाली नाहीं, आणि वेदविद्येचें महत्त्व दुसऱ्या कोणत्याहि विद्येला मिळालें नाहीं. कृषि व वैद्यक अशा समाजाच्या मूलभूत गरजा भागविणाऱ्या विद्या ह्या तर उघडपणें कनिष्ठ लेखण्यात येत. अहिंसेच्या विकृत कल्पनेमुळे असो, वा प्रतिष्ठित वर्गाला कष्टाच्या कामापासून दूर राखण्याच्या स्वार्थी वृत्तीमुळें असो, आपत्कालींहि ब्राह्मणानें कृषीचा अवलंब करूं नये असें स्मृतिकार बजावतात. वेदविद्येचें जतन करणें हें ब्राह्मणाचें आद्य कर्तव्य असेल, पण आपत्कालींही त्याने नांगरास हात घालू नये असा कटाक्ष का ? कृषिकर्म हें पाप. पण ते कोणीं तरी केलेच पाहिजे म्हणून तें करणाऱ्या शूद्राला पुण्य, पातक काहींच नाहीं ही कल्पना माडली गेली. खाणींत काम करणें आणि मोठमोठ्या पाटबंधाऱ्यासारख्यात काम करणें याची पातकात गणना करून त्याना प्रायश्चित्त सांगितलें आहे ! उपपातकाची यादी देताना मनूनें 'सर्व आकरेषु अधीकारः महायन्त्रप्रवर्तनम्'[1] याचा त्यात समावेश केला आहे. खाणींत किंवा बंधाऱ्यावर काम करणें कष्टाचें असेल, पण तें पातक काय म्हणून ? ब्राह्मणाना सुवर्णदक्षिणा व राजाना सुवर्णालंकार ह्याचा लोभ असे, पण ती मिळवून देण्याकरिता खाणींत कष्ट करणें हें मात्र पाप !

१. सुवर्णाद्युत्पत्तिस्थानेषु राजाज्ञया अधिकारः । महतां प्रवाहप्रतिबन्धहेतूनां सेतुबंधादीनां प्रवर्तनम् । —कुल्लूकाची टीका.

पाटबंधारे आणि कृषि हीं तर समाजाच्या आर्थिक व्यवस्थेचा पाया होत. हा पाया भक्कम मरणाऱ्या वर्गाकडे तुच्छतेनें पाहणे हें विकृत सामाजिक तत्त्वज्ञानाचे मासलेवाईक उदाहरण होय. कृषि, वाणिज्य, शिल्प यावरच आर्थिक जीवनाची उभारणी टिकत असते. या समाजाच्या मूलभूत गरजा भागविणाऱ्याला व कष्ट करणाऱ्याला समाजात योग्य प्रतिष्ठा मिळणें अवश्य आहे. पण हिंदुसमाज सहिष्णु असला तरी जातिजातींतील जन्मजात उच्चनीचतेचा व जन्मजात नियतकर्माचा हिरिरीनें प्रसार करण्यात त्यानें एकदा जी कठोर वृत्ति स्वीकारली ती पुढें नरमावलीच नाहीं. भागवतधर्मानेंहि अध्यात्माच्या प्रांतात समतेचा पुरस्कार केला तरी व्यावहारिक क्षेत्रात विषमता कायम राखली. ज्या जातींत पूर्वप्राक्तनानें जन्म मिळाला त्या जातीचें नियतकर्म करीत राहावे हाच धर्मशास्त्राचा एकमेव आदेश. शिंदे, होळकर यांच्यासारखे पराक्रमी पुरुष सरदारी मिळवीत, क्षत्रियाचा पेशा स्वीकारीत, पण तें धर्मशास्त्राच्या आशेला डावलून. असे पराक्रमी पुरुष निघतील तेव्हा ते राजकारणात आपला प्रवेश करून घेत पण ते सरदार बनून पुढे त्याची सरदारी वंशपरंपराधिष्ठित होई. ब्राह्मण किंवा वैश्य यांच्यातही धाडसी आणि पराक्रमी असत ते जातिनियत धंद्याच्या धार्मिक तत्त्वाला धाब्यावर बसवून क्षत्रियाचा पेशा स्वीकारीत व सरदार किंवा राजे बनत. पण बाकीच्यांची राजकारणात आपुलकी वाटण्यासारखी परिस्थिति नव्हती. आपआपले उद्योगधंदे सांभाळूनही राजकारणात भाग घेता येणें शक्य आहे हे सामाजिक तत्त्वज्ञानच आपणात मांडलें गेलें नव्हतें. वास्तविक व्यापारी, उदमी, सावकार यांच्या हातीं धनाची केवढी सत्ता ! पण त्या सत्तेच्या जोरावर राजकारणात स्थान मिळविता येईल ही कल्पनाच कधीं व्यापाऱ्याना सुचूं शकली नाहीं ! चिररूढ तत्त्वज्ञानाची अशी ही कडक पकड मनावर बसते. मागें अबूवरील देवळें बांधणाऱ्या गुप्त पेढीवाल्याची हकीकत दिली आहे. मंदिरें बांधण्याकरिता त्यांनीं दहा कोटि रुपये खर्च केले यावरून त्यांच्या सधनतेची कल्पना येईल. त्यांनीं इंग्रजाना पैशाची मदत केली व त्याच्यासाठीं हेरगिरीहि केली याचाही उल्लेख मागें आला आहे. पण या कामगिरीबद्दल राजकारणात आपणाला स्थान मिळावें अशी अट त्यांनीं

घातली काय ? कलकत्त्यास गव्हर्नराचें कार्यकारी कौन्सिल असे त्या कौन्सिलात आपल्या पेढीचा मुनीम कायमचा सभासद असावा अशी मागणी त्यानीं केली असती तर अनेक अडचणींतून बाहेर पडण्यास त्याचें साहाय्य घेणाऱ्या इंग्रजाना त्याची अट मान्य करणें भागच पडलें असतें. पण ही अट घालावयाचें सुचावयाचेंच कसें ? जुन्या परंपरागत मळलेल्या वाटेनें जाणें हीच मानवी मनाची नित्याची प्रवृत्ति. यामुळे आपला व्यापार सुरक्षित राहावा व धर्म निर्वेध चालावा येवढ्यावर गुप्त पेढीवाले राजी होते. व्यापार सुरक्षित राहण्यास राजसत्तेचा पाठिंबा लागतो हे त्याना कळत होतें; पण राजसत्तेत हक्काचें स्थान व्यापाऱ्यालाहि निर्माण करता येतें ही लोकशाही कल्पना त्याच्या मनाला शिवली नव्हती. या गुप्त पेढीवाल्यात कोणी धाडसी निघाला असता तर त्याने फक्त एखादी जहागिरी मिळविली असती इतकेंच.

## सावकारी व वतनदारी

गुप्तासारखे परक्याना फितुर झालेले सावकार सोडून स्वकीय राजाना कर्ज देणारे सावकार घेतले तरी त्यानींही कर्ज देताना राजकारणात प्रवेश मिळण्याची अट घातलेली दिसत नाहीं. पैशाच्या जोरावर ते जहागीरदारी मिळवीत व छोटे राजे बनत. पण मध्यवर्ती शासनसंस्थेत हक्काचे स्थान मिळविण्याची कल्पना आपल्याकडे निघाली नव्हती. पेशव्याना कर्ज काढण्याचा प्रसंग नित्याचा असल्यानें अनेकाकडून कर्ज काढावें लागे. '१७४० सालीं लाख लाख रुपयेपर्यंत ज्यानीं कर्ज सरकारास दिलें असे सावकार पुण्यास सुमारें १६२ होते.'[1] परशुराम नाईक अनगळ यानें थोरल्या बाजीरावास लक्षावधि रुपये कर्ज दिलें होतें. महादजी शिंद्यास कर्ज देणारा गोपाळ नाईक तांबवेकर यानें काशीपासून रामेश्वरापर्यंत अनेक पेढ्या स्थापून कोट्यवधि रुपयाची जिंदगी संपादन केली होती.[2] असले धनत्तर सावकार लाखों रुपये सरकारास कर्जाऊ देत असतानाहि त्याच्या जोरावर राजकारणांत हक्क संपादण्याची कल्पना येथें उत्पन्न होऊ शकली नाहीं. जें

१. पेशवेकालीन महाराष्ट्र पृ. ३१६.

२. किता, पृ. ३६९

काय संपादन करावयाचें तें वतन. या वतनाच्या मायेनें आपल्या पूर्वजांचीं मनें कायमचीं मारून गेलेलीं होतीं. ह्या वतनाच्या लोभामुळें सामाजिक दृष्ट्या हितानहिताचा विचार मागें पडून वैयक्तिक स्वार्थ बळावला. आपलें वतन संभाळणे हाच श्रेष्ठ पुरुषार्थ होऊन बसला. तें संभाळण्याकरितां बांधवद्रोह, ग्रामद्रोह, धर्मद्रोहही करण्यास मन कचरेनासें झालें. येथवर या वतनाची मगरमिठी घट्ट झाली. आणि वतनें वंशपरंपरागत. वंशपरंपरेचें तत्त्व हें एक मूलभूत तत्त्व म्हणून सरसहा प्रतिपादण्यात आले. यामुळें समुद्र-रशना पृथ्वीच्या चक्रवर्ती राजापासून तो टीचभर गावच्या पाटलापर्यंत वंश-परंपरेनें वतन खाणाऱ्या वतनदाराची अखंड साखळी निर्माण झाली. प्रत्येक वतनदार आपल्यापुरतें पाही. आणि हीच वृत्ति सर्वत्र प्रभावी होऊन राहिलेली. शिलेदार लष्करात आपले घोडे घेऊन गेला म्हणजे आपल्या राजाला हार खावी लागली यापेक्षा आपले घोडें फुकट मरेल कीं काय याचीच त्याला चिंता असे याचा उल्लेख मागे केला आहे. खेड्यापाड्या-तही हीच वृत्ति. जें ते गाव आपआपल्यापुरतें पाही. आपला गावगाडा हा स्वावलंबी व सतुष्ट असे त्याचे वर्णन करण्यात येतें. त्या गावगाड्यासंबंधीं हरतऱ्हेची माहिती ज्यानीं गोळा केली ते लिहितात कीं "संबंध काळी पाढरीची सामाजिक, राजकीय जबाबदारी गावाने सर्व मिळून घ्यावी, कोणत्याही कारणानें त्याला परगावाशीं किंवा खुद्द सरकारापाशीं सुद्धा तोंड वेंगाडण्याची गरज पडू नये हें ध्येय डोळ्यापुढे ठेवून आमच्या पूर्वजानीं गावगाडा भरला. म्हणून तो पूर्वींच्या बेबंदशाहींतून वाचून निघाला."[१] पण गावगाड्याच्या या स्वयंपूर्णतेची दुसरी बाजू ते कशी मांडतात तें पाहा. ते लिहितात, " जें ते गाव आपआपल्यापुरते पाही. शेजारच्या गावावर बंड आलें तर त्याचे शिवमाऊ त्याच्या मदतीला न धावतां खुशाल आपआपल्या शेतात नागर कुळव हाकीत." सारांश, वतन, वंशपरंपरा, तुटक वृत्ति यामुळें सर्व समाजात एक वारें खेळणें कठीण असे. जातिभेद, उच्चनीच भाव, वेतन, वंशपरंपरा या सर्वांच्या अहर्निश शिकवणीनें विचारस्वातंत्र्य दडपले गेलें. त्याच्या विरुद्ध उठावणी झाली पण ती धार्मिक बाबतींत. बौद्ध, जैन, लिंगायत, मानभाव, भागवत

---

१. त्रिंबक नारायण अत्रेकृत गांवगाडा, पृ. १७, १८.

या पंथानीं समतेचा पुरस्कार केला पण तो अध्यात्माच्या आणि धर्माचरणाच्या क्षेत्रात, व्यवहाराच्या क्षेत्रात तो त्यांना उतरून दाखवितां आला नाहीं. यामुळे लोकशाहीच्या कल्पना रुजल्या नाहींत व सर्व समाजपुरुषात एक रक्त खेळत आहे ही जाणीव उत्पन्न झाली नाहीं.

त्या त्या धंद्यात नवीन शोध लागण्यालाही जन्मजात धंदाच प्रत्येकानें करावा ही कल्पना, तसेच उत्पादक, कष्टाच्या व कसबी धंद्याविषयीं हीन भावना ह्या बऱ्याच अंशीं कारणीभूत झाल्या असाव्या. आठव्या शतकानंतरच्या पडत्या काळात साक्षरतेचें क्षेत्र अगदीं संकुचित झाले. प्राचीन काळीं त्रैवर्णिकाचे उपनयन होत असे व शूद्र सोडून बाकी जनता साक्षर असे. ग्वाल्हेर संस्थानातल्या मंदसोर येथील लेखावरून कारागिराच्यामध्यें पाचव्या शतकात विद्याव्यासंग कसा होता व नियत कर्मच केले पाहिजे याचीं जोखडही कशी नव्हती याचे चित्र दृष्टीस पडतें. मंदसोर येथें सूर्याचें एक भव्य मंदीर पाचव्या शतकात एका धनाढ्य वीणकर संघानें बाधलें. त्या संबंधींच्या लेखात लिहिलें आहे कीं हा संघ मूळ लाट देशचा असून दशपूरच्या राजाची कीर्ति ऐकून दशपुरास आला. तेथें आल्यावर काहींनीं आपला पूर्वीचा विणकराचा धंदा सुरू ठेवला पण संघातील इतर सभासदांनीं निरनिराळ्या विद्या कला संपादन केल्या. कोणीं धनुर्वेदाचें अध्ययन केलें, कोणी ज्योतिषात पारंगत झाले, कोणी धर्मोपदेशक बनले.[1] विद्येचें हें खेळतें वारें पुढील काळीं राहिलें नाहीं. क्षत्रिय-वैश्याचे उपनयन लुप्त झाले व साक्षरता फक्त ब्राह्मणातच संकुचित झाली. ब्राह्मणाची वेदविद्या ही उत्पादक नसल्यानें देणग्या देऊन त्यांची विद्या जगविणे जरूर होतें. पण त्या देणग्यानीं पुण्य जोडतें या कल्पनेनें या देणग्याचा ओघ जरूरीपेक्षा अधिक या क्षेत्रात वाहूं लागला. पिकाला पाणी लागतें पण तें अधिकांश झाल्यास बाधक होतें. तसाच प्रकार येथेंही झाला. मंदीर, मठ, अग्रहार याच्यावर पैशांची खैरात होऊं लागली. या मंदीरमठांना जोडून पाठशाळा असत. पण त्यात प्रामुख्यानें वेदविद्याच शिक-

१. Select Inscriptions p. 290.

विली जाई. दहाव्या शतकातील राजेंद्र चोल याच्या कारकीर्दीत एका मंदिराला देणग्या दिल्याचा लेख आहे त्यातील तपशील असा : मंदिराला जोडलेल्या पाठशाळेत ऋग्वेद व यजुर्वेद शिकणारे प्रत्येकीं ७५, छांदोग्यसाम, तवलकारसाम, वाजसनेय शिकणारे प्रत्येकीं २०, अथर्व व बौधायन, गृह्यकल्प शिकणारे प्रत्येकी १०, रूपावतार ४०, व्याकरण शिकणारे २५, मीमांसा ३५, वेदान्त १० इतक्या विद्यार्थ्यांची अन्नाच्छादनाध्यापनाची व्यवस्था करण्यात आली होती.[1] हीच प्रथा पेशवाईत दिसून येते. पेशव्याची श्रावणमासदक्षिणा प्रसिद्ध आहे. ही दक्षिणा लाखों रुपयांची वाटण्यात येई व गुणी जनाची संभावना करण्यात येई. पण त्यात कोणत्या विद्या प्रामुख्यानें वावरत हें या संबंधींच्या एका यादीवरून दिसून येईल. त्या यादींत नावें आहेत तीं-आश्वलायन दशग्रंथी, आपस्तंब पंचग्रंथी, तेलंग जटापाठी, काण्व क्रमपाठी, व्याकरण कौस्तुभ पडलेले, नैयायिक भावानंदी जाणणारे, काव्यपाठी माघान्त पढणारे, अलंकारी कुवलयानंद पढविणारे वगैरे.[2] या यादीमध्यें व्यवहारोपयोगी अशा धंदेवाइकाचें नाव आढळतें ते 'वैद्य शारङ्गधर पढविणारे व रसायनक्रिया जाणणारे' याचें होय. आठव्या शतकानंतरच्या पडत्या काळात ज्या एकाच शास्त्राची जोपासना क्षीण झाली नाहीं तें शास्त्र म्हणजे रसायनशास्त्र हें होय. मागें 'ऐश्वर्योपासना' या प्रकरणात उल्लेखिलेले कांहीं रससिद्ध तेराव्या चौदाव्या शतकांतले आहेत (पृ. १४७). पाऱ्याचे विलक्षण गुणधर्म समजून आल्यानें व त्याच्या सेवनाने अमरत्व प्राप्त होण्याच्या आशेनें ही विद्या जागृत राहिली असावी. ही विद्या सोडल्यास बाकीच्यांत नवीन भर पडणें बंद झालें हे तें. पेशव्याच्या पूर्वी दोनशें वर्षें अकबर बादशहाच्या कारकीर्दीत हिंदु लोक व मुसलमान लोक कोणत्या विद्यांचा अभ्यास करीत ह्याविषयीं अबुलफाजल लिहितो कीं, 'हिंदु हे व्याकरण, वेदान्त, पातंजल हें शिकतात तर मुसलमान हिशेब, अंकगणित, शेती, राज्यशास्त्र, इतिहास, भूगोल, नीति वगैरे शिकतात.'[3]

---

१. Corporate Life by Majumdar, p. 201.

२. य. न. केळकर कृत भूतावर भ्रमण. पृ. १५८.

३. Ayeen Akbery, translated by F. Gladwin Vol.I p. 193.

साक्षरता मुख्यतः ब्राह्मणात आणि त्याचें लक्ष वेदवेदान्त—व्याकरण यांकडे; याचा परिणाम श्रेष्ठ दर्जाची व न्याय-व्याकरणादिकाच्या अभ्यासानें प्रखर झालेली बुद्धिमत्ता भौतिक शास्त्राच्या वाट्यास येईनाशी झाली. असावी. यामुळें भौतिक शास्त्रातील शोधक बुद्धि मरगळली असावी.

कसेंहि असो, इंग्रजांच्या आक्रमणकालीं आम्ही भौतिक शास्त्रात आणि सामाजिक संघटनेंत मागसलेले होतों ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याच्या काहीं संभाव्य कारणाची चर्चा केली. या कारणापैकीं प्रकृतिधर्मानुसार संस्कृतीला मरगळ येते असें मानलें तरी व्यक्तीला एकदा वृद्धावस्था प्राप्त झाल्यावर पुन्हा तारुण्यात प्रवेश करिता येत नाहीं तो नियम समाजाला लागू आहे असे मानण्याचें मुळींच कारण नाहीं. व्यक्ति वृद्ध होत असली तरी समाज वृद्ध न होता समृद्ध होऊं शकतो. त्याची नेहमींच प्रगति होत असते असें नाहीं. प्रगति-परागतीचे हेलकावे त्याला खावे लागतात. पण समाज जागृत असेल, त्याचे दोष त्याला दिसत असतील, पुनश्च वैभवावर चढण्याचा हुरूप असेल, तरीही तो दुर्बल होत जावा असे नियतीचे सूत्र दिसत नाहीं. वृक्ष शुष्क होत होत अंतीं वठलाच पाहिजे हा दाखला समाजास लावणे गैर आहे. दाखला द्यावयाचा तो वनाचा. असंख्य वृक्ष वठले तरी नवे त्यांची जागा घेण्यास उगवत असतात व वन हें पर्ण-पुष्पानीं डंवरलेलें असतें. तसेंच समाजाचें. आपला समाज आता जागृत झाला आहे, पुनश्च वैभवानें मिरविण्याचा त्याचा कृतनिश्चय झाला आहे. तरी आता आपल्या संस्कृतीच्या रुद्ध झालेल्या प्रवाहाकडून पुनश्च जोमानें वाहणाऱ्या प्रवाहाचें दर्शन घेऊं या.

## प्रकरण सोळावें

# संस्कृतिगंगेचा पुनश्च जोरकस प्रवाह !



आपल्या संस्कृतीचा मूळचा जोरकस प्रवाह कालांतराने दुबळा कसा झाला व त्यावर अंधश्रद्धेचे शेवाळें कसे माजले हे आपण पाहिलें; व या अवस्थेला कोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या असाव्या याविषयीं तर्क चालविण्याचा प्रयत्न केला. शेवाळें माजलेल्या या संचितावस्थेंत हा प्रवाह आज कित्येक शतकें रुद्ध होऊन बसला होता. त्याला आता कालगतीने पाश्चात्य संस्कृतीच्या संघर्षाने जोराचा धक्का दिला आहे. या धक्क्यानें जागे होऊन अंधश्रद्धेचें शेवाळे झाडून जर आपण टाकू आणि प्रवाह रुद्ध करणाऱ्या जाचक आचारविचाराचे धोंडे बाजूला जर सारू तर आपली संस्कृतिगंगा पुनश्च आपल्या विमल प्रभावी रूपाने वाहू लागेल, आणि जागतिक संस्कृतीच्या पुण्योदकात स्वतःची म्हणून कांहीं भर अभिमानाने टाकूं शकेल.

जागतिक संस्कृतीची उंची जेणेंकरून वाढेल असें आमच्याजवळ देण्यासारखें नाहीं असेंहि नाहीं. पाश्चात्य संस्कृतीच्या संघर्षानें व आक्रमणानें आमच्यातले दोष आम्हास जाणवूं लागले आहेत. प्रगतीच्या शर्यतींत कांहीं बाबतींत त्यांनीं आमच्यापुढे आघाडी मारली आहे हें आम्हाला कळून चुकलें आहे. आम्ही विद्येची हेळसांड करून मिथ्याभिमानाच्या रंगणात फिरत राहिलों हें पटूं लागलें आहे. ही हेळसांड टाकून पुनश्च पूर्वीची उत्साही वृत्ति उजळली पाहिजे हे उमगूं लागलें आहे. पण आजहि प्रत्येक बाबींत पाश्चात्यांच्या पायाशीं धूळपाटी घेऊन बसण्याची आम्हांस आवश्यकता आहे असें नाहीं. मनाला शाश्वत शांतीची जोड मिळवून देणारी अध्यात्मविद्या घ्या. या विद्येकरिता आम्हाला काय पाश्चात्यांच्या पाठशाळांत गेलें पाहिजे ? मुळींच नको. साक्षात् मृत्यूशीं

धीटपणानें चर्चा करणाऱ्या आपल्या नचिकेताचे तत्त्वज्ञान आम्हालाच नव्हे तर इतरानाहि पुरून उरेल. सार्वजनिक आरोग्याचे व स्वच्छतेचे धडे पाश्चात्यापासून शिकावे म्हणता ? सुतराम् नको. सोवळ्या-ओवळ्याचा आम्हीं अतिरेक केला असेल, पण प्रातर्विधीकरिता जलाचा उपयोग न करणारे पाश्चात्य आम्हास शुचिर्भूतपणा काय शिकवणार ? सामाजिक जीवनात स्त्रियाना प्रतिष्ठित स्थान देणे हें एक पाश्चात्य संस्कृतीचे लक्षण समजण्यात येतें. पण याहि बाबतींत दोन्ही संस्कृतींचा शतकानुशतकाचा आचार पाहिल्यास स्त्रियाच्याकडे उदार दृष्टीनें पाहण्याच्या बाबतींत भारतीयानींच दोन गोष्टी पाश्चात्याना सागाव्या अशी स्थिति आहे. अगदीं अलीअलीकडे पर्यंत, म्हणजे १९१४–१८च्या महायुद्धापर्यंत, इंग्लंडमधील प्रतिष्ठित विद्यापीठे हीं स्त्रियाना पदवी देत नसत व त्याना वकिलीसारख्या धंद्याची सनद देत नसत हे सागितले तर खरे सुद्धा वाटणार नाहीं. आपल्या देशात घोषा, लोपामुद्रादि सूक्तकार स्त्रियाची व भरसभेंत पतीशीं वेदान्त विषयावर चर्चा करणाऱ्या गार्गीसारख्या विदुषी स्त्रियाची परंपरा फार प्राचीनकालीं रूढ होती. विवाहाचे वय झाल्यावरहि गृहिणीपदाची जोखीम न स्वीकारता बराच काल विद्येच्या उपासनेत घालविणाऱ्या स्त्रिया असत; त्याना ब्रह्मवादिनी स्त्रिया असें स्वतंत्र नाव हारीत स्मृतीमध्यें दिले आहे ( द्विविधः स्त्रियः ब्रह्मवादिन्यः सद्योवध्वश्च ). यापैकीं काहीं विद्यालयातून अध्यापनाचे कामहि करीत व उपाध्याय पत्नीहून त्याचें स्थान स्वतंत्र दर्शविण्याकरिता पहिल्याना उपाध्यायानी म्हणून दुसऱ्याना उपध्याया असें म्हणत. पुरुषाप्रमाणें स्त्रियाचीं उपनयनेंही एके काळीं होत असत. तो प्रकार पुढें बंद पडला व स्त्रियाचा सामाजिक दर्जाहि खालावला तरी गाथासप्तशतींत ज्याचीं कवने घेतलेलीं आहेत अशा रेवा, माधवी वगैरे कवयित्री व राजशेखराची पत्नी अवंतिसुंदरी अशा विदुषी याची परंपरा सुरू होती. ही परंपरा पाहून पाश्चात्य पडिताना अचंबा वाटला तर आश्चर्य नाहीं. त्याच्यापैकीं एक पंडित प्राचीन भारतातील वैवाहिक जीवनाची चर्चा करीत असता गार्गीसंबंधीं लिहितो, "वेदान्तासारख्या विषयावर एका स्त्रीनें भरसभेमध्यें धीटपणें चर्चा करावी हा प्रकार आमच्या ॲरिस्टॉटल किंवा प्लेटोलाहि किती हास्यास्पद वाटला असता ! आणि

मध्ययुगातील धर्मोपदेशकाना ! ते तर आपल्या सभामधून गंभीरपणें चर्चा करीत होते कीं, स्त्रियाना आत्मा आहे असें मानावें कीं न मानावें !"[१] कुटुंबातील गृहिणीच्या दर्जाची महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिचें आर्थिक स्वातंत्र्य ही होय. या बाबतींत तर पाश्चात्यानाच मान खालीं घालावी लागेल. कारण विवाहित स्त्रीला स्वतःचे स्त्रीधन ठेवण्याचा हक्क इंग्लंडमध्यें १८८२ पर्यंत नव्हता, आणि आपल्याकडे याज्ञवल्क्याच्या काळापासून तो मान्य केलेला आहे. वैदिक काळातील स्त्रियाचा दर्जा वैदिकोत्तर काळीं राहिला नाहीं. तो पुनश्च त्याना प्राप्त करून देणे जरूर आहे.

आपल्या संस्कृतींतील वरीलपेक्षा अधिक महत्त्वाच्या बाबी म्हणजे सामाजिक ऋणाची कल्पना, आश्रमव्यवस्था व सहिष्णुता. माणूस जन्माला येतो तो समाजाचें ऋण घेऊनच येतो व ते त्याने फेडलेच पाहिजे ही एक आपल्या प्राचीन धर्मशास्त्रकारानीं माडलेली उदात्त कल्पना होय; आणि ती अंमलात आणण्याकरिता जीवनाचे चार भाग पाडून विद्येच्या काळीं विद्यार्जन, गृहस्थाश्रमात ससारसुख, म्हातारपणीं वानप्रस्थाश्रम व अंतीं सर्वसंगपरित्याग अशी जीवनाची सुंदर, प्रमाणबद्ध माडणी त्यानीं केली होती. ही आश्रमसंस्था टिकली नाहीं हें दुर्दैव. समाजाचें ऋण फेडल्याशिवाय मोक्षमार्गाकडे वळणारा माणूस अधोगतीला जातो अशा खणखणीत वाणीनें स्मृतिकाराने बजावले असताहि सन्यासमार्गाचाच पगडा समाजावर बसला व सर्वश्रेष्ठ आश्रमसंस्था नष्ट झाली. पण तिच्यातील कल्पना ही एक चिरंतन उपकारक अशी कल्पना होय. तिसरी गोष्ट सहिष्णुवृत्तीची. ही वृत्ति भारतीयानीं धर्माच्या प्रातात तरी कशी नमुनेदारपणें जागविली याचीं उदाहरणें मागें अकराव्या प्रकरणात दिलींच आहेत. ह्याच सहिष्णुवृत्तीचा परिपोष जागातिक व्यवहाराच्या सर्व क्षेत्रात झाला तर आजच्या जगाचा रंग सर्वस्वीं पालटेल. या बाबतींत धडा घालून देण्याची योग्य पात्रता कोणात असेल तर ती भारतीय संस्कृतींतच आहे.

पण... पण राजकीय पारतंत्र्याच्या लोहशृंखलानीं जखडून गेलेली आपली ही संस्कृति आज जगाला सहिष्णुतेचा उपदेश कोणत्या तोंडानें

१ Sexual Life in Ancient India by Meyer. Vol. I. P. 440.

करणार ? तो उपदेश तिच्या तोंडून खणखणीत वाणीनें बाहेर पडावयाचा असेल तर तिला प्रथम आपल्या पायातील पारतंत्र्याच्या बेड्या तोडाव्या लागतील. आणि त्या तोडावयाच्या तर ज्यानीं त्या पायीं ठोकल्या त्यांचें सामर्थ्य त्याच्या ज्या विद्येत आणि समाजरचनेंत साठविलेलें आहे तीं हस्तगत करावीं लागतील. स्वतंत्र झाल्यावर व स्वतःस सामर्थ्य प्राप्त झाल्यावर त्या सामर्थ्याचा उपयोग परक्याच्या पायात बेड्या घालण्याकरिता आपण कधीहि करणार नाहीं हें साक्षात् कृतीनें सिद्ध करून जगताला तिला धडा घालून देता येईल. पण तें होण्यास आजची दुर्बलावस्था ज्या कारणानें प्राप्त झाली आहे तें ओळखून भौतिक शास्त्राची उपासना, सर्वे नः सुखिनः सन्तु हा समतावाद, व ऐहिक आपत्ति दूर करण्यास ऐहिक मार्गांचा अवलंब ह्या गोष्टी स्वीकारल्या पाहिजेत.

दुर्दैवानें असा एक विचारवंताचा वर्ग आपणामध्यें आहे, कीं ज्याना आपली अवनति दूर करण्याचा उपाय म्हणजे ईश्वराच्या न्यायीपणावर भरंवसा ठेवून धार्मिक वृत्तीनें आयुष्य कंठीत बसणें येवढाच होय असें वाटतें ! आणि दुसरा एक असा वर्ग आहे कीं ज्याना अवनति झाली आहे हेच मुळात मान्य नाहीं ! !

## धर्मानुष्ठान हेंच स्वातंत्र्यसाधन

या दोन पथाच्या विचारसरणीचें दिग्दर्शन म्हणून 'नवयुगधर्म' व 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' या दोन ग्रंथातील मासलेवाईक उतारे पाहूं. राजकीय स्वातंत्र्याकरिता आज आपल्या देशात चालू असलेल्या लढ्याची पद्धति ही नवयुगधर्मकाराना सर्वस्वीं फोल वाटते. आजची चळवळ ही मानवी प्रयत्नाच्या अनुरोधानें चालविली जात आहे. तिच्यात ईश्वरी कृपेचे आवाहन नाहीं. पण नवयुगधर्मकाराच्या मतें ईश्वरी कृपा संपादन करणें हीच चळवळीची खरी दिशा होय. ते लिहितात, "धर्म ही एक किमया आहे ही गोष्ट आजकाल लोक विसरले आहेत. आज जें राजकारणास महत्त्व प्राप्त झालें आहे तें योग्यच आहे असें जरी मानलें, तरी आज शें-दीडशें वर्षांचा जडलेला पारतंत्र्याचा राजयक्ष्मा दूर होण्यास सद्धर्मानुष्ठानावाचून दुसरा इलाज नाहीं; उपासनेच्या बळावाचून दुसरें बळ

नाहीं; ईश्वरी कृपा संपादन करण्यापलीकडे दुसरा तरणोपाय नाहीं असें आम्हास तरी स्पष्ट वाटत आहे! आंग्लविद्याव्याघ्रीचें दूध प्यालेल्या कित्येक प्रागतिक चळवळ्या वाघांनीं बारा हात उडी मारण्याच्या अवसानानें शेपट्या झाडाव्या, परंतु पुढे चारी बाजूंनीं मारलेले पोलादी गज पाहून त्यावर गुरगुरत आपलीं नाकें घासून रग जिरवावी अशाच प्रकारच्या आजच्या साऱ्या राजकीय चळवळी परिणामीं दिसत आहेत. उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं म्हणून कांहीं धडपड करावयाची इतकेंच! असले हे निराशेचे उद्गार सांगण्यास येवढी ग्रंथप्रवृत्ति नको होती असे कोणी म्हणेल; त्यास आम्हास येवढेच सांगावयाचें आहे कीं, आम्ही निराशावादी नाहीं; प्रबल आशावादीच आहोंत; पण **ईश्वर करील तें खरें अशी आमची बळकट श्रद्धा आहे.** त्या ईश्वरी कृपेस पात्र होण्यासाठींच धर्मानुष्ठानाची आम्हास जरूर आहे."[1]

ग्रंथकर्त्यांने आपलें प्रामाणिक मत स्पष्ट शब्दांत मांडले आहे हें उघड आहे; म्हणून तितक्याच प्रामाणिकपणें आणि निःसंदिग्धपणे येथे सांगितलें पाहिजे कीं, राजकीय चळवळीची आज जगभर अवलंबिली जात असलेली लौकिक, व्यावहारिक, मानवीप्रयत्ननिष्ठ, त्यागप्रधान अशी प्रणाली सोडून ईश्वरकृपासंपादनाच्या अनुष्ठानप्रधान मार्गाला जर आपला देश लागेल तर त्या चळवळीला यश येण्याची आशाच नष्ट होईल. सर्वशक्तिमान् ईश्वरानें मनांत आणल्यास काय वाटेल ते होईल हें तर खरेंच; पण मानवाला बुद्धीचें देणें दिले असताहि त्यानें त्याचा उपयोग करण्याऐवजीं केविलवाणेपणानें आपली करुणा भाकीत बसावें या दौर्बल्याबद्दल ईश्वरालाहि मानवाचा तिटकारा वाटल्यावाचून राहणार नाहीं. म्हणून ईश्वराच्या अमूर्त स्वरूपाची उपासना करीत बसण्यापेक्षा ईश्वराचें मूर्तस्वरूप जी जडसृष्टि आणि चैतन्यसृष्टि त्या सृष्टीचें रहस्य उकलण्याचा प्रयत्न करणारीं जीं भौतिक शास्त्रें व सद्भावना बलिष्ठ करणारीं सामाजिक शास्त्रें त्यांची उपासना करणें हेंच समाजाच्या हिताचें होय.

---

१. स. कृ. फडकेकृत नवयुगधर्म पृ. ७६४. नवयुगधर्म या ग्रंथातील विचारसरणीचा परिचय व परीक्षण यांकरितां 'वादळी वारे' लेख ६ वा पाहा.

## कोण म्हणतो आमची अवनति झाली ?

आता आपली अवनति झाली आहे हाच मुळीं भ्रम आहे अशा प्रकारची विचारसरणी ऐकू या. शास्त्रीय ज्ञानात एके काळीं आपण उच्च स्थानावर होतों; पण कालांतराने घसरत घसरत खालीं आलो ते पुन्हा शास्त्रीय ज्ञानाची कास धरल्याशिवाय आपण जगातील श्रेष्ठ राष्ट्रमालिकेंत स्थान मिळवूं शकणार नाहीं असा आपला सूर आहे. पण आपण मागसलो हाच मुळीं भ्रम असून, आपल्या राष्ट्राचा नाश टाळण्याकरिता आपली प्रगति आपण होऊन जाणूनबुजून एका मर्यादेनंतर थांबविली असे कोणीं प्रतिपादन केलें तर तुम्ही काय म्हणाल ? हे प्रतिपादन काल्पनिक नसून 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' या ग्रंथाच्या कर्त्यांनीं स्पष्ट शब्दात माडलेले आहे. ते लिहितात कीं, "इतिहासात तरी जेथे जेथे मानवी प्रगति तेथें तेथें नाश असा त्रिकालाबाधित सिद्धान्त दिसून येतो. प्रगति म्हटली कीं नाश ठेवलेलाच. **हिंदु व चिनी लोकांनीं किंचित् कालपर्यंत प्रगति केली व ते तेथें थांबले. ते समाज आज पृथ्वीच्या पाठीवर जिवंत आहेत.** ग्रीक आणि रोमन लोक सारखे प्रगति करीत गेले ते विनाश पावले !"[१] असे हें प्रतिपादन आहे !

किंचित् कालपर्यंत प्रगति करण्याची तरी आमच्या पूर्वजाना का अवदसा आठवली कोणास ठाऊक ! खरे म्हटले तर भिल्ल, कातकरी वगैरेंप्रमाणें त्यानीं वन्यावस्थेत राहावयाचे होतें. किंबहुना पाशवी अवस्थेतून वरच यावयाचे नव्हते. कारण प्रगति म्हणजे नाश ! पण या मताचा विचार करण्याचेच कारण नाहीं. कां तर त्यातील किंचित् काल प्रगति वगैरे सर्व कसें निराधार आहे व भारतीयानीं हरएक शास्त्र-विद्या-कलामध्ये कशी प्रगति केली होती हे मागे 'भारतीयाची ऐश्वर्योपासना' या प्रकरणीं मीं दिग्दर्शित केलेंच आहे.

रोमन व ग्रीक समाज नष्ट झाले असे म्हणण्याचीहि एक रूढि पडून गेली आहे. पण ते समाज नष्ट झाले म्हणजे काय झाले ? त्याचे साम्राज्य

---

१. गो. म. जोशीकृत हिंदूंचें समाजरचनाशास्त्र पृ ४४. या ग्रंथातील एकदर विचारसरणीच्या परीक्षणाकरितां 'वादळी वारे' लेखांक २ पाहा.

नष्ट झालें, राजकीय सत्ता परक्यांच्या ताब्यात जाऊन अवनति प्राप्त झाली, येवढेच ना ? पण त्याची संस्कृति काहीं नष्ट झाली नाहीं. तिची परंपरा युरोपियन संस्कृतीच्या रूपानें अद्याप अविच्छिन्न चालू आहे. ग्रीकानीं सवर्धन केलेली सौंदर्याची आणि स्वातंत्र्याची आवड आणि रोमनानीं उत्पन्न केलेली कायदेकानूंतील शिस्त याची परंपरा अद्यापिहि चालू आहे. रोमाविषयीं बोलावयाचें तर रोमन लोकाना परकीय असा शार्लमेन राजा रोमच्या गादीवर बसला हे खरें पण त्याने रोमन पोपकडून आपणास राज्याभिषेक करून घेण्यात धन्यता मानली. मग रोमन समाज नष्ट झाला हें म्हणण्यात स्वारस्य काय ? पुढे कित्येक शतके रोमचें राजकीय वर्चस्व खालावले तरी धार्मिक वर्चस्व गाजतच होतें. आणि ग्रीकाविषयीं बोलावयाचें तर विद्येचे पुनरुज्जीवन युरोपात झाले तेव्हा ऋषितुल्य मान कोणाला मिळूं लागला असेल तर तो ग्रीकानाच. आपल्या महर्षि शास्त्रकाराना भरतखंडात जो मान दिला जाई तोच अरिस्टॉटलला युरोपात मिळे. त्याच्या वचनाच्या विरुद्ध ‘ ब्र ’ काढणारास पाखंडी गणण्यात येई. मग ग्रीक व रोमन समाज नष्ट झाले या उक्तीचा अर्थ काय ? राजकीय श्रेष्ठत्वाची जोड मिळाली असती तर ग्रीक व रोमन विद्येला अधिक जोर चढला असता येवढेच. राजकीय स्वातंत्र्य काहीं काल नष्ट झाले येवढ्या अर्थी ते समाज विनाश पावले असे म्हणावयाचें तर हिंदुस्थानची व चीनची तीच गत आहे. अर्थात् ग्रीक व रोमन समाज नष्ट झाले हा एक पोकळ वाक्प्रचार होऊन बसला आहे. क्रीट, सुमेर, मेक्सिको येथील समाज नष्ट झाले असें कदाचित् म्हणता येईल कारण त्या संस्कृतीचा साक्षात् वारस म्हणविणारा समाज आज उभा नाहीं. परंपरेनें वारस सर्व जगच आहे. पण येथील लेख सापडले तर तें अविच्छिन्न परंपरेच्या बळावर वाचील असा समज हयात नाहीं. ग्रीक व रोमन संस्कृतीचा प्रकार असा मुळींच नाहीं. वैदिक वाङ्मय जितक्या भक्तिभावानें आपल्या देशात जतन केलें जात आहे तितक्याच भक्तिभावाने ॲरिस्टॉटल, प्लेटो, होमर याचे ग्रंथ पाश्चात्य देशात अभ्यासिले जातात. अर्थात् ग्रीक संस्कृतीनें युरोपच्या एका कोपऱ्यातल्या लहानशा बेटातून बाहेर पडून सर्व युरोप व्यापलें येवढाच त्याचा अर्थ. शिवाय खुद्द त्या बेटातहि आपल्या जुन्या

संस्कृतीचा अभिमानी असा समाज उभा आहेच. परकीय बलिष्ठ राजकीय सत्तेपुढें त्याना कांहीं काल नमावें लागलें तेंहि प्रगतमुळे नव्हे तर त्याच्यात उत्पन्न झालेल्या दोषामुळे. या दोषाचा आणि प्रगतीचा साहचर्यभाव मुळींच नाहीं. अर्थात् प्रगति म्हणजे नाश हा सिद्धान्तच तर्कदुष्ट आहे.

## विपत्ति हीच खरी संपत्ति !

याच ग्रंथकाराने दुसरे एक प्रमेय मांडले तें फारच लोकविलक्षण आहे. तें म्हणजे विपन्नावस्थेंतच मानवी सस्कृति शुद्धावस्थेत राहते हें होय. अर्थात् आजची विपन्नावस्था दूर करून जीवन अधिक सुखमय करण्याचा प्रयत्न करणें हे परिणामीं घातकी होय असे त्याचे प्रतिपादन आहे. तो म्हणतो : ‘ आम्हाला असें वाटतें कीं, सृष्टीचा नियम जो दुःखशोकात मानवाची शुद्धावस्था राहणे तो डोळ्यापुढून सरून मानव हा सुख हें आपलें ध्येय मानून चालूं लागला म्हणजे हळूहळू त्याची अधोगति होऊं लागते’ (पृ. १४६). चिनी लोकानीं प्रगति केली नाहीं याबद्दल ग्रथकाराला समाधान वाटत असून तो लिहितो, “ चिनी लोकाबद्दल स्टोडार्ड म्हणतो कीं, हजारो वर्षें अत्यंत दारिद्र्यात आयुष्य घालविल्या-कारणानें कोणत्याहि भयंकर परिस्थितींत जगणे हें चिनी मानवाला जितकें शक्य आहे तितकें ते दुसऱ्या कोणालाहि नाहीं. नैसर्गिक निवडीचे नियम ज्या कोणाला कळत असतील तो असे म्हणेल. अशा परिस्थितींत आपले वंश टिकविण्याची आपल्यामध्यें जी हातोटी आहे ती नष्ट कशी होईल या विवंचनेनें तर आज आमचा (पाश्चात्याचा) जीवनक्रम सुधारण्याचे प्रयत्न चालू आहेत ! ” ( पृ. २६७ ).

स्टोडार्ड व त्याचे समानधर्मे याची ही विचारसरणी भ्रातमनस्काची आहे. युरोपात भौतिकशास्त्रीय विज्ञानाची कल्पनातीत वाढ झाली आहे पण त्या ज्ञानानें प्राप्त करून दिलेली सत्ता आणि मत्ता न्याय्यपणें वापरण्याऱ्या प्रामाणिक बुद्धीची वाढ मात्र त्या प्रमाणात झालेली नाहीं; त्यामुळें ‘विचाराचे मोवरे’ या प्रकरणात दिग्दर्शित केल्याप्रमाणें कांहीं पाश्चात्य पंडित भ्रातचित्त झालेले आहेत. आणि यामुळें एकीकडे यंत्र-

शक्तीला शिव्याशाप देत, दुसरीकडे ज्या राष्ट्रांत ही यंत्रशक्ति बद्धमूल झाली नाहीं किंवा खरें बोलावयाचें तर स्टॅंडर्डच्याच जातभाईंनीं स्वार्थी हेतूनीं होऊं दिली नाहीं, त्या चीन व हिंदुस्थानातील यंत्रपूर्व संस्कृतीचें पोकळ स्तुतिस्तोत्र गात सुटले आहेत. पण ही स्तुति पोकळ आहे, भ्रांत-चित्ताची तरी आहे, किंवा स्वार्थी मतलबी तरी आहे.

## ढोंगी स्तुतिपाठक

काहीं वर्षांपूर्वी महात्मा गांधींनीं सामुदायिक सत्याग्रह करून प्रेमानें जग जिंकण्याचा ख्राइस्टप्रणीत प्रयोग हिंदु राजकारणात सुरू केला तेव्हा युरोप-अमेरिकेंतील अनेक ख्रिस्ती पंडितांनीं व धर्ममार्तंडांनीं 'साधु! साधु!' म्हणून माना डोलावल्या का न डोलावतील? ख्राइस्टने उपदेशि-लेल्या ह्या मार्गाचा प्रयोग प्रत्यक्ष व्यवहारात करून पाहण्याची धमक यापैकीं एकाहि पंडितात किंवा धर्ममार्तंडात नव्हती. तेव्हा हा प्रयोग हिंदुस्थानातला एक महात्मा परस्पर करतो आहे, त्याच्याकरिता हालअपेष्टा सोसाव्या लागणार त्या हिंदी जनता सोसणार आहे, आणि जय मिळाल्यास येशूच्या यशाचे तोंड उज्ज्वल होणार आहे; असली सुवर्णसंधि कोण दवडील? अर्थात् युरोप-अमेरिकेंतून महात्माजींवर अभिनंदनाचा वर्षाव झाला तर नवल कसलें? पण हीं अभिनंदनें पोकळ होतीं हें नुकत्याच संपलेल्या युद्धात स्पष्ट झालें आहे. या युद्धात महात्माजींनीं इंग्लंडला संदेश पाठविला तो हा कीं, अग्निवर्षाव करीत हिटलर तुमच्यावर चाल करून आला तरी त्याच्यापुढें हात जोडून प्रेमानेच त्याला जिंका. पण या संदेशाला पाठिंबा देण्यास वरीलपैकीं एक तरी पंडित वा धर्ममार्तंड पुढे सरसावला का? उलट हेच धर्माचार्य प्रेमधर्माऐवजीं शस्त्रधर्माचें समर्थन करूं लागले आणि ज्या रशियाला तो धर्मलंड, भ्रष्ट म्हणून वाळींत टाकण्याचा कंठशोष त्यांनीं केला, त्याच रशियाचे गळ्यात गळा घालणें हे पुण्यकर्म होय असें हे धर्माचार्य उघडपणें व्यास-पीठावरून प्रतिपादन करूं लागले! हें त्यांचे धोरण चूक होतें असें मला म्हणवत नाहीं. ते व्यवहार जाणतात येवढाच त्याचा अर्थ; आणि म्हणूनच अशा व्यवहारज्ञ, धूर्त किंवा दुसऱ्या भोळसट, भ्रांतचित्त

यानीं केलेल्या आपल्या संस्कृतीच्या पोकळ स्तुतीपासून आपण चार पावलें दूर राहिलें पाहिजे.

या स्तुतिपाठकाच्या आहारीं जसें गेलें न पाहिजे तसेंच आपल्या सस्कृतीची निष्कारण खोटीनाटी निंदा करणाऱ्या दुराग्रही प्रतिनिविष्ट निंदकाच्याहिपासून चार पावले दूर राहिले पाहिजे. संस्कृत वाङ्मयाच्या दीर्घ अभ्यासानंतर दुराग्रही पडिताची सख्या कमी होत चालली आहे. चाणक्याचा अर्थशास्त्र हा श्रेष्ठ ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून भारतीयाना वैभव-विन्मुख व आबटतोंड्ये म्हणून मोडून काढणे अशक्यच झाले आहे. मात्र दुर्दैवानें अज्ञान आणि दुराग्रह याची परंपरा संपूर्ण अद्याप नष्ट झालेली नाहीं. अजूनहि हिंदुस्थान हा विचित्र चालीरीतींचा रानटी देश आहे असें समजून समाजशास्त्रीय प्रबंध नटविण्याकरिता हिंदुस्थानातील काल्पनिक चालीरीतींचा अन्याय्य व उपमर्दकारक उल्लेख बेफिकीरपणें करण्यात येत असतो. पन्नास-पाऊणशे वर्षांपूर्वी ज्या वेळेला हिंदुस्थानविषयीं माहिती देणारें वाङ्मय फारसे उपलब्ध नव्हते त्या वेळीं असले उल्लेख कदाचित् खपले असते; पण अवघ्या दहा पधरा वर्षांपूर्वीचा असला उल्लेख दाखविला तर काय म्हणाल ? एक इटालियन पंडित हिंदु नीतिमत्तेविषयीं लिहितो: "हिंदुस्थानातील कांहीं प्रातात कर्जफेडीकरिता धनको हा ऋणकोची बायको गहाण म्हणून हक्कानें मागून घेतो. ( मागून घेत असे असेंहि या पंडिताने म्हटले नसून घेतो म्हणजे 'आज घेतों' असा वर्तमानकाळीं चक्क प्रयोग आहे !) आणि कर्ज फिटेपर्यंत तिचा उपभोग घेतो. कर्ज फिटल्यानंतरहि काहीं काल ती धनकोजवळ राहिली तर कर्ज फिटल्यानंतर तिला जीं मुले होतील त्यापैकीं निर्मीं तो ऋणकोला देऊन टाकतो ! !"[१] या प्रकाडपंडिताला ही माहिती कोठून मिळाली हें सैतान जाणे ! अवघ्या दहा वर्षांपूर्वीं लिहिलेला हा ग्रंथ ! यावरून हिंदुस्थानविषयी पंडितामध्यें(?)हि केवढें अज्ञान आहे याची कल्पना येईल. असल्या बाष्कळ पंडिताकडे दुर्लक्ष केलेलेंच बरें !

सुदैवानें विद्येची एकनिष्ठपणें सेवा करणारे पंडितहि आढळतात.

---

१. Hindu Scoial Institutions. p. 146. by. Dr. Walawalkar.

अशाच्याहि मुखातून अज्ञानानें वा मिथ्याग्रहानें भारतीय संस्कृती-विषयीं जे विपरीत अभिप्राय प्रकट झाले आहेत त्याचा उल्लेख मागील अनेक प्रकरणात मीं केला आहे व त्याचा योग्य तो परामर्श घेण्यासहि कमी केलें नाहीं. पण अशा पंडिताशीं मतभेद होण्याचा प्रसंग आला तरी त्याच्या विद्येच्या निरलस एकनिष्ठ उपासनेबद्दल माझ्या मनात आदरच आहे हें येथें स्पष्ट सागून टाकतों. एक साधें उदाहरण म्हणून द्यावयाचें तर कोठे इंग्लंड, फ्रान्स आणि नॉर्वे हे देश आणि कोठें आपला महाराष्ट्र ! पण आपल्या महाराष्ट्रातील मराठी भाषेच्या व्याकरणाचा सूक्ष्म अभ्यास इंग्रज ग्रियरसन, फ्रेंच ज्युल् ब्लोक आणि नॉर्वेजियन स्टेन कोनो यानीं करावा, आपण केला नसेल इतक्या कसोशीनें करावा, या त्याच्या विद्येच्या लालसेचे कौतुक कोणाला वाटणार नाहीं ! किंबहुना आपल्या प्राचीन संस्कृतीचें जें ज्ञान आपणास आज हस्तगत झाले आहे ते उकरून काढण्यात आजवर तरी पाश्चात्य पडिताचाच घाम आमच्यापेक्षा अधिक गळाला आहे. पण कौतुक करीत असताहि त्याचे अपसिद्धान्त आपण पाखडून पारखूनच घेतले पाहिजेत. तसे ते पारखून घेण्याची चिकित्सक विवेचक बुद्धि जागृत झाली म्हणजे आपली पूर्वपरपरा काय आहे, आज आपण प्रगतीच्या मार्गावर नक्की कोठें आहों व आपल्यापुढें गेलेल्याच्यापासून आपणास काय घ्यावयास हवें या सर्वांचा उमज पडेल.

## दोषपरिमार्जन

या दृष्टीनें पाहू गेलें तर असे दिसून येईल कीं, आज आपण पाश्चात्याच्या पाठीमागें पडलों आहों ते मुख्यतः भौतिक शास्त्राच्या हेळसांडीमुळें व समाजघटनेंतील दुर्बलतेमुळे. ज्याचें शास्त्र त्याचें शस्त्र असा आजच्या युगाचा दंडक आहे; तेव्हा या शास्त्राकडे दुर्लक्ष करून कोणत्याहि राष्ट्राला जीवनकलहात टिकाव धरता येणार नाहीं. शिवाय या शास्त्राच्या उपासनेनें नुसतें शस्त्रसंभाराचेंच सामर्थ्य वाढतें असें नव्हे तर आत्मप्रत्ययाचेंहि बल वाढतें, बुद्धि अधिक धीट, निर्भीड व आत्मविश्वासपूर्ण होते, जीविताकडे ती निर्भयपणें पाहूं लागते व जीवितातील अडचणींचा परिहार करण्याची

चमक तिच्यात उत्पन्न होते. शास्त्रीय शोधांनीं उपलब्ध करून दिलेल्या सामर्थ्यांचा योग्य विनियोग माणसाला जर पुढेंमागें करता आला तर आजच्या जगाचें रूप नितान्त पालटून जाईल तें कसें त्याचा प्रपच करण्याचें हें स्थल नव्हे.[1] पण आज या सामर्थ्यांचा पाश्चिमात्य राष्ट्रें दुरुपयोग करीत आहेत या देखाव्यानें भाबावून न जाता, व यंत्रशक्ति व भौतिक विद्या याच्या नावानें करंटेपणाने बोटें मोडीत न बसता या नवोदित सामर्थ्यांच्या जोरावरच मानवी संसाराला नवीन रमणीय घाट देता येईल ही खूणगाठ मनाशीं बांधून त्या भौतिक विज्ञानाची उपासना करण्याचा वसा आपण जितक्या लवकर घेऊं तितका उत्तम.

भौतिकशास्त्राच्या उपासनेबरोबरच या उपासनेमुळें लाभणारे जें सामर्थ्य तें मूठभर लटपट्ये लोकांनीं बळकावून बसूं नये यास्तव सामर्थ्यांचे केंद्र जें राजकीय सत्ता व औद्योगिक सत्ता हीं सर्व जनतेत विभागलीं जातील अशा साम्यनिष्ठ समाजरचनेचा पुरस्कार केला पाहिजे. आणि ऐहिक संसार हा ओंट घटकेचा असला तरी परलोकाकडे डोळे लावून बसून या लोकींचा संसार कसा तरी संपवून टाकण्याची विरक्त वृत्ति टाकून देऊन "अवघाचि संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन तिही लोक" ही आशावादी उत्साही वृत्ति स्वीकारली पाहिजे.

## परंपराभंगाची भीति

तुमच्यापैकीं काहींना येथें अशी शंका येईल कीं, हे प्रकार आपल्या पूर्वपरंपरेशीं विसंगत तर नाहींत ना ! आपल्या समाजाची वृत्ति ही मूळपासूनच निवृत्तिपर आहे; आणि भौतिक शास्त्राच्या उपासनेनें सुखाचीं साधनें वाढविण्याऐवजीं मनोजय संपादून वासनाक्षय करणे हा अधिक श्रेष्ठ मार्ग होय असें आपण आजवर मानीत आलों आहों. शिवाय जन्मजात जातिभेदाची कल्पना आमच्या हाडींमासीं खिळली असल्यानें, राजकारणात काय किंवा समाजव्यवस्थेंत काय लोकशाहीचें किंवा समतेचें तत्त्व आपणास मानवलेलें नाहीं. असा सर्व प्रकार असताना पाश्चात्य संस्कृतीच्या दिखाऊ वैभवानें दिपून जाऊन आपल्या पूर्वपरंपरेशीं विसंगत

१. त्याच्या दिग्दर्शनाकरितां 'बादळी वारे' लेखांक पहिला पाहा.

असे नवे प्रकार सुरू करणें हे अंतीं आत्मघातकीपणाचे तर होणार नाहीं ना? अशा प्रकारची शंका काही काहीं मनोवृत्तींना प्रामाणिकपणे डाचत असते. पण ती निराधार असते हें दाखविण्याकरिताच आपल्या प्राचीन इतिहासातील आपली ऐश्वर्योपासना, आपला विश्वसंचार, आपली लोकशाही याचे दिग्दर्शन मागील काहीं प्रकरणातून केले आहे. आपली ही प्राचीन परंपरा सातव्या आठव्या शतकात हीनप्रभ होऊं लागली. त्यापूर्वीची वैदिक परंपरा जिला म्हणता येईल ती तशी नव्हती. उत्तरकालीं मात्र असा विपरीत प्रकार झाला कीं, वैदिकानीं वेदबाह्याना जिंकले तरी अंतीं जित आर्येतराचा नैराश्यवाद व निवृत्तिपरता ह्यानीं वैदिक जयिष्णु, आनंदी उत्साही वृत्तीला ग्रासून टाकले. या ग्रस्त स्थितींत आज सुमारें हजार-बाराशेंवर वर्षे आपण गुरफटलो आहोंत. मध्यंतरीं पाश्चात्य राष्ट्रानीं विद्येच्या प्रातात कल्पनातीत दौड मारली आहे. इतकी कीं, मागें 'भारतीयाची ऐश्वर्योपासना' या प्रकरणात भारतीयाच्या अनेक शास्त्रातील बुद्धिवैभवाचे व प्रगतीचे जें वर्णन केले आहे तें तत्कालीन जगात अभिमानास्पद वाटण्यासारखें असले व बुद्धिवैभवाचें देणे फक्त ईश्वराच्या लाडक्या युरोपलाच मिळालेले आहे असे मानणाऱ्या उर्मट पाश्चात्याच्या नाकावर टिचण्यास उपयोगी पडण्यासारखें असलें तरी त्या काळच्यापेक्षा आजची पाश्चात्याची विद्या कल्पनेबाहेर वृद्धिंगत झाली आहे हें ध्यानीं घेतले पाहिजे. तें नीट ध्यानीं घेतलें म्हणजे पूर्वपरंपरेचा योग्य अभिमान तर जागृत राहीलच पण त्या अभिमानात गुरफटून जाऊन आपण आलस्यात घोरत पडणार नाहीं.

## यंत्रशक्तीचें अटळ आगमन

आलस्य झाडून टाकण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. अथवा आमच्या आलस्यनिद्रेतून आम्ही खडबडून जागें व्हावें येवढी जोराचीच थप्पड इंलंडनें आमचें स्वातंत्र्यसर्वस्व हरण करून दिलेली आहे! कोणत्याहि पद्धतीनें का होईना पण जागृति आणणारी अशी ही क्रिया असल्यानेंच रानडे, लोकहितवादी वगैरेंनीं दैवी योजना म्हणून तिचें स्वागत केलें.

पण ही जागृति उत्पन्न होण्यास इंग्रजाच्या राजकीय आक्रमणाचीच आवश्यकता होती काय ? समजा, इंग्रजाचे पाय आपल्या या मायभूमी-कडे वळलेच नसते तर आज आपण कोणत्या स्थितींत असतों ? भौतिक शास्त्रातील शोधानीं निर्माण केलेल्या सुखसोयींपासून आपण अलिप्त राहूं शकलों असतों काय ? युरोपमध्यें मोटारी आणि विमानें घरघर फिरूं लागलीं असता आम्ही आमचीं भिमथडी तट्टेंच दामटीत बसलों असतों ! तेथें बिजली चमचमूं लागली असताहि आम्ही आमचे जुनेपुराणे हिला-लच नाचवीत बसलो असतो ! तेथे वाफेचे माग धडाडूं लागले तरी आम्हीं नखाच्या भोकातूनच सूत कातीत बसलों असतों ? तेथें यंत्रावर एका दिवसात सतराशेसाठ ग्रंथ छापले जात असता आम्ही एका पोथीची नक्कल करण्यात सतराशेसाठ दिवस मान मोडून घेत बसलों असतों ! अथवा तेथें मिनिटास असंख्य गोळ्या फेकणाऱ्या बदुका निर्माण होत असता आम्ही आमच्या मावळ्याचे विळे-कोयते घासीत बसलो असतों काय ? केव्हाहि नाहीं. राजकीय आक्रमण होवो वा न होवो, पाश्चात्यांनीं शास्त्रसामर्थ्यानें सिद्ध केलेल्या सर्व उपयुक्त व संहारक चिजा आम्हाला त्याच्यापासून घेणे प्राप्त होतें. स्वतः तयार करिता येत नसल्याने मागतील ती जबर किंमत देऊन विकत घेणें प्राप्त होतें, नव्हे आम्ही घेऊं लागलोंच होतो. बंदुकीचें महत्त्व शिवाजीच्या वेळेपासून कळून चुकलें होतें. पण ती बनविण्याची विद्या देशात नसल्यानें फिरंग्यापासून त्या आर्जवून विकत घ्याव्या लागत. आणि तेहि मग गिऱ्हाइकाचें अगतिकत्व ओळखून जुन्या बंदुकाहि नव्याच्या वरभावानें विकीत. घड्याळें आणि दुर्बिणी याहि चिजा अमोलिक आहेत हें पटलें होतें व आंग्र्यानीं एखादें फिरंगी जहाज लुटून असल्या चिजा हस्तगत केल्या म्हणजे त्या आंग्र्यापासून आपणास मिळाव्या म्हणून मातबर सरदार आंग्र्याची अजीजी करीत होते. आम्हीं फिरंग्याचें औषध घेऊं लागलों होतों. त्यानीं दिलेला चहा मोठा फर्मास म्हणून रुप्याच्या चहादाणींतून पिऊं लागलों होतों. साराश, राजकीय आक्रमण झालें नसतें अशी कल्पना केली तरी व्यापारी आक्रमण अपरि-हार्यच होतें. अर्थात् पाश्चात्यांकडून यंत्रें इकडे आल्याशिवाय राहिलीं

नसती आणि यंत्रांबरोबर यंत्राशीं संलग्न असणारी सर्व परिस्थिति येथे निर्माण झाल्याविना राहिली नसती.

पण कोणी म्हणेल परकीय मालावर कडक बहिष्कार घातला असता तर ! तरीहि परिस्थिति बदलली नसती. बहिष्काराची प्रतिक्रिया म्हणून राजकीय आक्रमण ठेवलेलेंच होतें ! कारण हे पाश्चात्य व्यापारी नुसते व्यापारी नसून त्यांच्या पाठीशीं शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज अशी बलवत्तर लष्करी सत्ता होती. त्या सत्तेच्या जोरावर त्यांनीं आपला माल आमच्या माथीं मारलाच असता. या शस्त्रास्त्रा-पुढें आमचा टिकाव लागणें दुर्घटच नव्हे तर अशक्यच होते. याला दुसरा एकच पर्याय होता. तो म्हणजे व्यापारी आक्रमण सुरू झाल्यावर पाश्चात्याची विद्या पुढारलेली आहे हें ध्यानीं येताच तत्काळ ती विद्या हस्तगत करण्याच्या उद्योगास लागणें हा होय. हें आपल्या देशात घडलें नाहीं. याचीं कारणें आपण पाहिलीं. जपाननें हेंच केलें म्हणून तो आक्र-मणाला बळी पडला नाहीं.

जपानच्या उदाहरणावरून आणखीही दोन महत्त्वाच्या गोष्टी नीट पटतील. त्या ह्या कीं, पाश्चात्याची विद्या किंवा त्याच्या संस्था पौर्वात्य देशात रुजणार नाहींत, व रुजावयाच्या तर त्याला दीर्घकाल लागेल, ह्या कल्पनाहि सर्वस्वीं भ्रामक होत. पाश्चात्याची विद्या पौर्वात्यात उत्तम रुजूं शकते हें जपाननें सिद्धच केलें आहे. पाश्चात्य राष्ट्रात भौतिक शास्त्राची उपासना आणि लोकशाहीचे प्रयोग आज दोन तीन शतकें चालू आहेत. तेव्हा त्याच्या खाद्याशीं खादा भिडवून उभें राहण्यास आपणासहि असा दीर्घ काल लागावा हा केवळ भ्रम होय. तसेंच नवीन शोध लावण्याला जी दीर्घ तपश्चर्या लागते तशी ती उपलब्ध झालेले शोध आत्मसात् करण्याला लागत नाहीं. अवघ्या पन्नास पाऊणशें वर्षांत पाश्चात्याच्या तोडीचा माल पाश्चात्याच्या पेठेंत मांडून जपाननें हें प्रत्यक्ष सिद्धच करून दाखविलें आहे. तीच गोष्ट लोकशाही संस्थाची. चाळीस वर्षांपूर्वीं हिंदुस्थानच्या राजकारणात लोकशाहीची अगदीं अत्यल्प क्षुद्र अशी सुरवात झाली. तेव्हा काहींना वाटलें कीं, येवढीच मात्रा पचण्यास आपणास चारपाच पिढ्या लागतील. पण हा त्याचा भ्रम होता हें आता सांगावयास नकोच.

## धर्मभावनेस धक्का

आणखी एक शंका पुढें येऊन म्हणेल कीं, या नव्या विद्येनें आमची धर्मभावना तर उत्सन्न होणार नाहीं ना ? तसें असेल तर तिला दुरूनच नमस्कार केलेला बरा नाहीं का ? या बाबतींत पहिली गोष्ट अशी कीं, तिला दूर ठेवणें तुमच्या हातींच आता राहिलेली नाहीं. कायमचे दास्यात राहूं पण परकीयाच्या विद्या स्वीकारणार नाहीं असेंच म्हणावयाचें असेल तर गोष्ट निराळी. एरवीं पाश्चात्याची विद्या हस्तगत केल्याविना जीवन-कलहात टिकाव लागणार नाहीं हें निश्चित. शका पुन्हा म्हणेल, आमचें राज्य गेलें तरी चालेल, आमचें स्वातंत्र्य गेलें तरी चालेल, पण आम्ही आमचा धर्म व आमची संस्कृति हीं टिकवून धरूं. तर हाहि सर्वस्वीं भ्रम होय. आक्रमणशील सस्कृतीपुढे दुबळी फुरंगटलेल्या वृत्तीची सस्कृति टिकाव धरूं शकत नाहीं. राजकीय स्वातंत्र्य हें सस्कृतीचें संरक्षक कवच होय असें मीं मागें म्हटलें आहे तें याच हेतूनें नुसती भाषेची गोष्ट घेत-लीत तर मुसलमानी आक्रमणामुळें मराठी भाषेवर केवढा परिणाम झाला तें ध्यानीं घ्या. घरींदारीं इतके इस्लामी शब्द घुसले आहेत कीं 'जमीन', 'हवा' असल्या शब्दाची दाढी धरून मुद्दाम ते दाखवावेत तेव्हा परकी म्हणून ओळखले तर ओळखतात. आज घुसले यापेक्षां किती तरी अधिक घुसले असते पण त्याना पायबंद बसला तो संतवाङ्मयानें आणि शिवाजी-च्या राजकीय वर्चस्वानें व त्याच्या राजव्यवहारकोशानें. शिवाजीचें हें धोरण वाढत्या राज्यविस्ताराबरोबर टिकलें नाहीं तरी वाङ्मयसेवकाची दृष्टि निवळली व संस्कृत शब्द योजण्याचा प्रघात वाढूं लागला. म्हणूनच भाषा अविंधमय होण्याची टळली. जी गोष्ट भाषेची तीच धर्माची. राजसत्ता पाठीशीं उभी असल्याशिवाय धर्मालाहि अवसान चढत नाहीं. विश्वामित्राचे यज्ञ निर्विघ्न पार पडेनात तेव्हा विश्वामित्राला धनुर्धारी रामचद्राचें साहाय्य घ्यावें लागलें हा प्राचीन दाखला विसरून कसें चालेल ? अर्वाचीन काळींही जेथें इस्लामी आक्रमण दीर्घकाल नादलें तेथील म्हणजे पंजाब प्रातातील हिंदूंना जुन्या धर्माला मुरड घालून शीखपंथासारखा पंथ काढणें अपरिहार्य वाटलें. तेव्हा धर्मरक्षणाकरिताहि राजकीय स्वातंत्र्य हें अवश्य होय

हें विसरता कामा नये. 'बुडाला औरंग्या पापी' व 'उदंड जाहलें पाणी स्नानसंध्या करावया' असे उद्गार समर्थांच्या मुखातून निघाले त्यातहि राजकीय सामर्थ्याच्या माहात्म्याचाच प्रतिध्वनि उमटलेला आहे. तात्पर्य, राजकीय स्वातंत्र्य हीच काहीं संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाची निशाणी नव्हे, भौतिक शास्त्राच्या बाबतींत आम्ही प्रगति केली नाहीं तेच उत्तम केले असल्या अपरिपक्व कल्पना उगाळण्याचें सोडून दिलें पाहिजे व चालू युगातील भौतिक शास्त्राची प्रभावी विद्या व त्या विद्येनें साध्य होणारीं सुखसाधने सर्वांच्या पदरात पडतील अशी समाजव्यवस्था याचे स्वागत केले पाहिजे.

भौतिक शास्त्रे हीं धार्मिक प्रवृत्तीला विघातक आहेत हेहि धर्म याचा अर्थ समाजधारणापोषक नैतिक आचारविचार येवढाच घेतला तर खरें नाहीं हा मुद्दा इंग्रजी अमल सुरू झाल्यानंतरच्या पहिल्या पिढींतील जाणत्यानींहि ओळखला होता. त्याचा दाखला म्हणून मराठी भाषेचे अर्वाचीन पद्धतींतील आद्य व्याकरणकार दादोबा तर्खडकर याचा देता येईल. त्यांनीं आपलें आत्मचरित्र अर्धेमुर्धे लिहून ठेवलेलें प्रसिद्ध झालें आहे. त्यात त्यानीं स्वतः इंग्रजी शिकून नावलौकिक मिळविला याबद्दल त्याच्यावर लोभ करणारे त्याचे गुरुजी बापूशास्त्री शुक्ल यानीं काय उद्गार काढले व त्याला त्यानीं काय उत्तर दिलें हें वर्णिलें आहे. दादोबा लिहितात : "एकदा सुमारें पंचवीस वर्षांवर या शास्त्रीबोवाची माझी सुरतेंत गाठ पडली. तेव्हा ते मला म्हणाले, 'दाद्या, तुझें केलेलें व्याकरण मीं पाहिले आणि मला फार संतोष झाला. तसे तुझे दुसरे गुण व विद्वत्तेचा स्तव ऐकून मला फार संतोष होतो. परंतु गड्या, तूं नास्तिक झालास रे! तुझी आपल्या धर्मावर निष्ठा नाहीं हें ऐकून मी दिलगीर आहें.' म्या नम्रतेनें म्हटलें, 'धर्माविषयीं जो आपण मला ठपका दिलात तो जर धर्माचा यथायोग्य अर्थ समजून दिला असलात तर तो मला लागत नाहीं.' मग त्याजवर शास्त्रीबोवा काहींच फारसे बोलले नाहींत आणि आपल्या गुरूबरोबर वाद करावा हेंहि मला अगदीं आवडलें नाहीं." दादोबांचें हेंच समंजस धोरण डोळ्यापुढें ठेवून पूर्वसंस्कारामुळें नव्या जमान्याकडे ज्याना निर्विकार-

बुद्धीनें पाहता येत नाहीं त्याच्याशीं वाद घालीत न बसता नव्या विद्येचें व नव्या समाजव्यवस्थेचें स्वागत करणे हें आपले कर्तव्य होय.

भौतिक शास्त्राच्या अध्ययनाने चिकित्सकवृत्ति बळावेल याचीही काहींना धास्ती वाटते. त्याच्या मतें चिकित्सक वृत्तीसारखें अनर्थकारक दुसरें काहीं नाहीं. नवयुगधर्मकार लिहितात, "इंग्रजाच्या संसर्गानें कित्येक घाणेरडे रोग इकडे आले आहेत, त्याचप्रमाणें **संशोधन आणि चिकित्सा हे पंडुरोगासारखे दोन रोगच आमच्या सुशिक्षितांच्या मागें लागले आहेत.**" पाश्चात्य संस्कृतीकडे घाणेरड्या रोगाकडे पाहावे तशा उद्वेगकारक दृष्टीनें पाहणाऱ्या असल्या चिडखोर वृत्तीची कोण कशी समजूत काढूं शकेल ? येवढेंच लिहितों कीं चिकित्सक वृत्ति हा रोग असेल तर या रोगानें इंग्रजी झाल्यापासूनचे टिळक, भाडारकर, राजवाडे प्रभृति आपले सर्वच पुढारी आणि पंडित या रोगाने नासले आहेत असे आपणास म्हणावें लागेल. हे म्हणण्यास तुम्ही धजाल असें वाटत नसल्यानें अधिक लिहीत नाहीं.[1] चिकित्सक दृष्टीवर मुद्दाम झापड ओढून शास्त्रीय ज्ञानाने सिद्ध झालेल्या गोष्टीही आपण नाकारण्यास तयार आहात काय ? निस्सीम पुराणमतवादी त्या नाकारण्यास कसा तयार असतो हें पाहावयाचें असल्यास रघुनाथ भास्कर गोडबोले याचा 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' पाहा. कोशकार प्रस्तावनेंत लिहितात कीं, 'या ग्रंथात व युरोपियन लोकाच्या ग्रंथात फेर इतकाच आहे कीं ते लोक अनुमानानें पृथ्वी सूर्यापेक्षा लहान आहे व सूर्याभोंवतीं फिरते असें मानतात तर आम्ही शास्त्राधारानें पृथ्वी अतिशय मोठी व स्थिर समजतों.' पुढें सूर्यासंबंधीं लिहिताना ते सागतात कीं, 'पृथ्वी फिरणारी व सूर्य स्थिर असें कधींही म्हणूं नये. कारण ऋषींव्यतिरिक्त इतरास चिंतन करण्यास अशक्य ज्या गोष्टी त्या त्यानीं तर्केंकरून कधींही साधावयास जाऊं नयेत." या कोशाचे परीक्षण करताना विष्णुशास्त्री चिपळूणकर लिहितात कीं 'कोणत्याही तऱ्हेचीं भ्रामक मतें दुराग्रहास वर्धक होतात. त्याचे निरसन करणें हें देशहितेच्छूचें कर्तव्य होय हें

---

१. अधिक चिकित्सेकरितां 'बादळी वारे' लेख ६ पाहा.

जाणूनच कोशकाराच्या आग्रहमूलक अभिप्रायाचें आम्ही खंडन केलें आहे.[१] तात्पर्य, चिपळूणकर सागतात कीं कोणतीही नवी गोष्ट स्वीकारावयाची झाली कीं जुनी परंपरा ढासळेल म्हणून बुजणारी वृत्ति सोडून दिली पाहिजे. खुद्द आपल्या पूर्वजानीं ही वृत्ति स्वीकारली असती तर अनेक शास्त्रकलात त्यानीं जें प्रावीण्य संपादन केलें तें त्याना केव्हांच साध्य झालें नसतें. नव्याच्याच नव्हे तर परक्याच्याही गुणाचें स्वागत करण्यास कचरण्याचे कारण नाहीं. फक्त आपल्या गुणाचाही योग्य अभिमान डोळ्याआड येऊं दिला नाहीं म्हणजे झालें. टिळकाची अशीच वृत्ति होती. प्राचीन गर्गाचार्य हा विद्वान् म्लेच्छाना ऋषितुल्य मानी तीच परंपरा चालवून टिळक, हरबर्ट स्पेन्सरविषयीं लिहितात कीं, 'स्पेन्सरसारखे ज्ञानी पुरुष फारच विरळा. शेंकडों वर्षांत एखाददुसरा उत्पन्न होत असतो. खिस्ती मिशनऱ्याच्या कोत्या समजुतींप्रमाणें जरी हे नास्तिक ठरले तरी भगवद्गीतेत म्हटल्याप्रमाणें ज्ञानी हेच अखेर ईश्वरास प्रिय होतात.[२] इतक्या निःसंदिग्ध शब्दांनीं स्पेन्सरचें गुणग्रहण टिळक प्राजळपणे करतात. पण गुणग्रहणप्रसंगींही स्वाभिमानाचा विसर त्याना पडलेला नाहीं. स्पेन्सरच्या अज्ञेयमीमासा ग्रंथाच्या परीक्षणात्मक लेखात टिळक लिहितात, "स्पेन्सरसाहेबानीं या अज्ञेयवादास जें स्वरूप आणले आहे त्यापेक्षाही परिणत स्वरूप आमच्या ग्रंथातून या तत्त्वास प्राप्त झालें आहे. अशी स्थिति असता स्पेन्सरच्या आधारावर आम्हास उपदेश करूं पाहणें म्हणजे घरचें सोनें विसरून लोकाच्या रुप्याकरिता भाव घेण्यासारखें आहे. यावरून स्पेन्सरची योग्यता आम्ही कमी मानतों असें कोणींही समजूं नये. हे आधुनिक काळचे ऋषिवर्य आम्हासही पूज्य व वंद्य आहेत. पण त्यामुळें आम्ही आमच्या ऋषिवर्यांस विसरून स्पेन्सरचेच पोवाडे गात बसावें हें आम्हास बरें वाटत नाहीं."[३] टिळकांच्या या उद्गारांत नव्या-जुन्याची

---

१. निबंधमाला अंक ८२.

२. केसरींतील लेख भाग ४ था. पृ. ३६७.

३. केसरींतील लेख भाग ४ था. पृ. २३९–४०.

सागड घालण्याचें सूत्र उत्तम रीतीनें मांडलें गेलें आहे. आणि आधुनिक शास्त्रीय संस्कृतीची गाठ पडल्यापासून गेल्या शेसवाशें वर्षांत होऊन गेलेले आपले सर्व थोर पुढारी ह्याच धोरणाचा पुरस्कार करीत आलेले आहेत. नवे ज्ञान घेत असताना त्या त्या क्षेत्रात पूर्वी आपण केलेल्या प्रगतीचा अभिमान जागता ठेवण्याची विस्मृति होऊं देता उपयोगी नाहीं हें मुख्य धोरण. ज्ञानाचीं नवीं नवीं क्षेत्रें हस्तगत करण्यातही कचरून उपयोगी नाहीं कारण शिक्षणातील अभ्यासक्रमात पूर्वीसारखें व्याकरण, काव्य, वेदान्त व हिशेब येवढ्याचाच समावेश करून आता भागेल काय? मुळींच नाहीं. इतिहास, भूगोल, समाजशास्त्र, कायदा, रसायनादि शास्त्रें या सर्वांचा समावेश अभ्यासक्रमात अवश्य आहे. तो केल्यानें आपली परंपरा सोडल्यासारखें होत नाहीं. फक्त हे सर्व विषय शिकवीत असतां त्या त्या विषयात आपल्या पूर्वजानीं केलेल्या प्रगतीचा अभिमानपूर्वक उल्लेख अवश्य केला पाहिजे. आज तो होत नसला तर आपल्या काहींसा असहायतेचा व काहींसा अज्ञानाचा तो परिणाम होय. तें अज्ञान नाहींसे व्हावें म्हणूनच आपल्या संस्कृतींतील उपेक्षित भागाकडे पूर्वीच्या प्रकरणा-तून लक्ष वेधलें आहे.

## संगमाचा प्रारंभ

शास्त्रीय संस्कृतींतून आपण छापखाने घेतले, वर्तमानपत्रें घेतलीं, वाङ्मयामध्यें धर्म व अध्यात्म यावर भर होता तो सोडून हरएक लौकिक-विषयाचें आविष्करण–विवेचन–प्रतिपादन सुरू केलें. यातही काहीं आपण चूक केली असें मानण्याचे कारण नाहीं. निष्कारण अनुकरण म्हणून पर-क्याची नक्कल करणें तेवढें सोडलें पाहिजे. भौतिक शास्त्राच्या वाढीबरोबर बळावत जाणारा वाङ्मयातील वास्तववाद स्वीकारण्यात हानि नाहीं, पण जे सामाजिक प्रश्न आपणांत अद्याप उत्पन्न झाले नाहीत त्या प्रश्नांची पाश्चात्य वाङ्मयातून आपल्या वाङ्मयांत उसनी नक्कल करणें हें मात्र विकृत ठरेल. वाङ्मयाप्रमाणें कलेच्या प्रांतात– गायन, चित्र, मूर्ति, वास्तु या कलात– पाश्चात्याच्यापासून कांहीं थोडे प्रकार उचलण्यास हरकत नाहीं. मात्र या सर्व प्रांतांत आपलें पूर्वीचें जुनें श्रेष्ठ ठेवणें अवश्य जतन केलें

पाहिजे. गायनकलेमध्यें आयतें बैठकीचें रागदारी गाणें कायम ठेवून सामुदायिक साथिक गायनात पाश्चात्याचा स्वेरमेलाची पद्धति स्वीकारण्यासारखी आहे. चित्रकलेंत पाश्चात्याची छायाप्रकाश पद्धति व दृक्प्रमाण पद्धतीचा स्वीकार केला तरी आपली उठावदार रेखापद्धति, अनेक व्यक्तींच्या मेळ्यात प्रमुख व्यक्ति ही दीर्घप्रमाण व इतर अल्पप्रमाण रेखाटणे, व चित्राचे भाग कल्पून जवळचे लांबचे देखावे दाखविणें ह्या गोष्टींचा त्याग करण्याचें कारण नाहीं. मूर्ति व कोरीव कलाकुसर यात गज, सिंह, कमल वगैरे प्रतीकाची पूर्वपरंपरा राखली पाहिजे. तसेंच मूर्ति व चित्र यामध्ये शरीरसौष्ठवापेक्षा चेहऱ्यावरील भावनिदर्शन याला आपल्या कलावंतांनी दिलेलें महत्व रास्त असेंच होतें. फक्त शरीरसौष्ठवात आपल्या कलेंत जो एक सांकेतिकपणा— कानापर्यंत लांब रेखाटलेले डोळे वगैरे— रूढ झाला होता त्याऐवजीं वास्तविकतेचा स्वीकार केला म्हणजे झालें. वरीलसारख्या गोष्टी स्वीकारल्यानें आपली परंपरा नष्ट न होता ती अधिक पुष्ट मात्र होईल.

आहार, विहार, पोषाख, सणवार, संस्कार या बाबतींत चालू परंपरेंत फारसा बदल करण्याचें कारणच नाहीं; किंबहुना, असल्या बाबींतच संस्कृति गुरफटली गेली आहे अशी सामान्य जनाची समजूत असल्यानें त्या बाबतींत पूर्वपरंपरेला न डिवचणेंच शहाणपणाचें होईल. मासांहाराइतकेंच बलसंवर्धन शाकाहारानें होत असेल तर पूर्वपरंपरेस अनुसरून शाकाहाराचा पुरस्कार करणेंच योग्य ठरेल. दसरा-दिवाळीसारखे सणाचे दिवस, उपवासाचे दिवस, पौर्णिमा-अमावस्या याच्यासारखे अनध्यायाचे दिवस, हे बदलण्याचा प्रसंगच प्राप्त होत नाहीं. आज पौर्णिमेऐवजीं रविवारीं शाळा-कचेऱ्यांना सुट्टी दिली जात असेल तर तो परकीय आक्रमणाचा परिणाम होय. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या गोष्टी अशाच चालू ठेवण्याचें अगत्य नाहीं. पोषाखाच्या बाबतींत यंत्राशीं काम असतां पोशाख सुटसुटीत पाहिजे येवढी गोष्ट संभाळली असता आपल्या हवामानाला अनुकूल असा रूढ पेहराव सोडण्याचें कारण नाहीं.

वरीलपेक्षांहि ज्या क्षेत्रात अधिक खळखळ वाटेल ते क्षेत्र म्हणजे समाजरचनाक्षेत्र होय. पण विचारान्तीं ती खळखळ निरर्थक वाटल्यावाचून

राहणार नाहीं. आपल्या समाजरचनेचे वर्णाश्रमधर्मप्रधान असें वर्णन रूढ आहे. पैकीं आश्रम संस्था जी बहुतांशीं नष्ट झाली आहे तिचा तर पुनरुद्धारच केला पाहिजे. आणि वर्णसंस्था ही गुणकर्मविभागाने कोणत्याही कालीं अवश्य अशीच आहे. म्हणजे समृद्ध अशा कोणत्याही राष्ट्रामध्ये ज्ञानोपासक, धाडसी, व्यवहारचतुर व कष्टाळू असे चारी वर्ग कार्यक्षम असणें अत्यावश्यक आहे. पण जन्मजात जातिभेदाशीं वर्णविभागाची घातलेली सांगड फोडली पाहिजे. पण ती फोडण्यातही पूर्वपरंपरा झुगारली देण्याचा प्रश्न नसून त्या परंपरेचा विकास करण्याचा प्रयत्न आहे. समतेचा पुरस्कार हा आपण नव्यानेंच आज करीत नाहीं आहोत. भागवतधर्मानें तो यापूर्वीच केलेला आहे. स्त्रिया, वैश्य, शूद्र ह्या सर्वांनाच परागति मिळेल असा घोष करून भागवतधर्मानें समतेचा पुरस्कार आणि चोखामेळयाला संतश्रेष्ठ मानून वारकरीपंथानें अस्पृश्यतानाशाचा पुरस्कार आध्यात्मिक क्षेत्रात आधींच केला आहे. आध्यात्मिक क्षेत्रात या समतेचा पुरस्कार करण्यासही पुरस्कर्त्यांना त्या त्या काळच्या सनातनी वृत्तीशीं झगडावेंच लागले व तो झगडा त्यानीं यशस्वीपणें जिंकला. अध्यात्माच्या क्षेत्राप्रमाणें व्यावहारिक क्षेत्रात समतेचा पुरस्कार करण्यापर्यंत ते मजल नेऊं शकले नाहींत. पण यंत्रशक्तिमूलक कष्टनिवारण आणि समृद्धि यामुळें आजचा काल अधिक अनुकूल असल्याने समतेचा व्यावहारिक क्षेत्रताही पुरस्कार करण्यात वारकरीपंथाची पताकाच आपण पुढें नेत आहोंत असेंच होत नाहीं का! आणि ती पुढें नेणे आवश्यक आहे. कारण सर्वांना समान संधि या रूपानें समतेचा स्वीकार हा यंत्रयुगाच्या दुष्परिणामावरील उतारा होय. यात्रिक औद्योगीकरण स्वीकारले म्हणजे आपल्या संस्कृतीतील समाधान, शांति नष्ट होतील अशा शंकेची धास्ती घेण्याचेंही यामुळें कारण उरणार नाहीं. विद्युत्शक्तीचा विपुल प्रसार झाल्यास घरगुती धंदे शक्य होऊन शहरातील रोगट व स्वैर जीवनही अनावश्यक ठरेल, व असें झालें असता यांत्रिक औद्योगीकरणामुळें आपली परंपरागत समाजरचना उत्सन्न होईल ही भीति निराधार ठरेल.

तात्पर्य, अशा रीतीनें पूर्वग्रह सोडून विचार केला असता युगधर्म ओळखून नवीन शास्त्रीय संस्कृतींतून अवश्य त्या गोष्टींचें जलग्रहण

केल्यानें आपली संस्कृतिगंगा गढूळ तर होणार नाहींच पण तिचा स्थिर झालेला प्रवाह पुनःश्च जोरानें वाहूं लागून सहिष्णुता, संग्राहकता, अनाक्रमिकता, अहिंसा, विद्योपासना वगैरेंचें अमृतजल सर्व जगास पाजून विश्व सुस्नात करण्याचें श्रेय तिला मिळवितां येईल.

हें लिहीत असताना नव्या विद्येचा दुरुपयोग केला असता काय अनर्थ ओढवूं शकतो याची जाणीव क्षणार्धात लाखाचा संहार करू शकणाऱ्या परमाणुस्फोटकानें ताजी केली जात आहे. पण नव्या ज्ञानाचा सदुपयोग करण्याचा धडा जगताला आपण घालून देऊं अशी उमेद आपण का धरूं नये ? त्यात आपणास यश आलें तर आपलें व सगळ्या जगाचें कल्याण होणार आहे !

समाप्त

## परिशिष्ट

# संस्कृति-संगमाच्या परीक्षणांतील कांहीं मुद्यांची चर्चा

पुस्तकाचे एकंदर जें स्वागत झालें त्याबद्दल परिक्षणकाराचा व वाचकवर्गाचा मी ऋणी आहें. अनुकूल परीक्षणें स्वमतपोषक असल्यानें त्यासंबंधीं लिहिणें नको. तेव्हा प्रतिकूल परीक्षणासंबंधीं दोन शब्द लिहितों.

प्रतिकूल परीक्षणामध्यें सर्वांत विस्तृत परिक्षण आलें तें 'समाज-जीवन' या मासिकात आलेलें. या मासिकाच्या दुसऱ्या वर्षाच्या बाराव्या अंकापासून तिसऱ्या वर्षाच्या पाचव्या अंकापर्यंत हें परीक्षण क्रमशः आलेलें आहे.

या परीक्षणामध्यें लेखक श्री. गो. म. जोशी यानीं संस्कृति-संगम पुस्तकातील काहीं तपशिलाच्या चुका नजरेस आणल्या आहेत त्याबद्दल प्रथम त्याचे आभार मानतों. मुख्य विचारसरणी मात्र पसंत नसली तरी ती त्याना खोडून काढता आलेली नाहीं.

एकंदर पाच अंकापैकीं पहिले दोन अंक किरकोळ तपशिलाच्या चार पाच चुका दाखविण्यात खर्ची पडले आहेत. आणि यावरच त्याचा मुख्य भर दिसतो. तिसऱ्या लेखाच्या शेवटीं 'सर्वच ग्रंथ ताळतंत्र नसलेला म्हणून यापेक्षा जास्त शाई, कागद व वेळ याचा अपव्यय करण्याची इच्छा होत नाहीं' असा शेरा दिला आहे. पुढील लेखात ते लिहितात, " आम्ही हा शेवटचा लेख मागील लेखांकात कबूल केलें होते म्हणून निव्वळ लिहीत आहोंत." त्यांच्या दृष्टीनें परीक्षण लिहून लक्ष देण्याइतक्या किंमतीचें संस्कृति-संगम हें पुस्तक नव्हे. पण 'भारतसंरक्षक संघा'ची जबाबदारी त्याच्यावर असल्यानें भारताचें संरक्षण करण्याकरितां वेळेचा अपव्यय सोसण्यास ते तयार झालें आहेत.

पहिल्या दोन लेखांत त्यांनीं तपशिलाच्या काहीं चुका दाखविल्या आहेत. उदाहरणार्थ, साकेत म्हण अयोध्या पाहिजे तेथें मथुरा म्हटलें आहे. उषेचा अनिरुद्धाशीं विवाह झालेला असता प्रद्युम्नाशीं झाला असें

लिहिलें आहे. 'अष्टादशद्वीपनिखातयूपः' हें वर्णन कार्तवीर्याचें असता दशरथाच्या नावावर दिलें आहे. सत्राजित हा राजा नसता त्यास राजा म्हटलें आहे. मालविका नाटकातील छलित हा नृत्यप्रकार असता त्यास नाटक म्हटलें आहे. मुसलमानाना पराभूत करणाऱ्या राजाची जी जंत्री दिली आहे तींतील कांहीं माहिती चुकीची आहे.

अशा प्रकारच्या तपशीलाच्या चुका राहणें हा दोष होय, व त्याचें माप लेखकाच्या पदरात घालणे यात वावगें कांहीं नाहीं. पण अशा प्रकारच्या चुका जमेस धरल्या तर मूळ विवेचनात अथवा विचारसरणींत फेरबदल करावा लागतो कीं काय हा अधिक महत्त्वाचा प्रश्न असतो. तसा तो वरीलसारख्या चुकानीं करावा लागत नाहीं. उषा प्रद्युम्न-विवाहाचा उल्लेख आला आहे तो आर्य आणि असुर याच्या एकीकरणाच्या प्रसंगीं असुर हे देखणे होते हे दाखविण्याकरिता आला आहे. तेथें प्रद्युम्नाऐवजीं अनिरुद्ध हें नाव घालावयास लागल्यानें मुख्य विवेचननात कांहीं फरक करावा लागत नाहीं. उषेचा प्रद्युम्नाशीं विवाह झाला अशा विधानानें सासऱ्याचा आणि सुनेचा विवाह झाला अशा प्रकारची थट्टा करण्यास अवसर सापडतो व जोशी यानीं तिचा अवलंब केलाहि आहे. पण मिश्रविवाहाचा मुद्दा व असुर हे देखणे होते हा मुद्दा अढळ राहातो व जोशी यानीं तो खोडलेला नाही.

तसेंच 'यवनराजानें साकेत अथवा मथुरा या नगरीला वेढा दिला या उल्लेखावरून मथुरेला वेढा देण्याइतके यवन आत आले होते' असें वाक्य आहे. त्यात साकेताला मथुरा म्हटलें तेथे अयोध्या पाहिजे. पण ही दुरुस्ती केल्यानें यवन बरेच आत आले होते हे जें प्रमेय त्याला बाध येत नाहीं. तुम्ही म्हणाल कोठवर आले होते याला नाहीं का महत्त्व ! जोशी यानीं हा प्रश्न उपस्थित करून असें भासविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, वाटेल त्या नगराऐवजीं वाटेल तें नगर योजलें गेलें तर पेशावरापर्यंत आलेला शत्रु पुण्यापर्यंत आला किंवा काशीवर चाल करून आलेला आक्रमक दक्षिणेंतल्या कांचीपर्यंत चाल करून आला असलीं विधानेंहि खपून जातील ! विपर्यासाच्या भूमिकेवरून हीं उदाहरणें मोठीं चटकदार दिसतील आणि कोणास वाटेल कीं, मथुरा आणि अयोध्या

या दोहोंतील अंतर असेच प्रचंड असावे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, मथुरा आणि अयोध्या यामधील अंतर हें शेदीडशें मैलापेक्षा अधिक नाहीं. त्यातहि अयोध्या ही मथुरेच्या पूर्वेकडे आहे. म्हणजे पश्चिमेकडून चालून येणारा शत्रु मथुरेऐवजीं अयोध्येपर्यंत चालून गेला असें म्हटल्यानें पूर्वेकडे अधिक अंतरावर गेला असेच उलट होईल. तेव्हा शिकंदर सिंधु नदीवरूनच परत गेला तरी त्यामागून आलेले काहीं राजे पूर्वेस अयोध्येपर्यंत आले हा जो मुख्य मुद्दा त्या मुद्यास काहींच बाध येत नाहीं; उलट मथुरा या चुकीच्या नावाच्या ऐवजीं अयोध्या हें नाव घातल्यानें तो मुद्दा उलटा अधिक बळकटच होत आहे. शिवाय यवनराजा मथुरा आणि अयोध्या या दोन्ही स्थळीं गेला असा इतिहास असल्यानें जोशी याचें त्यावरील सर्वच विस्तृत भाष्य फोल होत आहे. "Menander occupied Mathura, invested Sakata and perhaps took Patilputra" (Oxford History p. 118.),

पूर्वी नाटकात स्त्रियाच्या भूमिका स्त्रियाच करीत असत असें मीं विधान केले व त्याला मालविकाग्निमित्रातील छलिताचा दाखला दिला. यावर छलित हे नाटक नसून तो एक नृत्याचा प्रकार होता हे जोशी यानीं दाखविले आहे ते रास्त आहे. पण स्त्रिया नाटकात काम करीत हें या छलितावरून ठरत नसले तथापि प्राचीन भारतात नाटकामध्यें स्त्रियाच्या भूमिका स्त्रिया घेत असत हे विधान काहीं जोशी यानीं खोडलेलें नाहीं. नाटकात स्त्रियानीं काम करण्याविषयीं भारताच्या नाटकशास्त्रात स्पष्ट उल्लेख आहे. नाटकात कोणत्या व्यक्तीला कोणतें काम द्यावें याची व्यवस्था सागत असता भरत लिहितो, 'साधारणपणें स्त्रिया या जात्याच कोमल असतात, त्याना ललितकलाची आवड असते व त्याचा आवाज मधुर असून रूपहि सुंदर असते. म्हणून त्याना योग्य अशी स्त्रियाची भूमिका स्त्रियासच द्यावी.' (नाट्यशास्त्र अ. ३५).

वरील प्रकारच्या तपशिलाच्या चुका जोशी यानीं दाखविल्या आहेत त्याचा विचार झाला. तो तपशील दुरुस्त करणें रास्त आहे. पण तो दुरुस्त करीत असतांना एकंदर विवेचन कोठेंहि फिरवावयास नको हें वाचकाच्या लक्षात येईल.

आता निरनिराळया प्रकरणामध्यें जी विचारसरणी माडली आहे तिच्या-संबंधीं जोशी याचें म्हणणें काय आहे तें प्रकरणशः पाहूं या.

संस्कृतिसंगमाच्या दुसऱ्या प्रकरणात पाश्चात्यानीं भारतीय सस्कृतीवर जे अवास्तव व निरर्गल आरोप केले आहेत त्याचें दिग्दर्शन व परीक्षण केलें आहे. त्यांत संस्कृत वाङ्मयाची सरसकट अवहेलना करणाऱ्या मेकॉलेला उर्मट म्हटलें आहे. त्यावर जोशी लिहितात कीं– " परतु आज त्या गोष्टीला नव्वद वर्षे होऊन गेलीं तरी मेकॉलेनें आखून दिलेल्या रेषेवर-हुकूम कार्यक्रम विश्वविद्यालयातून चाललेला आहे ही गोष्ट प्राध्यापकाच्या नजरेस यावयास पाहिजे होती " ( ३।२।३८ ). पण नजरेस आली नाहीं हें विधानच निराधार आहे. सध्याचा शिक्षणक्रम हा अराष्ट्रीय वृत्तीचा असून तो बदलला पाहिजे याविषयीं सुमारें वीस वर्षापूर्वी मीं केसरींत लेखमाला लिहिली होती, तिच्यातील महत्त्वाचा भाग ' वादळी वारे ' या पुस्तकात संग्रहीत केलेल्या कोणाहि वाचकास पाहावयास सापडेल. राष्ट्रीय वृत्तीच्या पुढाऱ्यानीं याबाबत चळवळी केल्या. राष्ट्रीय विद्यालयें स्थापन केलीं. त्या सर्व प्रयत्नाना मिळावें तितकें यश मिळालें नाहीं याला कारण स्वातंत्र्याच्या अभावरूपी राजकारण हे होय; शिक्षण-क्रमातील दोष लक्षात आले नाहींत हें नव्हे. असें असता ' प्राध्याप-काच्या नजरेस ही गोष्ट आली नव्हती ' हें विधान जोशी कशाकरिता करीत आहेत ? शिक्षणक्रमातील दोष दिसत असूनहि ते दूर करता येत नाहींत हा परकीय सत्तेखालील राजकारणाचा दोष आहे. पण राजकार-णाला योग्य तें महत्त्व देण्यास मात्र जोशी कबूल करीत नाहींत. त्याचा असा एक सिद्धान्त आहेत कीं, 'दुःखशोकातच मानवाची शुद्धावस्था राहते' ( हिंदूंचें समाजरचनाशास्त्र पा. २६७ ) ह्या सिद्धान्तावर विश्वास असणाऱ्याला परवशतेच्या स्थितीबद्दल दुःख वाटण्याचें कारण नाहीं. आजच्या शिक्षणक्रमातील दोष संस्कृति-संगमकाराच्या नजरेस आले नाहींत हें विधानच निराधार असल्यानें त्यावर केलेलें वक्तव्य अनावश्यक आहे.

जोशी लिहितात कीं, 'आज स्नातक परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांपुढें न्यायशास्त्र हा शब्द उच्चारल्याबरोबर मिल, बोसाके हीं नावें येतात कीं गौतम, वात्सायन हीं येतात; तत्त्वज्ञान उच्चारल्याबरोबर प्लेटो, ब्रॅडले हीं

नावें येतात कीं कणाद, शंकर हीं नावें येतात ही गोष्ट निःप्राजळपणें प्राध्यापक सांगतील तर बरें होईल.' जोशी याना अगदीं निष्प्राजळपणें सांगतों कीं ते म्हणतात त्याप्रमाणें आपल्याकडील विद्वानापेक्षा पाश्चात्य विद्वानांचींच नावें आजच्या स्नातकापुढें येतात. पण या मुद्द्यावर वाद होता कधीं ? त्यामुळें ज्यावर वाद नव्हताच त्यावर केलेलें सर्व वक्तव्य अनावश्यक आहे. वर उल्लेखिलेल्या ' **शिक्षणांतील राष्ट्रीय दृष्टि** ' या माझ्या निबंधात मीं लिहिलें आहे कीं, ' बौद्धिक पारतंत्र्याच्या नाशाचें शिक्षण द्यावयाचें म्हणजे हिंदूंना उज्ज्वल परंपरा नाहीं, शास्त्रकलावाङ्मय यात ते मागासलेले आहेत वगैरे जी विचारसरणी परकीयानीं लिहिलेल्या पुस्तकाच्या द्वारें विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न चालू आहे तिची लाट थोपविणें होय ' (वादळी वारे पा. १६४). इतकें स्पष्ट लिहिलें असता आणखी निष्प्राजळपणें तें काय सांगावयाचें ? 'वादळी वारे' हें पुस्तक जोशी यानीं वाचलें नसेल. पण संस्कृति-संगम या पुस्तकावर ते टीका करीत असले तरी तें पुस्तक तरी त्यानीं नीट वाचलें कीं नाहीं याची शंकाच आहे. एरवीं ते असलीं विधानें करते ना. संस्कृति संगमांतील भारतीयांची ऐश्वर्योपासना, विश्वसंचार वगैरे प्रकरणें जीं लिहिलीं आहेत तीं आपल्या उज्ज्वल परंपरेची आठवण करून देण्याकरितांच लिहिलेलीं नाहींत काय ? मात्र आपल्या दोषाचीहि विस्मृति होऊं नये या हेतूने दोषाचेहि दिग्दर्शन केलें आहे. अर्थात् या बाबतींत निष्प्राजळपणें सांगण्यासारखें नवें कांहीं नाहींच आहे.

शेवटीं जोशी लिहितात, "आपण जें प्रत्यक्ष वर्तनानें करीत आहोंत तेंच मेकॉलेने सांगितलें म्हणून त्याला उमेट म्हणण्याचें कारण काय ?" आम्ही वर्तनानें काय करीत आहोंत ? तर गौतमाचें न्यायशास्त्र शिकविण्याऐवजीं ॲरिस्टॉटलचें शिकवीत आहेत. पण ह्या बाबतींत राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार करणारे लोक हे अगतिक आहेत ही गोष्ट जोशी याना दिसत नाहीं का ? राष्ट्रीय शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनीं अनेकदा प्रयत्न करून पाहिला. त्याला योग्य फळें आलीं नसतील तर तो परकीय सत्तेचा दोष आहे. पण त्यावरून ' संस्कृत भाषेतील सर्व ग्रंथभांडार घेतलें तरी तें युरोपमधील एखाद्या दुसऱ्या एकाद्या ग्रंथाच्याही तुलनेस पुरणार नाहीं

तसा मेकॉलेचा उर्मट अभिप्राय सध्याचा अभ्यासक्रम शिकविणाऱ्या सर्व शिक्षकाना मान्य आहे हे जोशी याना कोणीं सागितलें ? तो अभ्यासक्रम याना शिकवावा लागतो, ॲरिस्टॉटलच्या जोडीला गौतमाचें न्यायशास्त्र याना शिकवता येत नाहीं हे त्या शिक्षकाचे अगतिकत्व होय; मेकॉलेचा उर्मट अभिप्राय मान्य आहे म्हणून नव्हे. निदान संस्कृति-संगमकाराला तरी वरील प्रश्न विचारण्याचे कारण नाहीं. त्यानें लिहिलें आहे, " काटकोनत्रिकोणाचा सिद्धान्त शिकविताना पायथागोरसच्या बरोबर शुल्बसूत्राचा उल्लेख व दशाशपद्धतीसारखी बहुमोल पद्धति शोधून काढण्याचा मान भारतीयाचा आहे या गोष्टी विद्यार्थ्यांच्या कानावरून जावयाच्या तर त्याला राष्ट्रीय दृष्टि पाहिजे " (वादळी वारे पा. १७६). एवंच एतद्विषयक जोशी याचें प्रतिपादन सर्वच अनावश्यक आहे.

कणाद, गौतम, चाणक्य वगैरे शास्त्राचा अभ्यास आमच्या विद्यालयात झाला पाहिजे ही गोष्ट उभयपक्षीं मान्य आहे. मात्र जोशी याच्या लिहिण्यावरून कोणी असा समज करून घेईल कीं, खुद्द जोशी याच्या लिखाणात पाश्चात्याच्यापेक्षा पौर्वात्य विद्वानाचीच दखलगिरी अधिक घेतली जात असेल तर त्याची फसगत होईल. कारण जोशी याच्या स्वतःच्या लिखाणात पाश्चात्य विद्वानाच्या मताचीं अवतरणे जागोजाग आढळून येतात. फार काय भारतीय संस्कृतीचे लक्षण म्हणून जें सूत्र ते वारंवार उच्चारतात तेंहि पाश्चात्याच्या भाषेत आणि पाश्चात्याच्याकडून उसनें घेतलेले तें सूत्र म्हणजे 'भारतीयाची प्रवृत्ति' Divide, specialise and co-ordinate according to rank अशी आहे ( ३।२।३४ ).

पुढें तें लिहितात कीं, " पाश्चात्य शास्त्रें हीं श्रेष्ठ आहेत असें मेकॉलेच्या हुकुमानुसार मानणाऱ्या गुलामी मनोवृत्तीच्या लोकाना सनातनी लोक कोणत्या मुद्द्याकरिता जीव टाकीत आहेत ही गोष्ट कशी ध्यानात येणार ? " बरोबर आहे. आणि सनातनी परंपरेच्याविरुद्ध ब्र काढणारा माणूस हा गुलामी वृत्तीचा असतो अशी जोंपर्यंत जोशी यानीं आपली समजूत करून घेतली आहे तोंपर्यंत सुधारक कशाकरिता जीव टाकताहेत हें जोशी याना तरी कसें कळेल ? संस्कृति-संगमकाराचीं मतें कोणास कशींहि वाटोत पण त्याचा लेखक हा गुलामी मनोवृत्तीचा आहे असा शेरा

कोणीहि सुबुद्ध वाचक मारील असें मला वाटलें नव्हते. गुलामी वृत्तीचा अहेर स्वीकारूनहि पुन्हा स्पष्ट प्रतिपादावयास हरकत नाहीं कीं रसायन, वास्तव, खगोल, गणित वगैरे आजचीं पाश्चात्यांचीं शास्त्रें हीं पूर्वीच्या आपल्या शास्त्रापेक्षा फार पुढारलेलीं आहेत. तत्त्वज्ञान, न्यायशास्त्र वगैरेंत तितकी प्रगति झालेली नाहीं ही गोष्टही सत्य आहे. पण आजच्या शास्त्रांच्या जोडीला पूर्वींचीं शास्त्रें शिकवूं नयेत असा आग्रह संस्कृति-संगमकारानें धरला आहे कोठें? आजच्या प्रभावी भौतिक शास्त्रावर बहिष्कार घालणें हें आत्मघातकी आहे असें मात्र त्याचें स्पष्ट मत असून तें त्यानें संस्कृति-संगमात माडलें आहे. पण आपलें जुनें न्यायशास्त्र किंवा वेदान्त शिकवूं नये असें कोठेंहि प्रतिपादन केकेलें नाहीं. उलट संस्कृतिसंगमात लिहिलें आहे "मनाला शाश्वत शातीची जोड मिळवून देणाऱ्या विद्येकरिता आम्हांला काय पाश्चात्याच्या पाठशाळेंत गेलें पाहिजे? मुळींच नाहीं. साक्षात् मृत्यूशीं धीटाईनें चर्चा करणाऱ्या नचिकेताचें तत्त्वज्ञान आम्हालाच नव्हे तर इतरानाही पुरून उरेल. स्वच्छतेचे धडे आम्हीं पाश्चात्यापासून शिकावे? सुतराम् नको. आपल्या संस्कृतींतील याहीपेक्षा अधिक श्रेष्ठ बाबी म्हणजे सामाजिक ऋणाची कल्पना, आश्रमव्यवस्था व सहिष्णुवृत्ति...." वगैरे. तात्पर्य, जुन्यातील योग्य तें टिकवावें व नवें योग्य तें स्वीकारावें ही त्या पुस्तकातील माझी भूमिका आहे.

जोशी यानीं दुसरा एक मुद्दा उपस्थित केला आहे कीं, 'मेकॉले-सारख्या पाश्चात्यानीं जसे आघात केले तसे तीर्कतीर्थ कोकजे याच्यासारखे-हि करीत आहेत. मग मेकॉलेलाच तेवढें उर्मट म्हणण्यात अर्थ काय?' आपणाला हिणविणारे पाश्चात्य आणि आपणातील काहीं गोष्टींत परिवर्तन करूं पाहणारे कोकजे आदि परिवर्तनवादी यांच्यांतील फरक न उमगणारांविषयीं काय लिहावें? परिवर्तनवाद्यांना आपल्या पूर्वजाविषयीं अनादर नसून पूर्वजानीं ज्याप्रमाणें कालमानाप्रमाणें आचारविचारात परिवर्तन केलें तसेंच आजच्या काळीं परिवर्तन घडवून आणणें हें आपलें कर्तव्य होय असा त्याचा पक्ष आहे. त्यांना पूर्वजाना मूर्खांत काढावयाचें नाहीं आहे. असल्या परिवर्तनवाद्यांना मेकॉलेसारख्या दुसऱ्याची हेटाळणी करणाऱ्य

उर्मटाच्या पंक्तीस बसवावयाचें तर यज्ञसंस्थेस फुटकी नाव म्हणून हीनत्व देणारे उपनिषत्कार, श्राद्धाच्या प्रसंगीं मांसभक्षण केलेंच पाहिजे ही मनूची आज्ञा मोडणारे उत्तरकालीन स्मृतिकार, कलिवर्ज्य धाब्यावर बसवून संन्यास घेणारे शंकराचार्य या सर्व प्राचीन परिवर्तनवाद्यांना उर्मट म्हणावें लागेल. या सर्वांना उर्मट म्हणावयास माझी तरी जीभ वाहत नाहीं. जोशी यांना योग्य वाटल्यास त्यांनीं म्हणावें.

संस्कृति-संगमाचीं प्रकरणें पाच व सहा यांमध्यें भारतीय संस्कृति व पाश्चात्य संस्कृति या दोहोंचें चित्र रूढ समजुतीपेक्षा निराळें कसे काढता येईल हें दाखविलें आहे. 'आध्यात्मिक युरोप' आणि 'आसुरी भारत' या प्रकरणांविषयीं जोशी यांनीं वरीलप्रमाणेंच विपर्यास केला आहे. हीं प्रकरणें लिहिताना युरोपियन संस्कृति ही अध्यात्मप्रधान व भारतीय ही आसुरी होय असलें प्रमेय मला मांडावयाचें होतें असा मिथ्याग्रह संस्कृतिसंगमाचा कोणीहि वाचक करून घेणार नाहीं. सुष्टदुष्ट प्रकार दोन्हीकडे आढळतात, यामुळें भारतीय किंवा पाश्चात्य संस्कृति यांच्यावर आध्यात्मिक व आसुरी असा शेरा मारणें अवास्तव होय हें ध्यानीं ठसावें व दोन्ही संस्कृतींतील उपेक्षित भागाकडे लक्ष जावें हा त्या प्रकरणाचा उद्देश आहे व तो पुस्तकात अगदीं स्पष्ट शब्दात मांडलेला आहे. आसुरी भारत या प्रकरणाच्या शेवटचीं पुढील वाक्यें पाहा : "वरील मासले वाचून तुम्ही म्हणाल दोषस्थलेंच टिपून घ्यावयाचीं तर पाश्चात्य संस्कृतीचें नाहीं का असेंच ओंगळ चित्र रेखाटता येणार? तुमचा मुद्दा अगदीं रास्त आहे. कोणत्याही संस्कृतीचें असें चित्र रेखाटता येईल हेंच मला मुख्यतः दाखवावयाचें आहे. म्हणूनच मी म्हणतों कीं पाश्चात्य हे आसुरी व भारतीय हे आध्यात्मिक हें समीकरण आपण सोडून दिलें पाहिजे. तें देण्यास मनाची तयारी व्हावी म्हणून रूढ समजुतीपेक्षा निराळीं चित्रें साधार कशीं रेखाटता येतील हें मुद्दाम दिग्दर्शित केलें आहे. स्वतःच्या संस्कृतीविषयीं कठोर वृत्ति स्वीकारली आहे तीहि दोषस्थळें मान्य करूनहि स्वतःच्या संस्कृतींतील अभिमानास्पद कामगिरीची योग्यता पटवून देतां येईल ही खात्री आहे म्हणून." यावरून मूळ पुस्तकावरील भूमिका स्पष्ट होईल.

जुगार, वेश्यावृत्ति, मद्यपान याचे जे उल्लेख 'आसुरी भारत' प्रकरणांत केले आहेत ते हीं व्यसनें पाश्चात्याच्याप्रमाणें आपणातहि पूर्वीपासून आहेत हें दाखविण्यासाठीं. औद्योगीकरणानंतर पाश्चात्यात तीं जास्त वाढलीं आहेत हेंही मान्य करण्यास हरकत नाहीं. पण त्यामुळे औद्योगीकरण आणि व्यसनवृद्धि याचें अभेद्य साहचर्य मात्र मानण्याचें कारण नाहीं. जोशी लिहितात. "मद्यपान हें अयोग्य असें केळकराना वाटत असल्यास कामकरीवर्गाची खेचाखेच कोठेंच होणार नाहीं अशा तऱ्हेची व्यवस्था त्यानीं सुचविली पाहिजे; नाहीं तर प्रभावी भौतिक शास्त्राचा परिणाम दारूबाजींत झाल्याशिवाय राहणार नाहीं" (३।४।४४). जी व्यवस्था जोशी याना हवी आहे तशी व्यवस्था सुचविणे मुळींच अवघड नाहीं. ती व्यवस्था म्हणजे **साम्यवाद**. कामगारवर्गाची खेचाखेच करा असे यंत्र सागत नाहीं तर माणसाची लोभी वृत्ति सागत आहे. कोंदट चाळींत निकृष्ट वेतनावरच कामकऱ्यानीं गुजराण करावी असें यंत्र कशाला सागेल ? तेव्हा भौतिकशास्त्राचा आणि कामकऱ्याच्या दाट कोंदट वस्तीचा अतूट असा संबंध मुळींच नाहीं. शिवाय बाष्पशक्तीच्या ऐवजीं विजेच्या शक्तीचा उपयोग वाढत्या प्रमाणावर झाल्यासहि इष्ट परिणाम होणें अशक्य नाहीं. वीज ही खेडोपाडीं पुरविता येण्यासारखी शक्ति आहे. तिचा उपयोग फार मोठ्या प्रमाणावर केल्यास एकाच शहरात गिरण्याची गर्दी झालेली दिसण्याचे कारण नाहीं. हें स्थित्यंतर घडवून आणता आले तर पूर्वीप्रमाणेच प्रत्येक कारागिराला आपल्या घरीं एखाद-दुसरें विजेने चालणारें यत्र ठेवून त्यावर गुजराण करणें अशक्य ठरणार नाहीं. जेथे मोठा कारखाना अवश्य ठरेल तेथेंहि अनेक कारखाने एकाच शहरात थाटण्याचें कारण उरणार नाहीं. शिवाय, या कारखान्यात जे मजूर येतील त्याना हवाशीर राहण्याच्या जागा, पोटभर सकस अन्न, करमणुकीचीं साधनें वगैरे देणें तरी अशक्य का व्हावें ? आज ही विलोभनीय स्थिति अवतरलेली नाहीं. पण ती कशी अवतरेल याविषयींची मतप्रणाली स्पष्टपणे माडण्यात आलेली आहे. तिचें नाव **साम्यवाद** ! पण तो शब्द जोशी ऐकून तरी घेतील कीं नाहीं कोणास ठाऊक ! ते घेवोत वा न घेवोत, भौतिक शास्त्राची वाढ आणि व्यसनाची वाढ याचें शाश्वत साह-

चर्य आहे असा सिद्धान्त मात्र मुळींच सिद्ध होण्यासारखा नाहीं. प्रत्येक विद्येचा दुरुपयोग होत आलेला आहे तसा आज भौतिक शास्त्राचा होत आहे. पण दुरुपयोग लक्षात आल्यावर तो टाळावयाचे उपायहि निघतात. लोभी वृत्तीला मर्यादा घालणारा साम्यवाद हा आजचा त्यावरील उपाय आहे. पण तो जोशी याना सर्वस्वीं नापसंत ! साम्यवादाचा प्रयोग करून पाहणाऱ्या रशियाविषयीं जोशी लिहितात कीं, ' युरोपातील द्विपादपशूला व त्यात रशियाला पोटाची खळगी भरण्यापलीकडे मानव म्हणून काहीं असतो ही कल्पनाच उरलेली नाहीं.'

याच प्रकरणातील राजतरंगिणींतील राजाच्या आसुरी लीला वर्णिल्या आहेत त्या धड नाकारता येईनात तेव्हा तो ग्रंथच प्रामाणिक नाहीं असा ईश्वरी प्रसादाचा हवाला दिला आहे कीं Kalhan combines fact writh fiction. कल्हणाचीं सर्वच विधानें काटेकोर नसतील, पण तो प्रधानपुत्र होता व पूर्वींचे लेखी दाखले पाहून लिहिण्याचा त्यानें प्रयत्न केला होता. शिवाय त्यातल्या त्यात विश्वसनीय असा संस्कृत वाङ्मयातील एकमेव ग्रंथ म्हणजे राजतरंगिणी होय. उद्या सुदैवानें अधिक विश्वसनीय असा एखादा ग्रंथ उपलब्ध झाला आणि त्यावरून काश्मीरचे राजे हे सद्गुणी होते असें ठरले तर ते नको आहे कोणास ? पण तोंवर उपलब्ध असलेल्या सामग्रीकडे डोळेझाक करता येत नाहीं. श्रेष्ठ इतिहासकाराच्या अंगीं असणारे सर्व गुण कल्हणाच्या ठिकाणीं कदाचित् नसतील पण त्यानें दुष्कृत्यें वर्णन केलीं आहेत तीं स्वकपोलकल्पित आहेत असें मानण्याला आज तरी कोणताच पुरावा उपलब्ध नाहीं.

जोशी यानाहि कल्हणाचा पुरावा अगदींच अमान्य करणे जड गेलें असावें म्हणून त्यांनीं दुसराच एक गैरलागू मुद्दा उपस्थित केला आहे. असुरी भारताचें वर्णन करिताना संस्कृति-संगमांत मीं लिहिलें आहे कीं, ' संस्कृतीचें मूल्यमापन करतांना व्यावहारिक वर्तणूक जी लक्षात घ्यावयाची ती सत्ताधीशाची घेणें हा उत्तम पक्ष. तेव्हा आसुरी लीला खेळण्याचें सामर्थ्य ज्याच्या मनगटांत असतें अशा सत्ताधीशाची वृत्ति पाहणें महत्त्वाचें असतें.' जोशी यावर

लिहितात, "हिंदु संस्कृति ही संकराच्या विरुद्ध असल्यानें संकरप्रजेच्या वर्तनावरून ठरणारी नीति ही हिंदु समाजाची नीति नव्हे. अर्थात् संकर-प्रजा ही संस्कृतिबाह्य ठरते." मीं उदाहरणें दिलीं आहेत तीं राजांचीं म्हणजे क्षत्रियांचीं दिलीं आहेत. आणि क्षत्रियात संकर होत असे असें म्हटलें आहे. तें विधान जोशी याना मान्य आहे कीं नाहीं कोणास माहीत. चालू प्रकरणीं तें सोयीचें असल्यानें जोशी मान्य करीत आहेत व राजांचीं दुष्कृत्यें हीं संस्कृतिबाह्यांचीं दुष्कृत्यें म्हणून निकालात काढीत आहेत. यावर प्रथम असें सांगावयास पाहिजे कीं संकरप्रजा संस्कृतिबाह्य ठरवावयाची झालें तर आजच्या हिंदु समाजाचा मोठा भाग संस्कृतिबाह्य ठरेल. विवाह-प्रसंगीं सवर्णा वधूच प्रशस्त समजावी असें ध्येय स्मृतिकार मांडीत असले तरी असवर्णा प्राचीनकालीं निषिद्ध नव्हती. इतकेंच नव्हे तर मनूच्या काळा-पर्यंत ब्राह्मण पिता आणि क्षत्रिय माता यांची संतति ही ब्राह्मणसदृश मानिली जात असे. म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्णांपासून जी संकरप्रजा निर्माण होत असे ती ब्राह्मणातच मोडत असे. 'त्रिषु वर्णेषु जातो हि ब्राह्म-णाद्ब्राह्मणो भवेत्' अशीं वचनेंही सापडतात (अनुशासन पर्व अ. ४७). हें संकराचें प्रमाणहि तुरळक नसावें. महाभारताच्या वनपर्वात युधिष्ठिर नहुष आणि यांच्या संवादात युधिष्ठिराने संकराचे जें वर्णन केले आहे त्यावरून पाहिले तर एके काळीं संकर फार मोठ्या प्रमाणावर झाला असला पाहिजे. युधिष्ठिर म्हणतो, 'जातिरत्र महासर्प मनुष्यत्वे महामते । संकरात्सर्ववर्णानां दुष्परीक्ष्येति मे मतिः ॥ सर्वः सर्वास्वपत्यानि जनयन्ति यदा नराः । वाङ्मैथुनमथो जन्म मरणं च समं नृणाम् ॥ (अध्याय १८२।३१,३२). तसेंच शांतिपर्वात जनक-पराशर संवादात जनक पराशराला विचारतो कीं, वाटेल त्या योनींत उत्पन्न झालेले पुरुष मुनित्वाच्या पदवीस कसे चढले ? त्यावर पराशर उत्तर देतो कीं, हें सर्व तपाने होतें. मुनींनीं वाटेल त्या जातींतील स्त्रियांच्या ठिकाणीं पुत्र उत्पन्न केले व त्यांना मुनित्व प्राप्त करून दिले. उत्पाद्य पुत्रान् मुनयो नृपते यत्र तत्र ह स्वेनैव तपसा तेषां ऋषित्वं विदधुः पुनः । या प्रकारांचीं उदाहरणें म्हणून पराशरानें ऋष्यशृंग, कश्यप, वेद, ताण्ड्य, कृप, कक्षीवान, कमठ, यवक्रीत, द्रोण, आयु, मतंग, दत्त, द्रुपद, मत्स्य वगैरे नीच कुलात उत्पन्न झालेल्या अनेक ऋषींचीं नावें दिलीं आहेत. या वर्णनांतील

' उत्पाद्य पुत्रान् यत्र तत्र ' या शब्दावरून संकराची कल्पना येईल. याच प्रकाराचीं उदाहरणे भविष्यपुराणांतही दिलेलीं असून वरील संवादातील पराशरासंबंधाने ' श्वपाकी गर्भसंभूतः पिता व्यासस्य पार्थिव। तपसा ब्राह्मणो जातः संस्कारः तेन कारणम् ' असा खुलासा केला आहे. वरील वचनें अगदींच बिनबुडाचीं नसतील तर एके काळीं संकर फार मोठ्या प्रमाणावर होत असला पाहिजे, आणि तसे असेल तर भरतखंडातील सर्वच प्रजा ही जोशी यांच्या मताप्रमाणें संस्कृतिबाह्य ठरेल आणि मग हिंदुसमाजाची नीति ठरविण्याला आधारच नाहींसा होईल.

स्वतःच्या सोयीप्रमाणें हवा तो सिद्धान्त जोशी कसा मांडतात याचा आणखी एक दाखला पहा. भारतीय व पाश्चात्य यांच्या संस्कृतींची तुलना करण्यासबंधीं जोशी यानीं असा एक मोठा सिद्धान्त प्रतिपादला आहे कीं, कोणत्याहि सस्कृतीचें मूल्यमापन त्या संस्कृतींतील मूल्यश्रेणींनेंच केलें पाहिजे. हा सिद्धान्त सागून जोशी लिहितात कीं, 'हा सिद्धात पाश्चात्याना जसा कळला नाहीं तसा तो आमच्याकडील पुढाऱ्याना कळलेला नाहीं' (३।२।२९). जोशी यांचा वरील सिद्धात पुढाऱ्याना कळलेला आहे कीं नाहीं कोणास ठाऊक पण तो मला आकलन झालेला नाहीं हें मी निष्प्राजलपणें कबूल करतों. कारण तो सिद्धात नसून अपसिद्धात आहे. कोणत्याहि संस्कृतीचे मूल्यमापन त्याच संस्कृतींतील मूल्यश्रेणीनें करावें या प्रतिपादनाला काहीं अर्थच नाहीं. ही भूमिका एकदा घेतल्यावर कोणत्याहि दोन संस्कृतींची तुलनाच होऊं शकत नाहीं. खुद्द जोशी याना तरी वरील सिद्धात खरोखर आकलन झाला आहे कीं नाहीं याची शंकाच आहे. कारण तो झाला असता तर पाश्चात्य संस्कृतीला पाशवी, रानटी म्हणून विशेषणे ते देते ना ! हीं विशेषणें पाश्चात्य संस्कृतिनिरपेक्ष अशा दुसऱ्या कोणत्या तरी मूल्यश्रेणीच्या अपेक्षेनेंच देणें शक्य आहे. खुद्द जोशी यानीं हिटलर व स्टालिन यांना आसुरी ठरविण्याकरिता आधार घेतला आहे तो गीतेंतील मूल्यश्रेणीचा ! पाश्चात्य मूल्यश्रेणीचा नव्हे !

संस्कृति-संगमांतील आठवें प्रकरण 'भारतीयाचा विश्वसंचार' असें आहे. त्यात समुद्रावरील सफरी वर्णन केलेल्या आहेत. त्या प्रकरणांत

'अष्टादशद्वीपनिखातयूपः' हें वर्णन कार्तवीर्याला लागू असतांना दशरथाच्या नावावर चुकीनें आलें आहे. ही चुकी जोशी यानीं बरोबर काढली आहे. पुढें जोशी लिहितात कीं 'किल कार्तवीर्यः' या वचनात किल असल्यानें ही पूर्वीची दंतकथा आहे व कालिदासाच्या रघुवंशातील 'पारसीकान् तथा जेतुं प्रतस्थे स्थलवर्त्मना' अनुमान काढावयाचें झाल्यास समुद्रयान निषिद्ध होतें असेंच अनुमान निघतें. हें जोशी याचें म्हणणे मल्लिनाथाच्या टीकेला धरून आहे. पण रघुराजाच्या दिग्विजयात ज्या ज्या दिशेला तो गेला त्या त्या दिशेच्या देशाचें वर्णन असता येथें मात्र तसें वर्णन नाहीं. असें का ? तर तेथून पुढें रघु समुद्रावरून गेल्यानें स्थलाचें वर्णन करण्यास अवकाश नसावा अशी शंका सुचते व ती डॉ. दिवेकर यानीं लोकशिक्षणाच्या एका अंकात सविस्तर माडून रघुवंशातील मूळ पाठ प्रतस्थे स्थलवर्त्मना याऐवजीं प्रतस्थेऽस्थलवर्त्मना असा अवग्रहयुक्त असावा किंवा स्थलवर्त्मना ऐवजीं जलवर्त्मना असावा व समुद्रयान निषिद्ध ठरल्यानंतरच्या टीकाकारानीं तो बदलला असावा असें प्रतिपादन केलें होतें, एवढें वाचकांना यासंबंधीं कळविणें जरूर आहे.

हा मुद्दा सोडला तरी कालिदासाचा काळ खिस्ती शतकाच्या पहिल्या काहीं शतकात कोठेंहि धरला तरी याच शतकात भारतीय हे समुद्रावरील मुशाफरी करीत असत यांचें जें धावते वर्णन भारतीयाचा विश्वसंचार या प्रकरणभर केलें आहे तें अविश्वसनीय आहे असें जोशी यांनीं दाखवून दिलें असतें तर त्याचा मुद्दा सिद्ध झाला असता. तसें काहींच दाखविलेलें नाहीं. तें दाखविणें कठीण असल्यानें त्यानीं एक नवीनच मुद्दा उपस्थित केला आहे. परदेशगमनाच्या बाबतींत जोशी यानीं १९२७ सालीं जिनीव्हा येथें लोकसंख्येचा विचार करण्याकरितां भरलेल्या परिषदेचा उल्लेख करून असें प्रतिपादन केलें आहे कीं "जेते म्हणून किंवा व्यापारी पेशानें एका देशांतील लोकसंख्या दुसरीकडे गेली असतां सास्कृतिक, वाशिक, राष्ट्रीय व आर्थिक प्रश्न उपस्थित होतात; व त्याचें पर्यवसान बहुधा युद्धात, दास्यांत अगर साम्राज्यशाहींत होतें (वर्ष ३ अंक २). प्रभावी भौतिकशास्त्रें शिकण्याकरितां देखील रशियनानें जर्मनींत जाऊं नये व जर्मनानें इंग्लंडांत जाऊं नये. त्यामुळें सांस्कृतिक मतें बिघडतात असेंच तीं राष्ट्रें मानीत

नाहींत का? असेंहि ते विचारतात! वर्ष ३ अंक ५ मध्यें हाच विषय पुन्हा आला आहे. तेथें ते लिहितात, "विश्वसंचार वाटेल त्या राजकीय परिस्थितींत चालू राहतो आणि तो चालू राहावा हा सिद्धांत श्री. केळकरांना कोणीं सांगितला?" यावर एवढेंच उलट विचारलें असता पुरे कीं, असा सिद्धांत मीं मांडला आहे कोठें? विश्वसंचार पूर्वी होता हें इतिहासावरून दाखविलें आहे व तें जोशी यानीं खोडलेलेंहि नाहीं. तशाच प्रकारचा संचार नेहमीं चालू राहील किंवा राहावा असें प्रतिपादिलेले नसून, विश्वसंचार अजिबात लोपल्यास जागरूकता लोपते व अन्य देशात ज्ञानाची प्रगति झालेल्याची दखलगिरी राहत नाहीं असें लिहिलें आहे. पूर्वीचा ऐतिहासिक विश्वसंचार अमान्य करणे कठीण गेल्यामुळे जोशी यानीं स्वतःच्याच एके ठिकाणीं लिहिलेल्या मताविरुद्ध दुसऱ्या ठिकाणीं विरुद्ध लिहिण्यासही कमी केलेलें नाहीं. ते लिहितात, "परदेशगमनाचा निषेध कोठें होता तो एक विवेकबुद्धि असलेल्या केळकरासच माहीत. केळकर सागतात परदेशगमनाचा निषेध कडक रीतीने लागू होता त्या ब्राह्मण जातीनेंच या वसाहतीकरणात प्रामुख्यानें भाग घेतला आणि पुन्हा समुद्रयान निषिद्ध ठरलें तें उत्तरकालीं. यावरून पहिल्या वाक्यात सागितलेल्या ब्राह्मणाना तो लागू नव्हता. ज्या काळचा नियम त्या काळच्या ब्राह्मणाबद्दल सांगावयास पाहिजे." ज्या काळचा नियम त्या काळच्यापुरता बंधनकारक मानला पाहिजे हा मुद्दा अगदीं योग्य आहे. आणि जेव्हा निर्बंध नव्हता त्या कालीं ब्राह्मणानीं वसाहतीकरणात प्रामुख्यानें भाग घेतला हेंच दाखविलें आहे. पुढे तो निर्बंध कां घालण्यात आला असावा? त्याबद्दल दोन अनुमानें काढतां येण्यासारखीं आहेत. एक म्हणजे शौचाशौचाच्या कल्पना कडक होत गेल्या, त्यामुळे समुद्रयान निषिद्ध ठरविण्यात आलें असावें. किंवा दुसरें म्हणजे समुद्रयान निषिद्ध ठरविण्यासारखी काहीं विशिष्ट परिस्थिति उत्पन्न झाली असावी. देशातील बुद्धिमान् आणि कर्तबगार प्रजा बाहेर जाऊन स्थायिक होऊं लागली तर परदेशगमनाचा निषेध करणें अवश्य ठरेल. तसा प्रसंग उपस्थित झाला होता असा ऐतिहासिक पुरावा सांपडला तर या निषेधापाठीमागचा विशिष्ट परिस्थितींतील हेतु स्पष्ट होईल.

अद्याप तसा पुरावा कोणी माडलेला नाही. उद्या तो तसा उपलब्ध झाला तरी परदेशगमननिषेध हें नैमित्तिक म्हणजे विशिष्ट परिस्थितींत आवश्यक असें ठरेल. त्यामुळें वाणिज्याकरिता, ज्ञानार्जनाकरितां किंवा जागरूकतेनें आजूबाजूच्या देशांतील परिस्थिति समजावून घेण्याकरितां परदेशीं गमन करूं नये असा सार्वत्रिक निष्कर्ष निघणार नाहीं. पण असा विवेक न करिता द्विजाने समुद्रप्रयाण करू नये असा निरपवाद नियम मात्र धर्मशास्त्रात रूढ झाला. त्या विषयींचे मूळ वचन जोशी यानींच वर्ष ३ अंक २ च्या एका लेखाच्या शीर्षभागींच दिलेलें आहे तें म्हणजे 'द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्यापि संग्रहः' हें होय. याचा अर्थ नावेतून समुद्रावरील सफर केलेल्या द्विजाला शुद्ध करून घेतला असताहि संग्रह करणें हें कलिवर्ज्य होय असा आहे. म्हणजे त्यानें **प्रायश्चित्त घेतलें तरीहि त्याचा स्वीकार करूं नये.** यापेक्षा अधिक कडक शब्दात समुद्रयानाचा निषेध तो कसा करावयाचा? पण वरील वचन जोशी यानींच उद्धृत केलें असताहि अवघ्या दोन महिन्यानंतरच्या पाचव्या अंकात ते विचारतात, 'परदेशगमनाचा निषेध होताच कोठे!' ते लिहितात, "परदेशगमनाचा निषेध कोठें होता तो एक विवेकबुद्धि असलेले केळकर आणि परमेश्वर या दोघानाच माहीत." पण या दोघाच्यापेक्षा तो जोशी याना चागला माहीत आहे. 'द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्यापि संग्रहः' हें वचन त्यानीं स्वतःच उद्धृत केलेलें आहे. तें वचन त्यानीं सोईप्रमाणे आठवावें किंवा सोयीप्रमाणें विसरावें हें त्याचें पाहणें आहे. तिसऱ्या अंकात दिलेलें तें वचन त्याना पाचवा अंक लिहिताना अडचणीचें वाटलें हें स्पष्ट आहे. कारण पाचव्या अंकात हें वचन मागे सारून दुसरेंच वचन पुढें आणले आहे. ते लिहितात, 'परदेशगमनानंतर तेथलि काहीं चिजा समाजरचनेंत घुसडून दिल्या जातील म्हणून त्याना परत आल्यावर संस्कार सागितलेला आहे. "अंगवंगकलिंगा च गत्वा संस्कारमर्हति." येथील जोशी यांची हातचलाखी पहाण्यासारखी आहे. या ठिकाणीं असें विचारावयाचें कीं 'शोधितस्यापि संग्रहः' या पूर्वीच्या वचनाऐवजी संस्कारमर्हति हें नवें वचन कां आता पुढें केलें? 'शोधितस्यापि संग्रहः' या वचनात संस्कारानें शोधित झाला असताहि संग्रह करूं नये असे स्पष्ट रेखीव शब्द

आहेत. मग परदेशगमनाचा निषेध होता कोठें हें परमेश्वरालाच माहीत म्हणण्यात हशील काय ? शिवाय विश्वसंचार या प्रकरणात समुद्रावरील प्रवासाचा उल्लेख असता जोशी येथें 'अंगवंगकालिंगा च गत्वा सस्कार-मर्हति' याचा म्हणजे देशातील काहीं प्राताचा उल्लेख आहे. अंगवंग कालिंग हे भरतखंडाबाहेरील परदेश समजावयाचे कीं काय ? आणि त्यानीं 'द्विजस्याब्धौ' हा श्लोक या ठिकाणीं टाळावा का ? पण टाळण्याशिवाय निभाव नव्हता.

याच संदर्भात जोशी लिहितात कीं, 'ज्ञान कोठूनहि घ्यावें पण समाज-रचना देखील कोठूनहि घ्यावी का ?' पण संस्कृति-संगमात समाजरचना वाटेल तेथून घ्यावी असें निरपवाद प्रतिपादन केलें आहेच कोठें ? जाग-रूकतेच्या दृष्टीने आणि ज्ञानाच्या दृष्टीनें परदेशगमनावर कडक निषेध कायमचा घालणे अनिष्ट आहे असाच संस्कृति-संगमातील सूर आहे. 'द्विजस्याब्धौ' या वचनात एकातिक सिद्धान्त सागितलेला आहे. ज्ञान कोठूनहि घ्यावें असा विकल्प नाहीं. जोश्याना तो विकल्प मान्य आहे म्हणून त्याना तें वचन टाळून 'अंगवंगकलिंगा'चें वचन पुढें करावें लागलें. समुद्रयानासंबंधीं जोशी यांचें मत अलीकडे थोडें नरम झालेले दिसतें. कारण 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' हें पुस्तक लिहिताना त्याची समुद्रयानासंबंधीं दृष्टि फारच कडक होती. परदेशात जाऊन स्थायी झालें असता वंशनाश होतो असा भडक सिद्धान्त तेथे त्यानीं माडला आहे. त्याचा सविस्तर परामर्श वाचकाना 'वादळी वारे' पृष्ठ ४० वर आढळेल.

असाच विपर्यास अनेक विषयासंबंधीं जोशी यानीं केला आहे. पुढील नवव्या प्रकरणातील प्राचीन भारतातील लोकशाहीसंबंधीं असाच घोटाळा जोशी यानीं केला आहे. अंक ३।५ यात ते लिहितात, "प्राचीन भारतातील लोकशाही प्रकरणात केळकर सागतात कीं "या अवकाशात राजकारणातील अमुक एक प्रयोग आमच्याकडे व्हावयाचा राहून गेला असें झालें नाहीं (पान १८३), व पुढें राज्ययंत्र क्षत्रियाच्या अथवा सरदारांच्या हातून वाण्या-उदम्याच्या हातीं येणें ही शासनसंस्थेच्या विकासांतील अवस्था अद्याप आलेली नव्हती (पान ३१३). अशा तऱ्हेचे संगतवार सिद्धान्त आपणां

सर्वांना सुशिक्षित करणारें मुंबई विश्वविद्यालयच जाणे !" जोशी यानीं जी विसगति दाखविली आहे तिचा परिहार खुद्द संस्कृति-संगम पुस्तकातच स्पष्ट दिलेला आहे. तो जोशी यानीं पाहिला नसला तरी वाचकाना केव्हांहि काढून पाहता येण्यासारखा आहे. जोशी यानीं उद्धृत केलेल्या वरील वाक्यातील 'शासनसंस्थेच्या विकासातील अवस्था' या शब्दाकडे प्रथम लक्ष वेधलें पाहिजे. तें दिलें असता असें लक्षात येईल कीं, शासनसंस्थेच्या निरनिराळ्या प्रकाराचे प्राथमिक प्रयत्न प्राचीन हिंदुस्थानात झाले; विकासावस्थेंतलि झाले नाहींत. लोकशाहीचा प्राथमिक व लहान प्रदेशापुरता व्याप्त अशा स्वरूपाचा प्रयत्न प्राचीन हिंदुस्थानात झाला; पण कालातरानें तो साम्राज्यशाहीच्या प्रयोगात नष्ट झाला. युरोपमध्ये असेंच झालें. ग्रीसमध्यें एकेका शहरापुरतीं छोटीं छोटीं लोकशाही संस्थानें कांहीं काल नांदलीं व कालातराने साम्राज्यशाहीच्या लोंढ्यापुढें वाहून गेलीं. पण साम्राज्यशाही शिगेला पोंचल्यावर नष्ट झालेली लोकशाही फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या आसपास पुन्हा विकसित स्वरूपात उसळून वर आली तो प्रकार मात्र हिंदुस्थानात झाला नाहीं. म्हणजे लोकशाहीचा संकुचित प्रयोग प्राचीन भारतात झाला पण तिचा विकसित प्रयोग अर्वाचीन भारतात झाला नाहीं असा पक्ष माडला आहे. आणि त्यात विसंगति कसलीहि नाहीं हें वाचकाच्या सहज लक्षात येईल. हा सर्व खुलासा संस्कृति संगमातच सापडेल. त्यातील पुढील वाक्यें पाहा : "कालातराने द्वैराज्य, वैराज्य, गणराज्य वगैरे सर्व पद्धति साम्राज्यशाहींत बुडून गेल्या. पाश्चात्य राष्ट्रांच्या इतिहासातही असाच प्रकार आढळतो. प्राचीन काळीं ग्रीसमध्यें लहान लहान लोकशाही स्वरूपाचीं राज्यें होतीं; पण राजशाही पद्धतीशीं झुंजण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां तीं निर्बल ठरलीं. त्यानंतर लोकशाही पद्धति जी गाडली गेली ती अठराव्या शतकांत बॅस्टाइल तुरुंग फोडून तिला बाहेर काढीपर्यंत दृष्टीस पडली नाहीं. त्यानंतर मात्र लोकशाहीच्या तत्त्वानें चांगलें मूळ धरले. मध्ययुगांत वाळून गेलेल्या लोकशाहीला युरोपात जशी नवी पालवी फुटली तसा मध्यंतरीं वठून गेलेल्या लोकशाहीचा अवतार पुनश्च आजच्या संस्कृति-संगमावर दिसूं लागेल हें निश्चित होय" (पान १९७।९८) असा हा मूळ उतारा आहे. पण वर वर दिसणारी विसंगति-

दर्शक वाक्यें उद्धृत करणें जोशी याना सोयीचें होतें. परिहारदर्शक वाक्यें उद्धृत केलीं असतीं तर त्यावर टीका कशी करिता आली असती ?

जोशी लिहितात, "केळकराना हात जोडून विनंति करावयाची कीं, तुम्ही भारतीय संस्कृतीबद्दलची सिद्धातावली तयार करा आणि त्या सिद्धाताच्या मर्यादेंत लिहा. नाहीं तर एका प्रकरणात भारतीय संस्कृतींत लोकशाही संस्था होत्या असें सागून दुसऱ्या प्रकरणात लोकशाही संस्थाचा मुळींच उदय झाला नव्हता असे लिहिण्याचा प्रसंग येता ना." पण मौज अशी कीं, 'लोकशाही संस्थांचा मुळींच उदय झाला नव्हता असें संस्कृति-संगमात लिहिलेलेंच नाहीं. खुद्द जोशी यानींच जे वाक्य चार ओळींपूर्वींच उद्धृत केलें आहे तें असें कीं, 'राज्ययंत्र क्षत्रियाच्या हातून वाण्याउदम्याच्या हातीं येणें ही शासनसंस्थेच्या विकासांतील अवस्था आपल्या देशात अद्यापि आली नाहीं. दोन ओळींपूर्वी हें वाक्य त्यानीं उद्धृत केले आहे आणि आता 'लोकशाहीचा मुळींच उदय झाला नव्हता' असें वाक्य मीं योजल्याचें माझ्या पदरीं बाधीत आहेत. म्हणजे माझी नसलेली विसंगति दाखविण्याच्या घाईत स्वतःच विसंगत लिहीत आहेत ! लहान स्वरूपात लोकशाही प्राचीन युरोपात व प्राचीन भारतात दोन्हीकडे होती. पुढच्या काळात राजशाहींत ती दोहोंकडे लुप्त झाली. नंतर विकसितावस्थेंत युरोपात प्रकट झाली; पण हिंदुस्थानात झाली नाहीं असें मीं प्रतिपादन केलें आहे आणि त्यात कोणतीच विसंगति नाहीं हें वाचकास सागावयास नकोच. लोकशाही होती आणि मुळींच प्रकट झाली नव्हती असलें विसंगत विधान मीं केलेलें नाहीं. जोशी यानीं वाचलें नाहीं त्याला माझा नाइलाज आहे ! तें वाचलें असतें तर मला विनंति करण्याकरिता हात जोडण्याचे कष्ट जोशी याना पडले ते पडते ना !

प्रकरण १२ व १३ यातील पराभवाच्या मीमासेविषयीं जोशी लिहितात कीं, "हिंदूंनीं एकजुटीनें तोंड दिलें नाहीं म्हणून पराभव झाला असे केळकराचें म्हणणें आहे. पराभवाशीं युद्धशास्त्राचा काहीं संबंध येतो असें त्याना मुळींच वाटत नाहीं. युद्धतंत्र आणि युद्धातील हत्यारें याचा जयापयाशीं केळकराच्या मतानें फारच कमी संबंध असतो" (३।५।११५).

प्रतिपक्षानें न प्रतिपादिलेलीं मते त्याच्या गळयात बाधण्याचा शिरस्ता जोशी यानीं येथेंहि चालू ठेवला आहे. युद्धातील हत्याराचा जयापजयाशीं संबंध नसतो असें तर मीं म्हटलें नाहींच पण ज्याचीं शस्त्रे प्रखर त्याचाच जय होतो असेंच उलट म्हटलें आहे ! आणि म्हणून पाश्चात्याशीं टक्कर देणें असेल तर त्याचीं हत्यारें आणि त्या हत्याराच्या पाठीमागें असणारें शास्त्र हीं दोन्ही हस्तगत केलीं पाहिजेत असेंच मीं प्रतिपादन केलें आहे. संस्कृतिसंगम पान ३३९ वर मीं लिहिले आहे कीं, " ज्याचें शास्त्र त्याचे शस्त्र आणि ज्याचें शस्त्र त्याचे राज्य. ही प्रणाली अपरिहार्य आहे." पुन्हा पुढील पानावर लिहिले आहे : " पाश्चात्याचें बळ त्याच्या श्रेष्ठ शस्त्रांत व शिस्तींत आहे हें हिंदूंनीं ओळखलें होतें " यापेक्षा अधिक स्पष्ट तें काय लिहावयाचें ! तरीही जोशी सुखेनैव लिहितात कीं, युद्धाच्या हत्याराचा व जयापजयाचा केळकरांच्या मतें फारच कमी संबंध असतो !

विपर्यासाचे आणखी काहीं मासले पाहा. जोशी लिहितात, ' एकदा नीतितत्त्वे मानल्यावर आपल्या सोईकरिता त्याना मुरड घालावी हें केळकरी मतलबी तंत्र भारतीयांना कसेंसेच वाटतें' (३।५।१०९). येथेंहि वाचकाना सागितलें पाहिजे कीं, सोईकरिता मुरड घालावी असे मीं प्रतिपादन केलेलें नसून जोशी माझ्या पदरीं तें निष्कारण बाधीत आहेत. मुळातील पुढील वाक्यें पाहा : "जो धर्म शरणागतास अभय देण्यास सागतो तोच धर्म आततायीला जिवंत सोडूं नये असेंहि सागतो ना ? मग पहिल्याची आठवण व्हावी आणि दुसऱ्याची विस्मृति का पडावी ?" हीं मूळचीं वाक्यें. वाचक हो, या वाक्यांत नीतिनियमाना सोईकरिता मुरड घालावी असलें मतलबी तत्त्वज्ञान सांगितलेलें आहे का ? हिंसा आणि अहिंसा या दोन्ही तत्त्वाची सागड प्राचीन भारतीयानींच घातलेली आहे. जी मनुस्मृति धर्माचें लक्षण सागताना 'अहिंसा सत्यमस्तेयं' अशा श्लोकात अहिंसेला पहिलें स्थान देते तीच मनुस्मृति ' आततायिनं आयान्तं हन्यादेव अविचारयन् ' असा दण्डक घालून देते. यात विसंगतीहि नाहीं आणि केळकरी मतलबी तंत्रहि नाहीं. तर भगवद्गीतेंत प्रतिपादिलेला श्रेष्ठ कार्याकार्यविवेक आहे. भगवंतानीं अर्जुनाला युद्धासच प्रवृत्त केलें. पण त्यावरून त्यांना अहिंसा हें नीतितत्त्व अमान्य होतें असें तुम्ही म्हणाल काय ?

भगवद्गीताकार व मनुस्मृतिकार यांच्या प्रतिपादनात विसंगति नसून कार्याकार्यविवेक आहे. त्याचाच अनुवाद संस्कृतिसंगमात केला आहे. त्यात केळकरी मतलबी तंत्राचा कांहीं संबंध नाहीं. मनुस्मृति व भगवद्गीता यातील कार्याकार्यविवेक जोशी याना मान्य नसल्यास त्यावर टीका करण्यास ते स्वतंत्र आहेत. पण सोईकरिता नीतिनियमाना मुरड घालावी असें संस्कृतिसंगमात कोठेंहि प्रतिपादन केले नसता तें निष्कारण माझ्या पदरीं जोशी बाधीत आहेत. तसें बाधल्याशिवाय टीका करणें अवघड आहे.

न प्रतिपादिलेलीं मतें दुसऱ्याच्या गळ्यात बांधण्याचा आणखी एक प्रकार पहा. जोशी लिहितात, " प्राचीन परंपरेतील बालविवाह, मद्यपान-निषेध, व्रतें-वैकल्यें टाकून दिल्याने राजकीय स्वातंत्र्य मिळूं शकतें असें केळकर अगर इतर दुसरे कोणीं यानीं सिद्ध केले आहे काय ! " इतर कोणाच्याकडे मला लक्ष द्यावयास नको. पण जोशी माझ्या गळ्यात बांधतात असा सिद्धांत मीं कोठेंच मांडलेला नाहीं. जोशी यानीं तो अवश्य काढून दाखवावा. पुन्हा ते लिहितात कीं, " केळकराना असा प्रश्न आहे कीं, आम्ही पहाटे उठून स्नानसंध्या करतो त्यामुळे आमच्या राजकीय क्षेत्रातील काम करण्याच्या शक्तीवर कोणता हानिकारक परिणाम झाला ? " (२।५।११८) पण असा परिणाम होतो असे केळकरानें प्रतिपादन केले आहे कोठें ? मग उगाच भुई झोडपण्यात हशील काय ? तुम्ही संध्या करता कीं नाहीं हें केळकर विचारीत नाहीं. पण तुम्हास राजकीय स्वातंत्र्य मिळवावयाचे असल्यास व तें टिकवावयाचें असल्यास भौतिकशास्त्राचा अभ्यास पाश्चात्यांच्या बरोबरीनें केला पाहिजे असें मात्र केळकराचें मत आहे; व तें त्यानें स्पष्टपणें मांडलें आहे. तेव्हा त्या मताचें खंडन काय करावयाचें असेल तें अवश्य करा. पण तेंच नेमके जोशी टाळीत आहेत.

जुटीची भावना आपणांत कमी होती असें मीं प्रतिपादन केलें आहे. त्यावर जोशी लिहितात कीं, ' ही साफ खोटी गोष्ट ' व नतर कनोजच्या जयपाळानें सबक्तगिनाच्या विरुद्ध लढताना हिंदु राजाची जूट कशी घडवून

आणली होती; तसेंच महमद गझनीच्या विरुद्ध आनंदपालानेंहि हिंदु राजाची एकी कशी केली होती याचे स्मिथच्या इतिहासातील उतारे दिले आहेत. पण समकालीन तवारिखकाराचा आधार नसलेलें व विसंगतीनें भरलेलें स्मिथचें हे विधान खोटें आहे असें प्रो. दे. भाडारकर यांनीं दाखवून दिलें आहे याची दखलगिरी जोशी यानीं घेतली आहे काय? महंमदाच्या विरुद्ध ज्या हिंदु राजाची जूट झाली त्यात अजमेरच्या राजाचें नाव स्मिथ देतो. पण भाडारकर म्हणतात कीं, हें राज्यच मुळीं महमदा-नंतर शंभर वर्षांनीं अस्तित्वात आलें! समकालीन उत्बी याच्या लेखात या हिंदु राजाच्या जुटीचा मुळींच उल्लेख नाहीं. स्मिथचा आधार फेरिस्ता. पण तो समकालीन नाहीं. (भाडारकर ॲनल्स खड ११ पृ. १३०.) भांडारकराचा लेख जोशी यानीं कदाचित् पाहिला नसेल. पण चिंतामणराव वैद्याचा ग्रंथ तरी चाळला असेल ना? चिंतामणराव वैद्यही लिहितात कीं, "हिंदुस्थानने एकत्र होऊन केलेल्या या शेवटच्या प्रयत्नाचें फेरिस्तानें फारच अतिशयोक्तिपूर्ण वर्णन केले आहे. पण समकालीन उत्बीने या प्रयत्नाला अशा तऱ्हेचें व्यापक स्वरूप दिलेलें नाहीं." (मध्ययुगीन भारत भा. ३ पृ. ६५). जूट नसलेलीं मीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत. सिंध काबीज केला गेला तो फंदफितुरीवर. प्रति-हारी आणि राष्ट्रकूट याचे बिनसले तेव्हा मुसलमानाना राष्ट्रकूटाची सहानु-भूति मिळाली. चाहमान आणि गहडवाल याचे बिनसलें तेव्हा गहडवालानें शहाबुद्दीन यास स्वारी करण्याविषयीं गुप्त निरोप पाठविला. पेशवाईच्या शेवटच्या काळात शिंदे-होळकर आपआपसात लढले व परक्यांना घरात शिरूं दिलें. अशीं उदाहरणे दिलीं असता तीं न खोडता जुटीची भावना नव्हती हें विधान 'साफ खोटें' आहे म्हणून शेरा मारून जोशी मोकळे! या बाबतींत जोशी याना इतिहासकाराचा आणखी पुरावा पाहिजे असल्यास त्यानीं ज्या इतिहासकाराचा आपल्या लेखात उल्लेख केला आहे त्या ईश्वरीप्रसाद याचीं पुढील वाक्यें त्यांनीं नजरेखालीं घालावीं. मुसलमानाचे पाय हिंदुस्थानात कसे रोवले गेले याविषयीं ते लिहितात: Though numerically the Hindus were superior to their invaders their inability to make common cause

against their enimies frustrated their designs. Where a confederacy was organised its members often fell out among themselves. The need of defending their homes drew them together but self-interest predominated over the interests of Hindustan. ( *History of Medieval India p. 83.* ) जोशी ज्याचा हवाला देतात त्या इतिहासकाराचा हा शेरा आहे. जुटीची भावना नव्हती हें माझ्या पदरचें नाहीं.

असो. वरील विवेचनावरून जोशी यानीं घेतलेले आक्षेप कसे निराधार व विपर्यस्त आहेत हें वाचकाच्या लक्षात येईल.

गेल्या दोन अंकात मिळून 'समाजजीवन' या मासिकात आलेल्या परीक्षणातील विवाद्य विषयाचें विवेचन केलें. आता या अंकात आणखी दोनतीन परीक्षणातील काहीं मुद्याची चर्चा करितों.

प्रथम महाराष्ट्र-साहित्यपत्रिकेतील परीक्षण घेतों. हे परीक्षण रावसाहेब ना. गो. चापेकर या ज्येष्ठ साहित्यिकानीं लिहिलेलें आहे. माझ्या पुस्तका-विषयीं त्याचा अभिप्राय असा आहे कीं, " पुस्तकात माहितीची रेलचेल आहे, भाषेत अनुरंजकता आहे, विचारसौष्ठव आहे, आणि हात अंध-शृंखलानीं निगडित झालेला नाहीं. पण 'संस्कृति-संगम' या विषयाचें विवेचन मात्र या बहुमोल ग्रंथात आढळत नाहीं." हा अभिप्राय लेख-काला चागलाच डोळे चोळून पाहावयास लावणारा आहे. 'संस्कृति-संगम' नांव असलेल्या पुस्तकात इतर अनेक गोष्टी असल्या पण संस्कृति किंवा संगम दोन्ही नसेल तर पुस्तकाचा मुख्य उद्देशच विफल झाला असें म्हटलें पाहिजे. चापेकराचा अभिप्राय तोच दिसतो. कारण परीक्षणाच्या शेवटीं ते लिहितात कीं, "पुस्तकात संस्कृतीहि नाहीं व संगमहि नाहीं." इतर कोणाच्या लेखणींतून असलें विधान बाहेर पडलें असतें तर त्याकडे लक्ष देण्याचें कारण नव्हतें. पण एका पोक्त वयस्क साहित्यिकानें केलेलें हें विधान वाचून मला शंका आली कीं पुस्तक लिहितांना मी झोपेंत तर नव्हतों ना! एरवीं संस्कृति-संगम या विषयावर लिहावयास घेतलें पण संस्कृति व संगम या दोन्हीविषयीं कांहीं न लिहितां पुस्तक पुरें केलें हा

प्रकार झाला तरी कसा ! म्हणून पुस्तक पुन्हा चाळून पाहिलें, अभिप्राय परत वाचून पाहिला, पण परीक्षणकाराला काय म्हणावयाचें आहे याचा उमज पडेना.

थोडा विचार केल्यावर वाटूं लागलें कीं, इतके निपटून ज्या अर्थी चापेकरानीं लिहिलें आहे त्या अर्थी संस्कृति आणि संगम या दोन्ही शब्दांपाठीमागें असणाऱ्या कल्पनाविषयीं चापेकरांच्यात व माझ्यात अगदीं मूलग्राही असा मतभेद असला पाहिजे.

अर्थात् हा मतभेद नीट समजावून घ्यावा म्हणून चापेकराचें परीक्षण मीं बारकाईनें वाचून पाहिले व अन्यत्रही चापेकरानीं संस्कृतीविषयीं काय लिहिलें आहे हेंही थोडें चाळलें. पण पाहतो तों चापेकराच्या व माझ्या संस्कृतिविषयक कल्पनेंतही महत्त्वाचा असा कोणताच फरक नाहीं ! तेव्हा त्याच्या अभिप्रायातलें मर्म मला उमगलें नाहीं हें कबूल केलें पाहिजे.

संस्कृति या शब्दानें व्यक्त होणारी माझी कल्पना मीं प्रस्तावनेच्या सुरवातीलाच माडली आहे. ती म्हणजे बाह्यसृष्टि व अंतःसृष्टि याच्यावर मानवानें जो काहीं जय मिळविलेला आहे त्याचें संकलित स्वरूप म्हणजे त्याची संस्कृति. आता चापेकराच्या मतें संस्कृति कशाला म्हणतात हें पाहूं लागलों तर त्याचें मत फारसें भिन्न दिसत नाहीं. ते लिहितात, "पदार्थांच्या अंगीं निसर्गतः वसत असलेल्या गुणाचा उपयोग करून मनुष्य आपल्या बुद्धीच्या प्रभावानें नवी सृष्टि तयार करतो. हिला आधिभौतिक सृष्टि म्हणतां येईल. अशा संस्कृतीचें जें फल त्याच्यावर अखिल मानवजातीचा हक्क असतो व त्या फलाची देवाण-घेवाण अपरिहार्य आहे. संस्कृतीचें दुसरें कार्य वैचारिक होय. या प्रकारात विवेकशक्तीचा उपयोग करून तो काहीं निष्कर्ष काढीत असतो. या बाबतींतहि देवाण-घेवाण चालत आलेली आहे." येथपर्यंत चापेकरांच्या विचारसरणींत व संस्कृतिसंगमांतील विचारसरणींत फरक आढळत नाहीं. तेव्हां आणखी पुढें पाहूं. पुढें ते लिहितात कीं, " संस्कृति बुडाली हा जो लौकिकरीत्या आक्रोश केला जातो तो आचारासंबंधीं होय. या दृष्टीनें आचारशास्त्राची चर्चा

करणें अवश्य होतें " यावरून संस्कृति म्हणजे प्राधान्यानें आचार असा ते दुसरा एक अर्थ घेत असावेत व या भूमिकेवरून 'संस्कृति-संगमां'त संस्कृति नाहीं असा आरोप करीत असावेत असे वाटूं लागले व मतभेदाचा तळ येथें थोडा पायाला लागूं लागला म्हणून समाधानही वाटलें. पण तेंहि टिकावयाचे नव्हतें. कारण वरील वाक्यात आचाराला दिलेलें महत्त्व पुढील काहीं वाक्यात त्यानींच स्वतः काढून घेतलें आहे. ते लिहितात, " काहीं आचार भौगोलिक परिस्थितींवर अवलंबून असतात. उदाहरणार्थ, थंड प्रदेशातील व उष्ण प्रदेशातील आचार परस्परविरोधी असतात. ह्याची देवघेव होणे शक्य नाहीं." मींहि असल्या देवघेवीचीं उदाहरणें दिलीं नाहींत. नंतरच्या वाक्यात चापेकर लिहितात, " आचार परिस्थितीनुरूप बदलत असल्याने एकंदरींत **आचारांचा विचार गौण ठरतो.**" आचाराचा विचार जर गौण आहे तर त्याला महत्त्व न दिल्या-बद्दल संस्कृति-संगमकाराला दोष का दिला आहे कोण जाणे !

आचार म्हणजेच काय ती संस्कृति असें चापेकराचेंही मत नाहीं हे वर दिलेच आहे. श्री. दा. ना. आपटे याच्या 'हिंदी-सुमेरी-संस्कृति' या पुस्तकाचें परीक्षण करताना चापेकरानीं संस्कृतीचें वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे: "कोणत्याहि समाजाची प्रगति हीच त्याची संस्कृति होय. आपल्या बुद्धिसामर्थ्यानें मनुष्य एक प्रकारची जडसृष्टि निर्माण करतो, घरें बांधतो, वस्त्रें विणतो, शेती करतो वगैरे. हेंच त्याचें सांस्कृतिक कर्म" ( साहित्य-समीक्षण पृ. २३ ). संस्कृति-संगमातील संस्कृतीचें वर्णन अशाच धर्तीचे आहे. तेव्हा संस्कृतिविषयक कल्पना चापेकराची माझ्याहून काहीं निराळी आहे का म्हणून पाहता, तसें काहीं दिसत नाहीं. मग माझ्या पुस्तकात संस्कृति नाहीं असें जें चापेकर चक्क लिहितात त्याचा अर्थ काय ! चापेकरच जाणोत !

संस्कृति आणि संगम या दोन शब्दापैकीं पहिल्याचा विचार केला. आता संस्कृतीच्या संगमाविषयीं चापेकराचे काय म्हणणें आहे तें पाहूं. आधिभौतिक व वैचारिक अशीं जीं त्यानीं संस्कृतीचीं दोन अंगें मानलीं आहेत त्या दोहोंच्याही बाबतींत देवाण घेवाण भिन्न संस्कृतींत होत असते हें त्याना मान्य आहेच. मग मतभेद कोठें ? तर ते लिहितात, " संगम न

होताहि संस्कृति सर्वत्र पसरत रहाणार. तो तिचा स्वभावच आहे. या कारणास्तव पुस्तकाचा विषयच आम्हास समजत नाहीं. जगात जी देवघेव होते ती मनुष्याच्या अनुकरणप्रियतेनें होत असते. या देवघेवीकरिता संगमाची आवश्यकता असतेच असे नाहीं." मी तर देवाण-घेवाण यालाच पर्याय म्हणून संगम हा लाक्षणिक शब्द वापरीत आहे व दहाव्या प्रकरणाला 'प्राचीन संगमावरील देवाण-घेवाण' असे नावच स्वच्छ दिले आहे. देवाण-घेवाण मान्य आहे पण संगम मान्य नाहीं यातील सूक्ष्म फरक काय ? संगम म्हणजे राजकीय आक्रमण असें चापेकराना म्हणावयाचे असल्यास देवाण-घेवाणीला राजकीय आक्रमणाची जरूर नाहीं असेंच मींहि प्रतिपादिले आहे व जपानचा दाखलाहि दिला आहे (पा. ३ पहा). देवाण-घेवाण त्याना मान्यच आहे. फक्त चापेकराचे म्हणणे कीं, प्रसरण पावणें हा संस्कृतीचा निसर्गतःच स्वभाव असल्याने ती अनुकरणबुद्धीने आपोआपच पसरेल. कबूल. आपोआप पसरून जरी दोन संस्कृतींत देवाण-घेवाण झाली तरी त्या देवाणघेवाणीला लाक्षणिक रीत्या, अलंकारिक रीत्या, संगम हें नाव देणें चूक होईल काय ? मला तरी असे वाटत नाहीं. संगम हा शब्द मुळात नद्याच्या एकत्र येण्याला लावितात. तो लक्षणेनें येथे संस्कृतींच्या एकत्र येण्याला लाविलेला आहे. नद्याचे जल एकमेकात घुसते तशीच दोन संस्कृतींतील काहीं गोष्टींची देवाण-घेवाण होते हे या दोहोतील साधर्म्य. या साधर्म्यावर लक्षणा आधारलेली आहे. आणि साधर्म्यावर लक्षणा आधारणें हा मार्ग शिष्टसंमत आहे. दोहोंमध्ये साधर्म्यच नसेल तर लक्षणा लटकी पडेल. एरवीं नव्हे. चापेकर म्हणतात, "प्रसरण पावणे हा संस्कृतीचा धर्मच आहे." मान्य. सखल दिशेने वाहत जाणे नदीचा धर्म आहे. या अशा दोन नद्या आपआपल्या प्रकृतिधर्माप्रमाणें वाहत असतां एकत्र आल्या म्हणजे संगम होतो. तोच न्याय संस्कृतीस लागू. प्रसरण पावणें हा संस्कृतीचा धर्म आहे ना ? मग अशा दोन संस्कृति प्रसरणवशात् एकत्र आल्या असता व त्याच्यात देवाण-घेवाण सुरू झाली असता त्या प्रकारास संगम हा शब्द लावण्यास हरकत कोणती ? आणि ती नसेल तर पुस्तकाचा विषयच आम्हास समजला नाहीं असें जे चापेकर लिहितात त्याचा अर्थ काय ? तेच जाणोत !

दुसरे असे कीं प्रसरणशीलता हा संस्कृतीचा स्वभावधर्म असला तरी जित आणि जेत्याच्या सस्कृतीची गाठ पडली असता देवाण-घेवाणींत काय ठेवायचे, काय घ्यायचें याचा संभ्रम पडतो व म्हणून त्याचें विवेचन करावें लागते. चापेकरच पुढे लिहितात, "जित आणि जेते याचा सबंध आला म्हणजे जिताकडून दासवृत्तीने अनुकरण होत असतें. इंग्लिशाचा व हिंदूंचा आज दीडशें वर्षे 'संगम' झालेला आहे. या कालात हिंदूंनें इग्लिशानीं काय घेतले याचे उत्तर केळकरानीं दिलेले दिसत नाहीं." चापेकरानीं नीट वाचलेले दिसत नाहीं. एरवीं 'देवाण-घेवाण' या प्रकरणात सस्कृत भाषेतील विचारसंपदेचा केवढा खोल ठसा पाश्चात्य विचारवंताच्या मनावर उमटला आहे त्याचे जे चित्र रेखाटले आहे ते त्याच्या नजरेतून सुटतें ना. आपला व पाश्चात्याचा संगम हा जित-जेत्याचा सगम होय. अशा स्थळीं जेत्यानीं जितापासून काहीं शिकावे अशी फारशी अपेक्षा नसते. असे असताही संस्कृत भाषेतील ग्रथवैभवाने शोपेनहार, नित्शे, गटे, इमरसन भारून जावेत किंवा मॅक्स मुल्लर, रोमॉ रोलॉ, जोड यानीं रामकृष्णपरमहस, विवेकानद, राधाकृष्ण याच्या चरित्रा-वर व तत्त्वज्ञानावर ग्रथ लिहावे याला काहींच अर्थ नाहीं का? जित आणि जेते याच्या मीलनाला सगम हे नाव देण्यास मन का कचरते हे मी जाणतो. पण सर्व जगाच्या सस्कृतिच सध्याच्या दळण-वळणाच्या साधनाने एकाच वळणावर जाणार आहेत या गोष्टीला अनुलक्षून संगम हा शब्द वापरला आहे, व त्याचा खुलासाही पहिल्याच प्रकरणात करताना लिहिले आहे, 'पाश्चात्य सस्कृतीच्या व आर्य संस्कृतीच्या सगमा-वर मनोहर देखावा दिसूं लागेल असे म्हटलें ते त्या देखाव्याच्या उत्तर-रूपाला अनुलक्षून. सर्व जगाची मिळून एक सस्कृति पुढेमागें होणार आहे हे चापेकरानाही मान्य आहे. या बाबतींत माझी भूमिका मीं पहिल्या प्रकरणात स्पष्ट केली आहे. ती अशी कीं, जित आणि जेते एकत्र आले असता प्रथम झगडाच होतो. तो झगड्याचा काल अद्यापिहि संप-लेला नाहीं. पण कालातराने या झगड्याला सगमाचें स्वरूप प्राप्त होणार आहे. कारण पाश्चात्याचें शास्त्र आणि लोकशाही हीं आपणाला स्वीका-रावीं लागतील. (खरें म्हणजे या दोन्ही गोष्टींची बुजलेली आठवण आपणाला

ताजी करावी लागेल. कारण भौतिक शास्त्रोपासना व लोकशाही या गोष्टी पूर्व अपरिचित नव्हत्याच.) व आपली सहिष्णु आणि समाधानी वृत्ति पाश्चात्यान आत्मसात् करावी लागेल. तात्पर्य, संगम शब्द वापरण्यात आजच जित आणि जेते याचा पूर्ण मिलाफ झाला आहे असें गृहीत धरलेले नाहीं. सध्याच्य आक्रमणाचे व झगड्याचे रूपातर सगमात होणार आहे असा आशावा मात्र आहे. प्रास्ताविक पहिल्या प्रकरणात मीं लिहिले आहे कीं, ' पाश्चात व भारतीय या संस्कृतींच्या भेटीचे प्राथमिक स्वरूप झगड्याचे आह असले तरी, पाश्चात्य सस्कृतीच्या काही गोष्टींना आपल्या घरीं नांदवू घ्यावे लागेल. म्हणजे अंतीं ते तडजोडीचें ठरेल ' ( पृ. ४ ).

पुढे चापेकर दुसरा मुद्दा काढतात तो असा की, " जित जेत्यांच्य सबधापासून थोडासा फायदा होईल पण तोट्याचें माप कोणं करून पाहावे ? " मींहि फायद्याच्या भूमिकेवरून लिहिलेले नाहीं तर पाश्चात्यांचीं भौतिक शास्त्रे आत्मसात् करणे जीवनकलहात टिकून राह ण्याला अवश्यमेव म्हणून. जेत्याच्या उर्मटपणाचा तर मीं निषेधच केलेल आहे. सध्याच्या इतिहासाचा ओघ पाहता सर्व सस्कृति एकरूप होत चालल्य आहेत व त्यातून माणुसकीचा धर्म निष्पन्न होणार आहे हे चापेकरानीच लिहिले आहे. 'हिंदूंच्या सामाजिक सस्था' या पुस्तकाच्या परीक्षणात चापे कर लिहितात कीं, " जगभर हिंडण्याचे प्रवाससौलभ्य प्राप्त झाले असत कोणतीहि संस्कृति अबाधित राहणें शक्य नाहीं. अशा स्थितींत जगाच एकच धर्म होईल आणि तो म्हणजे माणुसकी हा होय " ( म. मा प. अंक ५६). मला तरी यापेक्षा निराळे काय म्हणावयाचे आहे ? तात्पर्य संस्कृति आणि सगम या दोन्ही कल्पनाविषयीं म्हणण्यासारखा मतभेद नसता पुस्तकात सस्कृतीहि नाहीं व सगमहि नाहीं असा शेरा चापेकरानं का मारला आहे हे मला तरी समजत नाहीं !

( ३ )

मुंबई साहित्य-समेलनाच्या ७ व्या अधिवेशनप्रसंगीं साहित्यसघाने जे वाङ्मय-परिचय प्रसिद्ध केला आहे त्यात प्रो. भाटवडेकर यानीं 'संस्कृति सगम' पुस्तकाचा परिचय करून दिला आहे. त्यातील एक दोन मुद्द्या

कडे आता वळतों. ते लिहितात कीं, " संस्कृति या विषयाचा कोणत्याहि दृष्टीने विचार करावयाचा म्हटला म्हणजे ती निर्माण कशी होते, तिच्या उत्पत्तिस्थितिलयासंबंधीं काहीं नियम ठरविता येतात कीं काय, इत्यादि जे मूलगामी प्रश्न अपरिहार्यपणे उत्पन्न होतात त्यांचा विचार या ग्रंथांत कोठेहि केलेला नाहीं. " यावर मला येवढेच म्हणावयाचें आहे कीं माझ्या पुस्तकाचें नांव 'मानवी संस्कृतीचा इतिहास', 'संस्कृतीचे उत्कर्षापकर्ष', 'संस्कृतीचा उद्गमविकास' अशासारखें काहीं ठेवलें असतें तर वरील प्रश्न अवश्य व अपरिहार्य ठरले असते. पण मीं दोन संस्कृतींची- म्हणजे पाश्चात्य व भारतीय यांची- गांठ पडलेली आहे व त्या प्रसंगीं जे प्रश्न उत्पन्न होतात त्यांचाच प्रामुख्यानें विचार केलेला आहे. आणि पाश्चात्यांचें भौतिक शास्त्र व लोकशाही या गोष्टी आत्मसात् करणें अपरिहार्य असल्यानें त्या स्वीकारण्यास मनोवृत्ति तयार व्हावी म्हणून दोन्ही संस्कृतींतील उपेक्षणीय भागाकडे लक्ष वेधलें आहे. संगमावर उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांचा येथे विचार कर्तव्य आहे; उगमाचा व लयाचा नव्हे. म्हणून संगम हें नांव दिलेलें आहे. माझी भूमिका काय आहे ती प्रस्तावनेंत मीं खुलासेवार मांडलेली आहे. त्यांत संस्कृतीच्या सर्ग-स्थिति-लयाचा तात्त्विक विचार मी मांडणार आहे अशी भूमिका घेतली असती आणि पुस्तकांत मात्र तशी मांडणी केली नसती तर वाचकांच्या अपेक्षांचा भंग केल्याच्या पातकाचा धनी मी ठरलो असतो. अशा प्रकारच्या अपेक्षा चेतवण्यासारखें प्रस्तावनेंत मीं काहीं लिहिलेलें नाहीं. आता प्रस्तावनेंतील माझी भूमिका वाचून ती मुळातच आकुंचित आहे, किंवा विषय निवडण्यातच मीं चूक केली, असे वाटल्यास तसें म्हणणे रीतीस धरून होईल. पण भलत्याच अपेक्षा जागृत करून त्या मीं सफल केल्या नाहींत म्हणून नाक मुरडणें योग्य नाहीं.

भाटवडेकर पुढें लिहितात कीं, " कोणतीहि संस्कृति विशिष्ट भौतिक परिस्थितीवर अवलंबून असते. ती निर्माण होण्यापूर्वी आवश्यक परिस्थिति निर्माण व्हावी लागते. शास्त्रीय संस्कृतीला अनुकूल परिस्थिति निर्माण करावयाची तर, म्हणजे हिंदुस्थानांत औद्योगीकरण संपूर्ण अंमलात आणावयाचे तर, ती निर्माण झाल्यावर आपले आचारविचार किती बदलून

जातील याचें भविष्य आज कसे करतां येईल ? जपानने पाश्चात्याचें शास्त्रीय ज्ञान आत्मसात् केले त्याबरोबर त्याचे दुर्गुणहि स्वीकारले नाहीत काय ? " याविषयीं दोन गोष्टी सांगावयाच्या. पहिलें असें कीं हिंदुस्थानचें भवितव्य जगाच्या भवितव्याशीं निगडित झाले असल्यानें हिंदुस्थानचे औद्योगीकरण झाले पाहिजे व झाल्याविना राहणार नाहीं. हा प्रश्न आता वादाच्या कक्षेत राहिलेला नसून औद्योगीकरण हें काँग्रेसनें नेमलेल्या राष्ट्रीय नियोजनसमितीनेंहि गृहीतच धरलेले होतें. या औद्योगीकरणानंतर त्याच्या अनुरोधाने येणारे दोषहि येणार नाहींत असे नाहीं. पण हे दोष कसे टाळावयाचे हा प्रश्न आता सर्वच राष्ट्रापुढे येऊन पडलेला आहे. औद्योगीकरणानंतर संपत्तीचें वाटप अधिकाधिक विषम होत चाललें. या दोषावर उतारा म्हणून साम्यवादाचा प्रयोग करून पाहिला जात आहे. शहरात कारखान्याची खेचाखेच झाल्यानें तेथील आरोग्य बिघडूं लागलें. यावर उपचार म्हणून वाफेच्या शक्तीऐवजीं जलोद्भव विद्युच्छक्ति वापरून कारखाने रेल्वेच्या दोन्ही बाजूंला लांबवर पसरलेले असे उभारणे याचा प्रयोग करता येण्यासारखा आहे वगैरे. औद्योगीकरणाच्या पोटीं सर्वांत घातुक दोष उत्पन्न झाला आहे तो संहारक शस्त्राची निर्मिति हा होय. हा दोषासुर सर्व जगाच्याच पुढे आता विक्राळ रूपानें उभा आहे. संहारक शस्त्राची वाढ आजच्या वेगाने चालू राहिल्यास मनुष्यजातिच मुळात नाहींशी होणें अशक्य नाहीं. पण तसें होण्यापूर्वी ज्या लोभी वृत्तीच्या पोटीं ही वाढ होत आहे त्या लोभी वृत्तीला तो वेसण घालूं शकेल अशा आशेवरच आज सर्वत्र जागतिक पुनर्घटनेची भाषा बोलली जात आहे. मग तीच आशा हिंदुस्थानने का बाळगूं नये ? म्हणजे औद्योगीकरण तर स्वीकारूं पण दोष तर टाळूं असा प्रयोग करून पाहण्याची हिंमत हिंदुस्थानानें का धरूं नये ? दुसरा एकच विकल्प म्हणजे साध्य झालेले शास्त्र आणि यंत्र मानवाने फेकून द्यावें हा होय. पण ही गोष्ट अशक्य दिसते. जपानने पाश्चात्याचे शास्त्र उचलले व दोषहि उचलले. पण पुढच्यास ठेच मागचा शहाणा या न्यायाने काहीं बोध घेता येणार नाहीं का ? निदान शास्त्र घेऊन त्याच्या अनुषंगाने येणारे दोष कसे टाळावयाचे याचे प्रयोग तरी करीत राहिलें पाहिजे ना ! रशियातील साम्यवाद स्वीकारावयाचा

म्हणजे तेथील दडपशाहीच्या उग्र स्वरूपाचें अनुकरण अपरिहार्यच ठरेल का हेंही प्रयोगानेंच ठरणारें आहे. रशियानेहि अनुभव येत गेला तसतसा आपल्या धोरणात योग्य तो बदल केला. गर्भपात, घटस्फोट, व्यभिचार या विषयात आरंभीं पूर्ण स्वातंत्र्य होतें ते आता नियंत्रित केले आहे असे म्हणतात. तेव्हा रशियाच्या या अनुभवाचा आपणास कांहींच फायदा होणार नाहीं का ? असो.

( ४ )

'आदेश' पत्राच्या ३०।५।४२ व ६।६।४२ च्या अंकात श्री. बाळशास्त्री हरदास यांचें परीक्षण आलेले आहे. त्यात ते लिहितात, "'आध्यात्मिक युरोप' व 'आसुरी भारत' हीं दोन प्रकरणे वाचलीं म्हणजे लेखकाची कींव करावीशी वाटते. काश्मीरच्या राजापैकीं चार दोन जुलमी राजांचीं उदाहरणे दिल्यानें काम कसे भागणार ?" चार दोन राजांचीं उदाहरणे असा शब्दप्रयोग वापरून आसुरीपणाचा देखावा हरदास बुद्ध्याच सौम्य करीत आहेत. चार-दोन किरकोळ उदाहरणाचा प्रश्न असता तर मींही त्याला महत्त्व दिले नसते. पण आसुरी लीलांचीं एक नव्हे अनेक उदाहरणे दिलीं आहेत तीं वाटल्यास त्यांनीं खोडून काढावीं आणि मग माझी कींव करावी. तीं उदाहरणें का दिलीं याचाहि मीं खुलासा केला आहे कीं, संस्कृ-तीचे मूल्यमापन करताना ध्येये आणि व्यवहार हीं दोन्ही लक्षात घेतलीं पाहिजेत. ध्येयें उच्च होतीं एवढ्याचकरिता संस्कृति उच्च मानावयाची झाली तर शत्रूवरहि प्रेम करावयास शिकविणाऱ्या ख्राइस्टची संस्कृति कोणत्या तोंडानें तुम्ही आसुरी म्हणणार ? तिला आसुरी म्हटले जातें ते त्या संस्कृतींत वाढलेलीं राष्ट्रे ख्राइस्टच्या ध्येयाचा व्यवहारात आज खून पाडीत आहेत म्हणून. आमच्याइकडच्या सत्ताधीशांनींहि तेंच केले. आमचींहि ध्येये उंच होतीं पण सत्ताधीशानीं त्याची कशी धूळधाण केली हें दाखविण्याकरिता 'आसुरी भारत' हें प्रकरण लिहिले आहे. पंडित कोकजेशास्त्री यांचाही 'आसुरी भारत' या प्रकरणावर अशाच प्रकारचा आक्षेप आहे. ते लिहितात, केळकर यांचे ' संस्कृति-संगम ' हें पुस्तक चांगलेंच गाजलें. अनेक आघात-प्रत्याघातातील टांकीचे घाव सहन

करून आजची भारतीय संस्कृति घडविली गेली आहे हे त्यात चांगल्या प्रकारे दर्शविलें आहे. मात्र भारताच्या एका कोपऱ्यातील एखाद्या राजवंशाचें भेसुर चित्रण करून त्याच्या आधाराने भारतीय सर्वसामान्य जनतेच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याची पद्धत तर्कदुष्टच म्हणावी लागेल. बुद्धानें यौवराज्याचा, अशोकानें साम्राज्याचा, आणि हर्षवर्धनाने संपत्तीचा त्याग केला त्यास जगाच्या इतिहासात तोड मिळणार नाहीं. या महनीय त्यागांचें उदाहरण सतत पाहणारी जनता त्यागमय जीवनास आदरणीय म्हणून मान देऊं लागणे स्वाभाविक होते. ऐवढा एक दोष सोडून दिल्यास ग्रंथकाराचे विवेचन मान्य होण्यासारखेच आहे. ( मराठी साहित्य १९१४-४४ कोकजे यांचा लेख पृ. ६६. ) या बाबतींत वाचकाना सांगावयास नकोच कीं बुद्ध, अशोक, हर्षवर्धन या थोर पुरुषाचा कोकजे यानीं जितक्या गौरवाने उल्लेख केला आहे तितक्याच गौरवाने मींही केला आहे. आसुरी भारत उठून दिसावे म्हणून तो गाळलेला नाहीं. पण अशीं उदाहरणे सतत लोकाच्यापुढे होतीं असे इतिहास सांगत नाहीं. तसेच काश्मीरचे राज्य कोपऱ्यातलें येवढ्यावरून आसुरी भारताची बोळवण कोकजे करीत आहेत यावरून इतर प्रांतातील उदाहरणाकडे त्याचे दुर्लक्ष झाले असावे असें दिसते. कारण हर्षचरितात स्कंदगुप्ताच्या तोडीं घातलेली विश्वासघाताची जीं उदाहरणे दिलीं आहेत तीं श्रावस्ती, वत्स, अश्मक, मगध, कलिंग, काठेवाड, आंध्र, गया अशीं सर्व काश्मीरच्या बाहेरच्या भिन्न भिन्न प्रांतातील आहेत. हीच यादी थोड्याफार फरकाने कौटिल्याचे अर्थशास्त्र व वराहमिहिराचे बृहत्‌संहिता या ग्रंथातही समाविष्ट आहे. कौरव पांडवाचे युद्ध, यादवाची यादवी, परशुरामाचें निःक्षत्रीकरण हे सर्व काश्मीरच्या बाहेरील आहे. बहुपत्नीकत्वाची, मोठे झनाने बाळगण्याची व राजाच्या परिचारकात दासींची योजना करण्याची चाल सर्वत्र दिसून येते. राजपुत्रापासून राजानें स्वतःचें रक्षण कसें करावें याविषयीं काश्मीराबाहेरील कौटिल्याला मुद्दाम इषारा द्यावा लागला आहे तो निरर्थक नव्हे. यावरून कोकजे यानीं केलेला तर्कदुष्टतेचा आरोप तर्कशुद्ध आहे काय याचा वाचकानी विचार करावा. प्राचीनभारतीय इतिहासात अभिमान वाहण्यासारख्या पुष्कळ

गोष्टी आहेत. त्याकडे लक्ष वेधणें हीच भूमिका आहे. पण प्राचीन राजर्षींचें कल्पित चित्र काढून त्यात रंगून जाण्यानें ऐतिहासिक दृष्टि विकृत होते. म्हणून ह्या विकृतीवरील उतारा या दृष्टीनें आसुरी भारताचा घोट कितीही कडू लागला तरी प्राशन करणे वैचारिक आरोग्याच्या दृष्टीनें हितावह झाल्याविना राहणार नाहीं अशी माझी समजूत आहे. हरदास लिहितात, "आमच्या व्यासंगावरून आमची अशी खात्री झाली आहे कीं, युरोपातील सर्व समाजरचनाशास्त्रे हीं आध्यात्मिक नाहींत." माझ्या व्यासंगावरून मला जो बोध झाला तो मीं मांडला. सत्य मिथ्या पारखण्यास वाचक समर्थ आहेत. हरदास पुढे खुलासा करितात कीं, "बाह्य नानात्वाची प्रतीति मिथ्या मानून आंतरप्रतीतीला प्राधान्य देणारे तत्त्वज्ञान हा जिचा आत्मा ती संस्कृति आध्यात्मिक होय." आंतरप्रतीतीला प्राधान्य देऊन समाजरचना करावयाची म्हणजे काय याचा मला उमज पडलेला नाहीं. समाजरचनेत व आचारात जीं वेळोवेळीं परिवर्तनें झालीं तीं बदलत्या अनुभवाप्रमाणेंच झालेलीं आहेत. मग तात्त्विक दृष्ट्या बाह्य नानात्वाला मिथ्या म्हणा वा न म्हणा. बलिष्ठानीं कनिष्ठाना लुबाडावे हा जो सामाजिक व्यवहार त्यात या मिथ्यात्वाच्या तत्त्वानें कांहींच फरक पडलेला नाहीं. बाह्य मिथ्यात्वाच्या केवढाहि गजर केला तरी 'शक्तेनापि हि शूद्रेण न कार्यो धनसंचयः । शूद्रो हि धनमासाद्य ब्राह्मणानेव बाधते' ॥ व विधवेनें व्रत पाळावे पण विधुराने अग्नीचा लोप होऊं नये म्हणून पुन्हा संसार थाटावा असा व्यावहारिक दंडक मनूनें उपदेशिला आहे. आणि म्हणूनच संस्कृतीचें मूल्य जोखताना तत्त्वाच्या व ध्येयाच्या जोडीला व्यवहार पहावा लागतो.

असो. या सर्व परीक्षणकाराचा मी आभारी आहे. परीक्षणातील कांहीं आक्षेपाना उत्तरें देण्याचा प्रयत्न केला म्हणून माझ्या पुस्तकातील उणीवाची मला जाणीव नाहीं अशी समजूत करून घेण्याचें कारण नाहीं. कांहीं आक्षेपाच्या बाबतींत माझी भूमिका स्पष्ट करणे अगत्याचें वाटलें म्हणून चार शब्द लिहिले एवढाच या लेखाचा अर्थ.

पुस्तकांतील सर्वच प्रमेयें सर्वांना पटतील अशी अपेक्षा कोणताच लेखक धरीत नाहीं. आक्षेपाच्या रूपानेंहि कांहीं प्रमेयाचा खल होणें आवश्यक असते. या खलामुळे आपल्या व पाश्चात्यांच्या संस्कृतींतील उपेक्षित भागाकडे वाचकांचें लक्ष वेधलें गेलें तरीहि माझे श्रम वाया गेले नाहींत असें मला वाटेल. एवढें सांगून वाङ्मयशोभेच्या वाचकांची रजा घेतों.[1]



१. वाङ्मयशोभा मासिकांतील लेख. लेखांत संस्कृति-संगमातील अवतरणांची पानें पहिल्या आवृत्तींतील आहेत. प्रस्तुत आवृत्तींत मजकूर आगेंमागें सांपडेल.

# ग्रंथ-ग्रंथकार-नामसूचि

## मराठी

## हिंदी

# संस्कृत

## इंग्लिश

# द. के. केळकरकृत

## संस्कृति-संगम

१ 'मी हा ग्रंथ समग्र वाचला. झोपीं गेलेल्यांस जागे करणारा व जागे असलेल्यास उभे करणारा असा हा ग्रंथ आहे.' 'जाणत्या सुशिक्षित पुरुषांनी व बायकांनी हा ग्रंथ अवश्य वाचला पाहिजे.' 'समजण्यास सुलभ, विचार करण्यास घनरसभरित व बुद्धीला सतेज करणारा असा हा ग्रंथ निर्माण केल्याबद्दल प्रो. केळकर यांचे धन्यवादपूर्वक अभिनंदन केले पाहिजे.' **डे. व्ह. ट्रान्स्लेशन सोसायटीचे परीक्षक.**

२ आसुरी संस्कृति जिला म्हणावें अशी ऐहिक भोगाची लालसा भरतखंडातसुद्धा प्राचीन कालापासून आजवर कशी बळाविली आहे हे ग्रंथकारानें फार हृदयंगम रीतीने वर्णिले आहे व अध्यात्मिकता आणि भोगलालसा या एकाच वेळीं कशा अस्तित्वात असतात याचीं दिलेलीं उदाहरणे फार उद्बोधक आहेत...संस्कृति-संगमासारखा विषय आकर्षकतेनें मांडून सामान्य वाचकास देखील त्याची जिज्ञासा व गोडी लावणे हे दुर्घट काम प्रा. केळकर यांनीं यशस्वी रीतीने साधले आहे. **समीक्षक (श्री. म. वर्दे).**

३ ग्रंथातील प्रत्येक पानन् पान कर्त्याचा जबरा व्यासंग आणि अधिकारी लेखणी वाचकाच्या मनात भरवते व पुस्तकाची ओघवती भाषा लेखकाची कळकळ व्यक्त करते. **शालापत्रक.**

४ 'संस्कृति संगम' या ग्रंथातून भाषासौंदर्याचे हवे तेवढे नमुने काढून दाखविता येतील. पण भाषासौंदर्य हे या ग्रंथाचे प्रधान वैशिष्ट्य नसून विचारसौंदर्य हेच खरे वैशिष्ट्य होय. सर्व प्रकारच्या विचारवंताना हा ग्रंथ नेत्रांजनासारखा उपकारक वाटेल. खऱ्या विद्वानाचे चर्मचक्षु वर्तमान स्थितीचे प्रेक्षण करण्यात गुंग असतात, त्याचे ज्ञानचक्षु पूर्वेतिहासाच्या परिशीलनात मग्न असतात तर त्याचे तर्कचक्षु भावी परि-

स्थितीकडे वळलेले असतात. संस्कृति-संगम या ग्रंथात आढळणारी विद्वत्ता या अर्थानें खरोखरीच त्रिनेत्री आहे. **सह्याद्रि** (शि. ल. करंदीकर).

५ श्री. केळकर यानीं लिहिलेला हा ग्रंथ इतका सुंदर व नवी दृष्टि देणारा आहे, कीं कोणत्याही साक्षर गृहस्थानें तो न वाचणे म्हणजे आपल्या ज्ञानाचा अपुरेपणा ठेवण्यासारखें आहे....अशा ग्रंथाबद्दल द्यावेत तेवढे धन्यवाद थोडेच आहेत. **चित्रमयजगत्.**

६ 'काव्यालोचन', 'वादळी वारे', 'संस्कृति-संगम' या ग्रंथावरून प्रो. केळकर याच्या अष्टपैलू बुद्धिमत्तेची चागलीच ओळख होऊ शकते.... 'संस्कृति-संगमा'त शास्त्रीय ग्रंथाचा रुक्षपणा कोठेच आढळून येत नाहीं. काहीं प्रकरणें तर कादंबरीइतकीं रसाळ आणि मनोरंजक आहेत. **नवयुग.**

७ गेल्या काहीं वर्षांत मराठींत जे उत्तम ग्रंथ निर्माण झाले आहेत त्यात या ग्रंथाची गणना करता येईल असें निःसंदिग्धपणें म्हणावयास हरकत नाहीं. **विविधवृत्त.**

८ विचार करा आणि काहीं कृति करूं लागा असेच वाचकाना जणूं काहीं हे पुस्तक बजावीत आहे. व त्याचबरोबर पुस्तकाचा मोठा गुण हा आहे कीं, त्यातील भाषा सुरेख, चटकदार व चित्ताकर्षक असल्यानें इतके नवे नवे विचार खच्चून भरलेलीं प्रकरणें एकामागून एक वाचीत असता मेंदूला शीण न वाटता उलट गुदगुल्याच होतात. **केसरी.**

९ केळकरानीं हा ग्रंथ पट्टीच्या वकिलानें आपल्या अशिलाची बाजू कुशलतेनें माडावी तसा लिहिला आहे. यातील विवेचन साधार, युक्तिवाद-शंकाचें निराकरण करणारा, व भाषा ओजस्वी आणि प्रभावी आहे. हा ग्रंथ वाचल्याशिवाय कोणींही राहूं नये अशी आमची शिफारस आहे.

**महाराष्ट्र.**

---

# द. के. केळकरकृत

## काव्यालोचन (दुसरी आवृत्ति)

१ लेखकाचे परिश्रम, बुद्धिमत्ता व विषयप्रतिपादनकौशल्य या गोष्टी पुस्तकातील कोणतींहि चार पानें वाचलीं असता कळून येतील.

**पं. रंगाचार्य रड्डी** (विविधज्ञानविस्तार).

२ ज्या पुस्तकाचा मराठी भाषेला अभिमान वाटेल असें हें पुस्तक आहे.

**रा. प्र. कानिटकर** (चित्रमयजगत्).

३ सर्व दृष्टींनीं परिपूर्ण असें हे पुस्तक मराठी टीकावाङ्मयास आपल्या अपूर्वतेनें भूषणभूत झाले आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

**रा. श्री. जोग** (लोकशिक्षण).

## वादळी वारे ( दुसरी आवृत्ति )

१ सर्वच लेखात स्वतंत्र विचारशक्तीचा व मनोवेधक लेखनपद्धतीचा ठायीं ठायीं प्रत्यय आल्यावाचून राहत नाहीं. **महाराष्ट्र.**

२ वैचारिक प्रगतीच्या दृष्टीने या ग्रंथाची सर्वत्र प्रसिद्धि होणे जरूर आहे.

**लोकमान्य.**

३ प्रस्तुत पुस्तकाच्या योगाने वाचकाच्या मानसिक आरोग्यवर्धनास मदत होईल असे प्रकाशक म्हणतात. त्याची आशा रास्त आहे. **धनुर्धारी.**

४ ग्रंथकाराची काव्यसुधा प्रत्येक पानात पाझरत आहे. **केसरी.**

## साहित्यविहार

खोल व्यासंगामुळे आलेला विचाराचा पक्केपणा हा जसा साहित्य-विहाराचा एक प्रमुख गुणविशेष आहे तद्वत् वावदूकतेपेक्षा युक्तिवादावर भर देण्याची यातील पद्धति विलोभनीय आहे. या पुस्तकातील साहित्य आणि प्रगति, पुरोगामी साहित्य, वाङ्मयातील अमरता हे लेख मौलिक-तेच्या दृष्टीनें महत्त्वाचे वाटतात. **लोकमान्य.**

# समग्र-केळकर-वाङ्मय

## खंड १२, एकंदर पृष्ठसंख्या १२५००

**प्रत्येक खंडास रुपये ६ प्रमाणें एकूण किंमत ७२ रुपये.**

## संपूर्ण सेट घेणारांस किं. ५० रु. फक्त

१ टिळक खंड, २ लोकमान्य खंड, ३ केसरी खंड, ४ राजकारण खंड, ५ असहकारिता खंड, ६ वार्ताहर खंड, ७ इतिहास खंड, ८ कादम्बरी खंड, ९ नाट्य खंड, १० साहित्य खंड, ११ संस्कृति खंड, १२ तत्त्वज्ञान खंड-- **या बारा खंडांमिळून** १ संपूर्ण टिळक चरित्र, २ राज्यशास्त्र, ३ तिरंगी नवमतवाद, ४ विलायतचीं बातमीपत्रे, ५ मराठे आणि इंग्रज, ६ आयर्लंडचा इतिहास, ७ फ्रेंच राज्यक्रांति, ८ इतिहास-विहार, ९ नवऊपूरचा संस्थानिक, १० बलिदान, ११ गॅरिबॉल्डी चरित्र, १२ तोतयाचें बंड, १३ चंद्रगुप्त, १४ कृष्णार्जुनयुद्ध, १५ अमात्यमाधव, १६ संगीत वीर-विडंबन, १७ संत भानुदास, १८ नवरदेवाची जोडगोळी, १९ सरोजनी, २० तरुण हिंदु नागरिक, २१ हास्यविनोदमीमांसा, २२ भारतीय तत्त्वज्ञान अशीं एकूण २२ संपूर्ण पुस्तकें समाविष्ट झाली असून तात्यासाहेबांच्या सर्व प्रस्तावना, त्यांचे सर्व राजकीय आणि सांस्कृतिक लेख असें १२५०० पृष्ठांचें वाङ्मय फक्त ५० रुपयांत देत आहोंत.

---

व्यवस्थापकः—य. गो. जोशी प्रकाशन, ६२३/१५ सदाशिव, पुणें २.